श्री

# रामदास आणि रामदासी

## मासिक पुस्तक

श्रीसांप्रदायिक वृत्त, चर्चा, जीर्णोद्धार
वगैरे

## खंड दुसरा

( १०५ )

॥ श्रीराम ॥

## श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारकार्याचा

जमाखर्च वगैरे
( १८५१ ज्येष्ठ शु. ३ )
ता. १०-६-१९२९
धुळें येथील जमाखर्च

जमा

२७-- ३-० श्रीसमर्थसेवक भीम दास विश्वंभर रामदासी, किनी, यांनी जमविलेले
५ गणेश नीलकंठ डोंगरे
२ कोंडो महादेव
१५ शंकर कृष्णाजी सबनीस, मळवत विश्वंभर रामदासी,

खर्च

१८२- २-० हुसेन चिमा, शंकर चिमा व घोंडिबा वकार याना वेळोवेळी मिळून दिले ते
१०-०-० गुरुगाची वत्ती
१-- ०-० सदर वत्ती जांबेस पाठविण्यास कोखडी पेटी
०-- ४-० सदर पेटी स्टेशनवर पाठविण्यास

तात्या नारायण,
आण्णा पांडुरंग, बजरंग व विठ्ठल बुगडे,
मारुति गणराव, बाळा नाना तेली, विठ्ठल रामचंद्र भाले, रामचंद्र गोविंद पोरे,
एकनाथ व विश्वनाथ करमाळकर, दत्तोपंत गोपाळराव वकील,
हिराचंद देवचंद गुजर,
आण्णासाहेब जहागिरदार, न्याहलसिंग,
दिगंबरराव सबनीस,
प्रत्येकीं एक रुपया.

५-- ९--० फिरकोळ

यांत ८६ मनिऑर्डर खर्च वजा जातां

२-- १--० विष्णु गंगाधर जठार हस्तें ना. पां. नवरे मुंबई.

१ माधवराव खरात पाटील, आसनगांव

६--१०--० स्वयंसेवक राम मारुती यादव यांचे मार्फत

२ वासुदेव लक्ष्मण कुळकर्णी, काले

१ हरिभाऊ इनकर, कोल्हापुर

१ श्री. लक्ष्मीबाई चंद्रचूड

२-१२-० किरकोळ

८६-१०-०

२१-१२-० सुजाउद्दीन फिदाअली बोहरी यांस वमस, हातोडी व घमन याबद्दल

८- ६-० पाणीचा चिमटा, पळी साखळी वगैरे लोखंडी सामानाबद्दल

७-१२-६ टपालखर्च

३-१३-० श्रीसमर्थग्रन्थसंग्रहालय, सज्जनगड, साठीं स्वराज्यपत्राची वर्गणी

२५००- ०-० जांब येथील मंदिराचे कामावर असलेले स्थापत्यविशारद श्री. वासुदेवराव गोगटे यांजकडे वेळोवेळी पाठविले ते

५०० ता. ४।१।२९
८०० ,, १३।४।२९
५०० ,, ८।५।२९
५०० ,, १८।५।२९
२०० ,, ६।६।२९

२५००

२७३५- १-६ एकूण खर्च

१० श्री. लक्ष्मीबाई हुंबे, श्रीहरिहरेंद्रस्वामींचा मठ, आळंदी
५ केशव सीताराम ढवळे, मुंबई
१० रामचंद्र गोविंद काशीकर, वकील, मालेगांव
२० अनंत सखाराम वणीकर, अहमदाबाद, मार्च व एप्रिल करितां
३५-८-० वैद्य भास्कर बळवंत शास्त्री ताम्हनकर, आयौषधी संग्रहालय, कोल्हापूर तर्फे सौ. अंबुताई ताम्हनकर यांनीं पुणें येथें जमविलेले

५ सौ. यमुनाबाई भिडे

२ सौ. माणिकबाई कलिवार

२९ सौ. सरस्वतीबाई दामले, सौ. कमलाबाई आपटे, सौ. भागीरथीबाई करमरकर, सौ. नर्मदाबाई पाठणकर, सौ. इंदिराबाई देवधर, सौ. शांताबाई आपटे, सौ. यमुनाबाई दाणी, सौ. जानकीबाई साठे, सौ. सत्यभामाबाई लागु, सौ. पार्वतीबाई दामले, सौ. मनोरमाबाई वैद्य, सौ. उमाबाई ओक, रा. हरि बळवंत ओक, सौ. यशोदाबाई साठे, सौ. सुशिलाबाई चोदनी, कु. वेणूताई पाळंदे, सौ. सरस्वतीबाई दर्डीकर, रा. माधव शंकर गडबोले, सखूबाई वैद्य जमखंडी, सौ. अन्नपूर्णाबाई ओक, सौ. दुर्गाताई रानडे, सौ. राधाबाई भिडे, सौ. सरस्वतीबाई गोडबोले, सौ. इंदिराबाई जोगळेकर, सौ. सरस्वतीबाई करमरकर, सौ. सरस्वतीबाई विद्वांस, रा. आण्णासाहेब लाड, सौ. रमाबाई पालकर, रा. नरहर मोरेश्वर वझे, प्रत्येकीं एक रुपया

यांत ८८ न. ऑ. खर्च वजा जातां

१० स्वयंसेवक गंगाधर केशव पिंगळे, इंदूर, यांचे मार्फत

२ पंढरीनाथपंत घोडगांवकर, सदाशिवराव आचार्य, नारायणराव उदार, प्रत्येकीं एक रुपया

४८१८६ धान्यभिक्षा

२८१४८६ किरकोळ

१० स्वयंसेवक कृष्णाजी हरि कुलकर्णी, विटे यांचे मार्फत

७ रामचंद्र वासुदेव वेचलेकर, दत्तात्रय बाळकृष्ण देशपांडे, केशव वामन जोशी, दत्तात्रय गणेश कानडे, रामकृष्ण

नारायण बापट, रामचंद्र व्यंकटेश वाडीकर, विठ्ठल दत्तात्रय पेटकर वकील, प्रत्येकीं एक रुपया

१८३ किरकोळ

यांत ८३ म. आ. व पत्र खर्च वजा जातां

श्रीसमर्थसेवक सदाशिव महादेव शेट रेडिज, चिपळूण यांचे मार्फत

२५ सदाशिव महादेव शेट रेडिज, गोविंद हर शेट रेडिज, महादेव मामशेट कोळवणकर, सखाराम दशरथ शेट इटकर, सखाराम हरशेट रेडिज, बाळा रामशेट शिराळकर, महादेव मुडकशेट खेडेकर, बायाणा सातलिंगापा धुळी, पांडुरंग शिवराम शेट कोमेरकर, भाऊरामशेट खेडेकर, नारायण दशरथ शेट इटकर, हरि भिकशेट गुढेकर, गंगाराम सखु कदम, शंकर बाळशेट टाकळे, महादेव लक्ष्मण शेट संसारे, बाळ बाबाजी शेट चिंगळे, आत्माराम राघोबा शेट गुढेकर, शिवराम सखाराम सावळे, गणपत लक्ष्मण शेट कोळवणकर, गणेश नारायण अभ्यंकर, शंकर बाळकृष्ण शेट मापुसकर, दत्तात्रय लक्ष्मण सावंत, जगन्नाथ सावळाराम शेट शिरगांवकर, केशव सीताराम शेट काजारी, गोविंद गणु शेट रेडिज, प्रत्येकीं एक रुपया

( बाकी पांच पुढील अंकीं )

६- ७-० श्रीसेवक रा. बा. केंच, सातारा, यांनीं जमविलेले

३ सौ. दुर्गाबाई केळकर पुणें, पी. बी. ब्रह्मणे सातारा, भालचंद्रपंत वाघ सातारा, प्रत्येकीं एक रुपया

३-९-० किरकोळ

यांत म. ऑ. खर्च ८२ वजा जातां

१- ४-० " सूर्यग्रहणनिमित्त " हस्तें ना. पां. नवरे, मुंबई

७- ८-० स्वयंसेवक भालचंद्र कृष्ण मेढेकर, सातारा, यांनीं जमविलेले

१- ४-० हरि पंढरीनाथ बाहिरट, पंढरपूर

१- ४-० नारायण C/O हरि पंढरीनाथ बाहिरट, पंढरपूर

१४५ श्रीसमर्थसेवक आप्पासाहेब आळतेकर, कऱ्हाड, यांचे मार्फत

१०० श्रीमंत बाळासाहेब पंतअमात्य

६० श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर

१६० यात १५ रुपये खर्च वजा जाता
१ श्रीसमर्थकृपा

३२६– १–० एकूण नवीन जमा
१०९१६–१४–३ मागील शिल्लक
११२४२–१५–३ एकूण जमा
२७३५– १–६ खर्च वजा
८५०७–१३–९ एकूण शिल्लक, पैकीं

१८९३-१०-६ धुळ्याचे पोस्टल बँकेंत
५००- ०-० चांफळ सोसायटींत ठेव
५६३२- ४ ० सत्कार्योत्तेजक सभेकडे ठेव
४८१-१५-३ चिटणीसाजवळ
८५०७ १३-९

## आजपर्यंत एकंदर रोख जमा रुपये १९३२८-१-९

सर्व श्रीसमर्थभक्तास कळविण्यास आनंद वाटतो कीं, जाबेस श्रीसमर्थ-मंदिराचें काम उत्तम रीतीनें चाललें आहे. जाबेपासून सुमारें पाऊण कोसावर दगडाची खाण सांपडली असून मंदिरास लागणारा बहुतेक सर्व दगड—खिडकी, पेटी, कोपरे, फरशी, हेदर, गळथे, घोडे, झापडी, वगैरे—निघाला असून तो मंदिराचे जागीं येऊन पडला आहे. दगड घडण्याचें काम चालू आहे. कांहीं खडी येऊन पडली आहे व आणखी येणें आहे. परतुर स्टेशनपासून सुमारें सात कोस जाब आहे. मार्ग शेतांतून व माळरानांतून असल्यामुळें पाऊस पडला म्हणजे गाडी जाणें बंद होतें. जाब निवळ खेडेगाव असल्यामुळें एकादा खिळा जरी लागला तरी परतुर, जालना किंवा औरंगाबाद येथें जावें लागतें. कांहीं कारागीर लोक धुळ्याहून पाठवावे लागले. जीर्णोद्धारनिधींतून सामान वाहण्यासाठीं दोन बैलगाड्या व दोन बैलांच्या जोड्या घ्याव्या लागल्या आहेत. चुना भाजण्याचें काम सुरू आहे. पाया चवदा फूट खोल घ्यावा लागला आहे. मुख्य मंदिराची जी जागा ती सबंध चवदा फूट खोल खणावी लागली आहे. वर पासून चार पांच फूट पांढरी माती आहे, मग तीन फूट काळी माती आहे, मग एकादा फूट वाळू

असून नंतर तीन फूट मुरुम व मग खालीं बहिरट (Soft rock) लागला आहे. आतां पाया भरण्यास हरकत नाहीं, असा तज्ज्ञाचा सल्ला पडल्यावरून एक दोन दिवसांत पाया भरण्याचें काम सुरू होणार आहे.

या पायांत दोन ठिकाणीं जुना पाया असल्याच्या खुणा सांपडल्या. त्या पायांत जे दगड निघाले ते निराळे रचून ठेवले आहेत. मंदिर उत्तराभिमुख होणार आहे. पाया हा असा आहे:




रा—म आणि दा—द या ठिकाणीं जुन्या पायाच्या खुणा होत्या. त्या वरील पांढऱ्या मातीपर्यंत च होत्या. "क" या जागी सात फूट खोलीवर खेळण्याची एक गोटी सांपडली. श्रीसमर्थांना लहानपणीं गोट्या खेळण्याचा छंद होता, असें प्रतापांत वर्णन आहे:

समर्थक्रीडेचें अद्भुत लक्षण । अष्ट जुतपति संवगडे जाण ।
गोट्या घोटें टिंचिती पूर्ण । येकेक सेर सेर संपूर्ण संभारें ॥ प्रताप २×१५

"त्या" जागीं चार साडे चार फूट खालीं आठ कवड्या व एक शिंप सांपडली. ती गोटी, त्या कवड्या, ती शिंप पूज्य वस्तु म्हणून राखून ठेवल्या आहेत. 'ण' या जागीं, वर, पाया भरल्यावर, श्रीसमर्थांच्या मूर्तीची स्थापना होणार !

मंदिर पूर्ण झाल्यावर, मूर्तिस्थापनेच्या समारंभाला सर्व जण येतील च, पण जसजसा पाया भरत जाईल, मंदिर वर येत जाईल, तसतसें त्या ठिकाणचें दर्शन घेण्याची उत्सुकता ज्यांना वाटेल त्यांनीं मधून मधून जावेंस अवश्य दर्शनास येत जावें, अशी विनंति आहे.

स्थापत्यविशारद वासुदेवराव गोगटे अत्यंत मेहनतीनें, काळजीनें

आणि निष्ठेनें काम करीत आहेत. मायब साहेब, मठांतील मडळी, पाटील, पटवारी, सर्व गावकरी यांचें उत्तम मदत होत आहे. वासुदेवरावांनीं सर्वांचें प्रेम व विश्वास ही संपादन केली आहेत.

हें सारें खरें, पण जमलेला निधी कमी कमी होत आहे. दरमहा त्यांत हजार पांचशांची भर पडत गेली पाहिजे. पावसकाळ संपतां च म्हणजे दिवाळी होतां च एक महिन्याचा कार्यार्थी श्री पामन नाईक साहेब, नामदार केशवराव, श्री. दिगंबरदास वगैरे जिम्मेदार यांच्या सल्ल्यानें त्या प्रांतांत औरंगाबाद, परभणी, जालना, नांदेड, हदूरखोपर, हिंगोली, खुद्द हैद्राबाद वगैरे मोठमोठ्या शहरीं दौरा काढावा असा विचार मनांत येत आहे. श्रीसमर्थांच्या कार्याला महाराष्ट्रांत पैशाची वाण कधीं च पडणार नाहीं. ठिकठिकाणच्या स्वयंसेवकांनीं अंतःकरणीं पूर्ण निष्ठा ठेवून अखंड सेवा चालविली पाहिजे. नवीन नवीन स्वयंसेवक पुढें आले पाहिजेत. प्रत्येक जिल्ह्यांत दहा वीस श्रीसमर्थांचे स्वयंसेवक असावेत. "तुमचें मन भजवरी बहुत आहे, ते तुमचे आवडीच्या गुणें कल्याण होईल, ऐसें नेमस्त चिन्ह दिसतें" ह्या श्रीसमर्थांचा महाराष्ट्रास आशीर्वाद आहे. त्याचें चरित्र, त्यांचे ग्रंथ, त्यांची शिकवण, त्यांचीं कार्यें यांविषयीं तरुणांनीं छंद घेऊन श्रीसमर्थांची कृपादृष्टि पुनरपि महाराष्ट्राकडे वळेल, असा अट्टाहास केला पाहिजे.

जांब
१८५१ वैशाख म १४
गुरुवार ता. ६।६।२९

शंकर श्रीकृष्ण देव

( १०६ )

## सज्जनगडावरील अष्टमीची सभा

जीर्णोद्धाराच्या कार्याला सुरवात झाल्यापासून दरसाल उत्सवाचे वेळीं श्रीसज्जनगडावर अष्टमीच्या दिवशीं तिसरा प्रहरीं श्रीसमर्थसंस्थानाधिपतीच्या अध्यक्षतेखालीं सभा भरत असते. तींत जीर्णोद्धारकार्याचा गतसालचा अहवाल सादर करण्यात येऊन पुढील वर्षाच्या कार्याची रूपरेखा आखण्यात येत असते. त्याप्रमाणें गेल्या उत्सवात अष्टमीचे दिवशीं ( ता. ३ ३ २९ रोजीं ) श्री. आबासाहेब महाराज यांच्या अध्यक्षतेखालीं सभा भरली होती. शिष्य-परिवारासह श्री. चौंडे महाराज, श्री. समर्थदास, श्री. बालाजी महाराज, श्री. नारायण बुवा वगैरे प्रमुख सांप्रदायी, श्री. आप्पासाहेब आळतेकर, पैसाफंडाचे प्रवर्तक अंताजीपंत काळे, देवदास रानडे वगैरे श्रीसमर्थाभिमानी मडळी व

इतर श्रीरामदासांकित भक्तजन सभेच्या ठिकाणीं उपस्थित झाले होते. परवानग्या अभावीं जीर्णोद्धारकार्य मंदावलें होतें, तें परवानगी मिळाल्यामुळें आतां सर्वांनीं जास्त उत्साहानें आणि नेटानें चालवावें, असें ठरलें. लागलींच निधी जमविण्याचें कार्य करण्यास सत्तावीस स्वयंसेवक पुढें सरसावले. त्यांपैकीं कित्येक जण तत्काळ कामास लागले हि. असे शंभर स्वयंसेवक पुढें आले पाहिजेत. ठिकठिकाणच्या निष्ठावंत स्वयंसेवकांनीं पत्रव्यवहार करावा व पावतीपुस्तकें, जाहिराती वगैरे मागवून घ्यावीं. अष्टमीच्या सभेंत तेथल्या तेथें जी वर्गणी जमली ती गडाच्या तटाच्या दुरुस्तीकडे लावावी, असें ठरलें. तेथल्या तेथें जमलेली रक्कमः—

२० स

१० अळटे बंधु, शिरसटवाडी

१० श्री. जानकीबाई गोखले

५ श्री. उमाबाई घाणेकर चाफळ

२ अंताजीपंत काळे

२ गोविंद विश्वनाथ बीडकर

२ रामचंद्र विष्णु कुळकर्णी, कासेगांव

१९ राजाराम दामोदर खरे, शंकर रघुनाथ राजोपाध्ये, तुकाराम रावजी यादव गुळुंब, तुकाराम धोंडी नलवडे वाडे, महादेव रामचंद्र नगरकर पुराणिक, श्री. भागीरथीबाई आफळे माहुली, मोरेश्वर नारायण नेवासकर चाळीसगांव, शंकर रामकृष्ण महाजन मालेगांव, विनायक गोविंद पुरोहित जबलपूर, गजानन विनायक जावळे दादर, नरहर यशवंत साकळकर ठाणे, दत्तात्रय रघुनाथ दुवाले, श्री. तानुताई सबनीस बुधपाचेगांव, दामोदर गोविंद भातखंडे दहिवडी, सौ. अंबुताई ताम्हनकर कोल्हापूर, स, श्री. राधाबाई परांजपे, दादा गोखले कल्याण, रामचंद्र महादेव पटवर्धन कल्याण, प्रत्येकीं एक रुपया

२-८ किरकोळ

७२-८

सदरहु रकम तटाचे दुरुस्तीकडे जमा करण्यासाठीं श्री. भाऊसाहेब सोमण वकील, सातारा, यांचे हवालीं ता. ५।३।२९ रोजीं करण्यांत आली.

तटाच्या दुरुस्तीचें काम बरें च झालें आहे, थोडें उरलें आहे. पुढील उत्सवाचे आंत तें निःसंशय पुरें होईल.

शंकर श्रीकृष्ण देव

( १०७ )

श्रीराम

# श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारकार्याचा

## जमाखर्च वगैरे



( १८५१ आषाढ व. ४ )

ता. २५–७–१९२९

### धुळें येथील जमाखर्च

**जमा**

५–०–० रा. नीळकंठ गणेश काळे मु. कुर्सा ब्रह्मपुरी, जि. चांदा, यांचे वडील ती. गणेश भट यांचे अंतकाळीं त्यांचे हस्तें संकल्प सोडला ते

०–८–० रा. यशवंत वामन साठये, मिरज

१–४–० श्री. दिगंबर गोपाळ आराध्ये पंढरपूर

१०-०-० श्री. व्यंकटाचार्य श्रीनिवासाचार्य उडपी, रामदुर्ग

१–०–० रा. भिकाजी धोंडदेव निगुडकर, एरंडोल

१–०–० शेट रामप्रताप शिवकरण सिंगी पोष्ट काटाफोड, होळकर स्टेट, हस्तें श्री. गोविंद

२–०–० रा. हनुमंत विष्णु गाडगीळ, मुंबई

**खर्च**

१०००-०-० स्थापत्यविशारद वासुदेवराव गोगटे यांजकडे जाबेस पाठविले ते
३०० ता. १८।६।२९
७०० ता. ११।७।२९
१०००

१७ ० ० छापणावळ, जीर्णोद्धाराच्या मोठ्या जाहिराती ता. २१।६।२९

८–० -० चुना पाडणारा वजारी जाबेस पाठविला त्यास जातांना दिले ता. १५।७।२९

१२ ० ० हुसेन वडार जाबेस पाठविला त्यास जातांना दिले ता. २०।७।२९

४ ११ ६ टपालखर्च

१०४१-११-६

५– ०–० श्री. बापु रंगनाथ जेजुरकर यांचा हस्ता, दभोई
२– ०–० व्ही. एन. कल्याणपुर, बंगलोर
१– ०–० 'निर्जला एकादशी' हस्तें श्री. ना. पां. नवरे, मुंबई
१– ०–० रा. सखाराम मोरेश्वर केळकर, केळशी ता. दापोली
५– ०–० रा. लक्ष्मण त्रिंबक केळकर, केळशी ता. दापोली
३०– ०–० श्री. अनंत सखाराम, अहमदाबाद यांचे मे, जून, जुलईचे
५– ०–० श्री. भीमदास विश्वंभर रामदासी, रामतीर्थ, फिनी, सं. अक्कलकोट
१– ०–० रा. हरि गणेश आंबेकर, ब्रह्मपुरी, सी. पी.
३– २–० रा. रामकृष्ण केशव घोंडे, परळ, मुंबई
२– ०–० रा. दत्तात्रय सीताराम जोशी, ग्रँटरोड, मुंबई
१– ४–० रा. व्यंकटेश रामचंद्र भोसेकर हस्तें रा. हरि पंढरीनाथ बहिरट, पंढरपूर
९– ०–० रा. सदाशिव कृष्ण ओक, वरंद ता. महाड
२५– ०–० श्री. वेंकटाचार्य श्रीनिवासाचार्य उडपी, रामदुर्ग
६– ८–० श्रीसेवक महादेव गोविंद डिके, इंदूर यांनीं जमविले ते
१४–१०–० श्रीसेवक सदाशिव महादेव शेट रेडिज, चिपळूण, यांचे मार्फत
　२　हरि गोविंद शेट साडविलकर
　३८१२ पांडुरंग ज्ञानोबा शेट रेळेकर, गोविंद कृष्ण शेट संसारे, व युनियन मोटार सर्व्हिस, प्रत्येकीं १८४
　३　नारायण गोविंद कडवेकर, सीताराम काशीनाथ शेट पायरे व बाळकृष्ण महाद शेट मुळे, प्रत्येकीं एक
　५८१४ किरकोळ ( मनीऑरडर खर्च पदरचा )
२–२ –० श्रीसेवक कृष्णाजी हरि कुळकर्णी, विटे यांनीं जमविलेले
१६–१४–० श्रीसमर्थसेवक गंगाधर केशव पिंगळे, इंदूर, यांचे मार्फत
　६ रा. गिर्दंबर गोपाळ दंडवते वकील, बाळकृष्णपंत किरकिरे, शंकरराव रामचंद्र, पंढरीनाथपंत घोडगांवकर, केशव रावजी रुद्र, हरि बळवंत आपटे, प्रत्येकीं एक
　४८२८६ धान्यभिक्षा
　६८११८६ किरकोळ
　८११८६ शिल्लक

७–८ –० श्रीसेवक भिषग्वर हरि रामचंद्र जोशी, आडिवरें, यांचे मार्फत
  २ चालक, श्रीराम औषधालय, आडिवरें
  २ कृष्ण मुकुंद शेट संसारे, सांटवली
  ३ सीताराम नारायण पंडित, सांटवली; विनायक सदाशिव पराडकर, रुण; सदाशिव विश्वनाथ पाध्ये मोघे, रुण; प्रत्येकीं १
  ०–८ गणेश अनंत मोघे, रुण
१०–० –० श्रीसज्जनगडपारपत्याधिकारी वासुदेवराव मंत्री यांचे कडून
१४६–१२–८ धुळें पोष्ट ऑ. से. बँकेचें ता. १।४।२९ पर्यंत व्याज ता. १३।६
१–० –० श्रीसमर्थकृपा

३०६– ८– ८ एकूण नवीन जमा
८५०७-१३- ९ मागील शिल्लक
८८१४- ६- ५ एकूण जमा
१०४१-११- ६ खर्च वजा
७७७२-१०-११ एकूण शिल्लक, पैकीं

९७०- ७- २ धुळयाचे पोस्टल बँकेंत
५००- ०- ० चाफळ सोसायटींत ठेव
५६३२- ४- ० सत्कार्योत्तेजक सभेकडे ठेव
६६९-१५- ९ चिटणीसा जवळ
७७७२-१०-११

## आजपर्यंत एकंदर रोख जमा रुपये १९६३४–१०–५



## श्रीसज्जनगडावरील जमाखर्च

| जमा | खर्च |
|---|---|
| २९१-९-५ शिल्लक | २९१-११ ५ चाफळ मंदिराचे सभामडपावर पत्रे घातले ते वेळीं कै. बापुसाहेब महाराज यांस |
| ७ ९-० गडावर पेटींतून | |
| २-०-० गोपाळ गणेश वाळिंबे निनाम | |

| | | | |
|---|---|---|---|
| २ ०-० | वि. वा. फडके, सातारा | १३- ८-० | गडावरील तळ्यांतील गाळ काढविला त्याबद्दल मजुरी |
| १०-००० | सदाशिव अंबादास देवरणकर गुरव उमरावती | ०- ९-० | महादरवाजावरील झाडें तोडणेंस मजुरी |
| ५-०-० | नरसिंगदास बद्रीनारायण सोनी शेट—सोलापूर | १- ६-० | टपाल खर्च |
| | | १०- ०-० | धुळ्यास पाठविले |
| ३१८-२-५ | | ३१७- २-५ | |

याप्रमाणें गडावर फक्त एक रुपया शिल्लक ठेऊन श्रीसमर्थसेवक वासुदेवराव मंत्री यांनीं गडावरील जमाखर्च पुरा केला आहे.

श्रीसमर्थांच्या सर्व स्वयंसेवकांनीं जांबेच्या श्रीसमर्थमंदिराची चिंता केली पाहिजे, अशी प्रार्थना आहे.

धुळें
१८५१ आषाढ व. ४ } शंकर श्रीकृष्ण देव

## ( १०८ )

# श्रीसमर्थांनीं
# महाराष्ट्रांत प्रवृत्त केलेलें नवीन युग

( लेखक—महाराष्ट्रधर्मकार मा. वा. भट )

श्रीसमर्थ रामदासस्वामींचे ग्रंथ व त्यांतल्या त्यांत श्रीमद्दासबोध याकडे महाराष्ट्रांतील तरुण पिढींतील विश्वविद्यालयीन पदवीधरांचें लक्ष्य अलीकडे वेधलें जाऊं लागलें आहे, ही मोठी समाधानाची गोष्ट आहे. कोणत्या हि विषयाच्या अभ्यासास नवीन च सुरवात करण्यांत आली म्हणजे अभ्यासकाच्या मनांत त्या विषयाविषयीं नूतन विचाराचा प्रादुर्भाव होऊं लागतो व अभ्यासक ख्यातिलोलुप असला, तर त्याच्या मनांत आलेले विचार जगास तत्काल निवेदन करावे, असें त्यास वाटूं लागून तो आपले विचार प्रकट करण्यास सुरवात करितो. विषयाचा अभ्यास साग्र व गाढ झाला नसल्याकारणानें व त्या विषयाच्या पूर्वपरंपरेनें हि यथास्थित ज्ञान नसल्या कारणानें वरील प्रकारच्या अभ्यासकाचे विचार अर्थात् च उथळ व अपरिपक्व असतात; तथापि अशल्या प्रकारच्या

विचारप्रदर्शनाचा खेद वाटू न देतां त्यावद्दल आनंद मानून अभ्यासक-वर्गांत एका नूतन अभ्यासकाची भर पडल्याबद्दल नूतन अभ्यासकाचें अभिनंदन करणें च योग्य आहे. सुरवातीस असत्य मतप्रतिपादनाचा दोष नूतन अभ्यासकाच्या हातून होणें स्वाभाविक आहे. परंतु अखेर होणाऱ्या लाभावर नजर देऊन नूतन अभ्यासकाची वरील प्रवृत्ति एक इष्टापत्ति च समजली पाहिजे.

समर्थांनीं राजकारणाचा उपदेश केला आहे किंवा नाहीं, अगर ते राजकारणी होते अगर नव्हते, असल्या प्रकारचे प्रश्न महाराष्ट्रीय जनतेपुढें प्रस्तुत कालीं चर्चेचे विषय झाले आहेत. एकादी महान् गतकालीन व्यक्ति ज्या समाजांत निर्माण झाली, त्या समाजांत तिनें कोणतें महत्कार्य केलें, या उपयुक्त व महत्वाच्या प्रश्नाची चर्चा न करितां, त्या व्यक्तीचीं एकाद्या विशिष्ट विषयासंबंधीं मतें कोणत्या स्वरूपाचीं होतीं अशा एकांगी स्वरूपाच्या प्रश्नाची चर्चा सुरू झाल्यास हातून दोष घडण्याचा संभव फार असतो.

तथापि एकदां असल्या एकांगी प्रश्नाची चर्चा होण्यास सुरवात झाल्या-नंतर त्या व्यक्तीविषयीं उत्पन्न होणारा विपरीत ग्रह दूर करण्याचा उत्तम मार्ग म्हटला म्हणजे त्या महान् व्यक्तीनें केलेल्या महत्कार्याचें दिग्दर्शन करणें हा होय. या तत्वास अनुसरून वरील प्रकारची एकांगी प्रश्नाची चर्चा सुरू असतां च, श्रीसमर्थांनीं महाराष्ट्रांत केलेल्या महत्कार्याचें स्थूल स्वरूप प्रस्तुत लेखांत दिग्दर्शित करण्याचें आम्ही योजिलें आहे.

श्रीसमर्थ रामदासस्वामी शालिवाहनाच्या सोळाव्या शतकांत उदयास आले. त्यांच्या जन्मकालीं महाराष्ट्रीय समाजाची धार्मिक, राजकीय व सामाजिक स्थिति अत्यंत हीन स्वरूपाची होती. त्यांच्या आयुष्याच्या उत्तरार्धांत महाराष्ट्राच्या या स्थितींत महदंतर घडून आलें. परराज्याच्या ठिकाणीं स्वराज्य अवतरलें; पारतंत्र्य विलयास जाऊन स्वातंत्र्य उदयास आलें; श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माची पायमल्ली होण्याचें बंद पडून त्या धर्माची पताका सर्वत्र फडकूं लागली; दारिद्र्याच्या ऐवजीं सुबत्ता महाराष्ट्रांत नांदूं लागली. हें सर्व स्थित्यंतर घडून येत असतां दोन महान् व्यक्ति महाराष्ट्र देशांत दोन निरनिराळ्या प्रकारच्या उद्योगांत गढून गेलेल्या वावरत होत्या. या दोन व्यक्ति म्हटल्या म्हणजे श्रीसमर्थ रामदास स्वामी व छत्रपति श्रीशिवाजी महाराज या होत. शिवाजी महाराजांनीं स्वराज्याची स्थापना करून

सर्व महाराष्ट्रभर स्वराज्याचा प्रसार केला. हें कार्य अपार संपत्तीच्या सहाय्यानें संपादित केलेल्या पायदळ, घोडदळ, आरमार इत्यादि युद्धविषयक साधनांच्या योगानें छत्रपति शिवाजी महाराजांनीं सिद्ध केलें. ज्या कालांत छत्रपतींचें हें कार्य सुरू होतें, त्या कालांत महाराष्ट्रीय जनतेचीं अंतःकरणें वेधणारें वाङ्मय निर्माण करण्यांत, त्या वाङ्मयाच्या प्रसारार्थ योग्य प्रकारचे शिष्य तयार करण्यांत व सर्व भरतखंडभर त्या शिष्यांकरवीं मठस्थापना करून त्या वाङ्मयाचा प्रसार करण्यांत समर्थ रामदास स्वामी हे गढून गेल्याचें दिसून येतें. हीं कार्यें समर्थ करीत असतां त्या बरोबर च श्रीहनुमान् व श्रीराम या देवतांच्या उपासनेचा प्रसार सर्व महाराष्ट्रभर करण्याचें कार्य श्रीसमर्थ रामदासांनीं चालू ठेविलें होतें. गगनास भेदून जाईल अशा प्रकारचा रामकथेचा गजर, कीर्तन व वाङ्मय यांच्या द्वारां, श्रीसमर्थांनीं आपल्या शिष्यांकरवीं सर्व महाराष्ट्रभर केला. महाराष्ट्रांतील प्रत्येक खेड्यांतील माणसास रामचरितामृत पाजून रावण व त्याचे रजनीचर अनुयायी जनतेस त्रस्त करीत असतां गतकालीं ज्या प्रमाणें परमेश्वरानें रामावतार धारण करून त्रस्त झालेल्या जनतेची मुक्तता केली, त्या च प्रमाणें धर्मराज्य स्थापन करण्याकरितां परमेश्वर महाराष्ट्रांत अवतार धारण करणार आहे व तो त्रिविध तापानें ग्रस्त झालेल्या महाराष्ट्रीय जनतेची मुक्तता करणार आहे, ही भावना महाराष्ट्रीय जनतेच्या अंतःकरणांत समर्थांनीं स्थापित केली. समर्थांनीं राजकारणाचा उपदेश केला नाहीं व ते राजकारणी नव्हते व समर्थ राजकारणी होते व त्यांनीं राजकारणाचा उपदेश केला, असें प्रतिपादन करणाऱ्या दोन्ही पक्षांस समर्थांनीं निर्माण केलेली घटना ( जी मुबलक ऐतिहासिक पुराव्यांनीं सिद्ध झालेली आहे ) नाकबूल करून भागावयाचें नाहीं. वेड्याच्या कोर्टांत जमा असलेले लोक एका बाजूस वगळून बाकीच्या मानवी प्राण्यांच्या कृतीचा विचार केला असतां सर्वत्रांच्या अनुभवास व निरीक्षणांत जी एक गोष्ट येते, ती ही कीं, कोणता हि मनुष्य जी कांहीं कृति करितो ती विशिष्ट प्रकारचा हेतु साध्य करण्याच्या बुद्धीनें उद्युक्त होऊन व तो हेतु ज्या साधनांच्या योगानें उत्तम प्रकारें सिद्ध होईल त्या साधनांचा आश्रय करून करीत असतो. समर्थांच्या ठिकाणीं अलौकिक चातुर्य होतें, ही गोष्ट समर्थांनीं राजकारणाचा उपदेश केला नाहीं अगर ते राजकारणी नव्हते हें मत प्रतिपादन करणाऱ्या पक्षास हि मान्य आहे. तेव्हां स्वाभाविकपणें च असा प्रश्न उत्पन्न होतो कीं लग्न करावें, पोटाचा

उद्योग करावा, संसार करावा आणि एके दिवशीं मरून जावें, या घोपट मार्गानें कोट्यवधी लोक जात असलेले पाहात असतां त्या मार्गानें न जातां लग्नांतून फडकून समर्थांनीं भरतखंडभर शेंकडों ठिकाणीं आपल्या शिष्यांकरवीं मठस्थापना करण्याचा व रामकथेचा गगनास भेदून जाणारा प्रचंड गजर करण्याचा उद्योग काय हेतूनें केला? समर्थांनीं हा सर्व खटाटोप कोणताहि हेतु सिद्ध करण्याची अपेक्षा न बाळगितां निवळ अकारण, अहेतुकपणें केला असें म्हणणें शहाणपणाचें होईल काय? अशा स्थितींत, छत्रपति शिवाजी महाराज वर दर्शविलेल्या स्वरूपाच्या खटपटी करण्यांत गढले असतां त्या च काळांत समर्थांच्या वरील स्वरूपाच्या खटपटी कोणत्या हेतूनें केल्या जात होत्या, याचा सोपपत्तिक उलगडा करणें प्राप्त आहे.

हा उलगडा शास्त्रशुद्ध रीतीनें करावयाचा म्हणजे कांहीं सिद्धांतवत् गोष्टी प्रथम लक्षांत बाळगणें जरूर आहे. मनुष्यप्राणी हा निवळ एकांगी नाहीं. मन व कर्मेंद्रियें यांनीं तो युक्त आहे. कर्मेंद्रियांचें प्रवर्तन मनानें होतें व मन हें विचाराच्या किंवा विकाराच्या तंत्रानें वागत असतें. कोणत्या हि मानवी प्राण्याचें एक विशिष्ट प्रकारचें आचरण होत असल्याचें आपल्या निदर्शनास येत असतां त्यांत एकाएकीं फरक झाल्याचें आपल्या दृष्टोपत्तीस आलें, तर त्या माणसाच्या आचरणांत फरक घडण्यापूर्वी त्याची मानसिक क्रांति घडली असली पाहिजे, असें बिनचूक अनुमान करण्यास हरकत नाहीं. जो न्याय व्यक्तीस तोच समष्टिरूप समाजासहि लागू आहे. शिवाजी महाराजांचें साहस, त्याचें शौर्य, त्यांची अचाट युद्धोपयोगी सामुग्री यांच्या जोरावर फक्त त्यांनीं स्वराज्याची स्थापना केली, असा सिद्धान्त कोणी प्रतिपादिल्यास तो क्वचित् च मान्य होईल. शिवाजी महाराजानीं केलेल्या कार्याचें यथार्थ स्वरूप लक्षांत येण्याकरितां त्यांच्या आरम्भाचें स्वरूप विसरून चालावयाचें नाहीं. त्याच्या आरम्भाचें स्वरूप दृष्टिआड ठेवून त्यांच्या कृतीचें परीक्षण करणें म्हणजे मानवी कृतीच्या उपपत्तीविषयीं आपलें अज्ञान प्रगट करण्यासारखें आहे. शिवाजी महाराज उदयास येण्यापूर्वी त्याचे वडील शहाजी राजे व त्या च प्रमाणें त्यांचे आजे मालोजी व लुकजी जाधव व यां सारखे दुसरे अनेक पराक्रमी पुरुष, शौर्य, वीर्य, युद्धोपयोगी सामुग्री, संपन्नता इत्यादि बाबतींत शिवाजी महाराजांच्या तोलाचे महाराष्ट्रांत होऊन गेले. परंतु त्यांपैकीं कोणी हि स्वराज्यसंस्थापक होऊं शकला नाहीं. याचें कारण उघड हें आहे

कीं, शिवाजी महाराजांच्या देहांत ज्या विशिष्ट स्वरूपाचा आत्मा वास करीत होता, तशा प्रकारचा आत्मा वरील व्यक्तींच्या ठायीं नव्हता हें होय. या च न्यायानें शिवकालीं महाराष्ट्रांत झालेल्या क्रांतीचा विचार करावयाचा म्हणजे शिवाजी महाराजांच्या नुसत्या भौतिक साधनाचा विचार करून भागावयाचें नाहीं, छत्रपतिकालीन महाराष्ट्रीय जनतेचा आत्मा कोणत्या स्वरूपाचा होता, या महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार करणें अवश्य आहे. जनतेच्या आत्म्यात स्थित्यंतर झाल्यानें असत अल्प काळांत राष्ट्रात भयकर उलाढाली कशा प्रकारच्या होतात, याचें ताजें उदाहरण आपल्या डोळ्यासमोर या घटकेस घडत आहे. दीड दोन वर्षांपूर्वी जो अमीर मोठ्या दिमाखानें व वैभवसपन्नतेनें सर्व जगभर भिरवीत गेला, त्याची स्थिति अवघ्या एका वर्षांत कशा प्रकारची झाली, हें आपण प्रत्यक्ष पाहात आहों. कुलाबा स्टेशनवर उतरल्या बरोबर तोंड लपवीत अमानुल्लास ताजमहाल हॉटेल गाठावें लागलें. सर्व अफगाण जनतेचा आत्मा बदलल्या बरोबर अमीर अमानुल्लाच्या तोफा, बदुका, सैन्य, विमानें इत्यादि विपुल भौतिक साधनें निरुपयोगी ठरून अफगाणिस्तानातून हिंदुस्तानच्या सरहद्दीकडे पळता पळता त्यास भुई थोडी झाली. हा सर्व प्रभाव अफगाण राष्ट्राच्या आत्म्यात झालेल्या स्थित्यतराचा होय. इस्लाम संस्कृतीस जीव की प्राण वाटणाऱ्या बाबींचा नायनाट करण्यास अमानुल्ला सज्ज झाला आहे, असें अफगाण राष्ट्राच्या मनानें घेतां च ज्या अफगाण राष्ट्रानें अमानुल्लास आपल्या डोक्यावर घेतलें होतें, त्या च राष्ट्रानें त्यास आपल्या पायाखालीं तुडविण्यास कमी केलें नाहीं. हा सर्व प्रभाव अफगाण राष्ट्राच्या आत्म्यात झालेल्या स्थित्यंतराचा आहे, ही गोष्ट नाकबूल करणें कोणास हि दुरापास्त होईल.

समर्थकालातील महाराष्ट्रीय जनता दोन अडीचशें वर्षें मुसलमानी राजसत्तेखालीं दडपून जाऊन त्या राजसत्तेकडे वाकड्या नजरेनें पाहाण्याचें तिला कधीं धैर्य झालें नाहीं. ती च जनता समर्थांच्या कालीं मुसलमानी राजसत्ता उलथून पाडण्यास कोणत्या कारणानें उद्युक्त झाली, याचा ऐतिहासिक दृष्टीनें शोध करणें अत्यत महत्त्वाचें आहे. समर्थकालीं घडून आलेली क्रांति महाराष्ट्राच्या आत्म्यात झालेल्या स्थित्यतरामुळें घडली असली पाहिजे, असें अनुमान वरील अफगाणिस्थानच्या दृष्टान्तावरून सहृदयांनीं करण्यास हरकत नाहीं. राजसत्ताधिकाऱ्याशीं युद्ध करून त्याना पराभूत करणें

हा राज्यक्रांतींत जितका महत्त्वाचा भाग आहे, त्या हि पेक्षां परसत्तेखालीं दडपलेल्या राष्ट्राच्या आत्म्यात स्थित्यंतर घडवून आणून परकीयांच्या जुलमाखालीं तुडविल्या जाणाऱ्या प्रजेस स्वराज्योन्मुख करणें हें कार्य अधिक महत्त्वाचें असतें. समर्थ उदयास येण्यापूर्वी महाराष्ट्रियांची मनोरचना कोणत्या स्वरूपाची होती व स्वराज्यस्थापनेच्या वेळीं तींत कोणत्या प्रकारचें स्थित्यंतर घडवून आणण्यांत आलें, याचें दिग्दर्शन प्रथम करून नंतर या स्थित्यंतराशीं श्रीसमर्थांचा संबंध कसा येतो, हें आम्ही दर्शविणार आहोंत.

देवगिरीच्या यादवांची राजसत्ता महाराष्ट्रांत नष्ट होऊन त्या ठिकाणीं मुसलमानांनीं आपली राजसत्ता स्थापित केल्यापासून तों समर्थ व छत्रपती यांचा उदय महाराष्ट्रांत होईपर्यंत महाराष्ट्रियांची मनोरचना कशा प्रकारची होती, हें प्रथम नमूद करितों. मुसलमानाची सत्ता स्थापित झाल्यानंतर महाराष्ट्रीय समाजाच्या विचारवंत पुढाऱ्यांस महाराष्ट्रांत कलियुग अवतरल्याचें भासूं लागलें असें त्या काळच्या वाङ्मयांत त्यांनीं प्रकट केलेल्या विचारावरून दिसून येतें. ज्ञानेश्वरकाळापासून तों समर्थकाळापावेतों महाराष्ट्रांत अनेक संत कवि होऊन गेले. या संतकवींच्या वाङ्मयावरून महाराष्ट्राच्या विचारवंत पुढाऱ्यांची व सर्व साधारण सामान्य प्रतीच्या महाराष्ट्रीय जनतेची मनोरचना मुसलमान राजसत्तेच्या काळांत कशा प्रकारची होती, याची यथायोग्य कल्पना आपणांस करतां येते. महाराष्ट्रियांच्या मनोरचनेचें हें दिग्दर्शन करण्यापूर्वी सुरवातीस युगकल्पना व त्या कल्पनेचा भरतखंडांतील जनतेच्या मनावर असणारा पगडा याचा खुलासा करणें इष्ट आहे. युगाची कल्पना फार पुरातन काळापासून आपल्या लोकांत रूढ आहे. कृत, त्रेता, द्वापर व कलि अशीं चार युगें असून युगपरत्वें मानवी प्राण्याचे धर्म बदलतात, त्या च प्रमाणें मानवी समाजाची स्थिति उचनीच होते, अशा प्रकारचीं वर्णनें महाभारत, मनुस्मृति व पुराणें इत्यादि ग्रंथात आहेत व भरतखंडांतील अगदीं सामान्य प्रतीच्या माणसास या युगविषयक कल्पना पूर्ण परिचित असून त्या त्याच्या मनावर पूर्णपणें बिंबलेल्या असतात. विष्णुपुराणाच्या सहाव्या अध्यायाच्या सुरवातीस कलियुगाचें साग्र व तपशिलवार वर्णन केलेलें आहे. त्यापैकीं कांहीं भाग आम्ही खालीं देतों. असें करण्यांत हेतु इतका च आहे कीं, या उताऱ्यांतील विचारांचें च हुबेहुब प्रतिबिंब पुढें आम्हीं ज्या महाराष्ट्रीय संतकवींचे उद्गार देणार आहोंत त्यांत उमटलेले दिसणार आहे.

" कलियुगामध्यें मनुष्यांची प्रवृत्ति वर्ण आणि आश्रम यांस उचित अशा आचाराकडे नसते. तसेंच ऋग्वेद, यजुर्वेद, आणि सामवेद यांत सांगितलेलीं जीं कर्मे तीं करणें हा हि त्या प्रवृत्तीचा हेतु नसतो. कलियुगांत विवाह धर्मास अनुसरून होणार नाहीं. तसेंच गुरु व शिष्य यांची हि मर्यादा राहणार नाहीं. पति आणि पत्नी हे हि परस्परांशीं अव्यभिचारानें वागणार नाहींत व अग्नि आणि देवता यांची पूजा हि यथाविधि होणार नाहीं. हे मैत्रेया, कलियुगांत कोणतें हि वचन असलें तरी तें शास्त्र च होऊन बसेल. तसें च सर्वांस देवतात्व येऊन कोण इवे ते कोणत्या हव्या त्या आश्रमाचा स्वीकार करितील. कलियुगामध्यें थोड्याशा द्रव्यानें हि मनुष्यास संपत्तीचा गर्व चढेल आणि स्त्रियांस हि केवळ केशांच्याच योगानें सौंदर्यमद उत्पन्न होईल. कारण, सुवर्ण, माणिक्य, रत्नें आणि वस्त्रें यांचा कलियुगांत क्षय होऊन गेला असतां त्यावेळीं स्त्रिया ह्या केवळ केशरूपी च अलंकारानें अलंकृत होतील. स्त्रिया ह्या पति द्रव्यहीन झाल्यावर त्याचा त्याग करतील. तसें जो द्रव्यवान असेल तो च कलियुगांमध्यें स्त्रियांचा भर्ता होईल. कलियुगामध्यें स्त्रियांस सौंदर्याची इच्छा होऊन त्या स्वैरिणी बनतील. तसें च पुरुषांस हि अन्यायाचें केवळ माहेरघर असें च वित्त मिळविण्याविषयीं इच्छा उत्पन्न होईल. ब्राह्मण हे आपणासारखे च मनुष्य आहेत असें ब्राह्मणेतरांस वाटूं लागेल. तसें च केवळ दूध देतात म्हणून च गाईचें महत्व वाटेल. त्याचप्रमाणें त्या वेळीं अवर्षणें पडल्यामुळें क्षुधेच्या भीतीनें पीडित होऊन प्रायः सर्वच हि प्रजा आकाशाकडे दृष्टि लावून बसतील. त्या वेळीं अवर्षणामुळें अत्यन्त कष्टी झालेले लोक तपस्वी मनुष्यांप्रमाणें कंद, फळें, पानें इत्यादिकांचा आहार करून आत्मघात करितील. त्यावेळीं सार्वकाल दुर्भिक्ष च राहील व सुख आणि आनंद यांचा लोप पावून सर्व हि मनुष्यें त्या वेळीं असमर्थ होऊन क्लेश पावतील. कलियुगांत मनुष्यें स्नान केल्यावांचून हि भोजन करितील, अग्नि, देवता व अतिथि यांचें हि पूजन करणार नाहींत आणि पितरांचीं श्राद्धें हि करणार नाहींत. तसें च कलियुगामध्यें स्त्रिया हि अत्यंत लोभिष्ट, गिड्डया, पुष्कळ अन्न खाणाऱ्या, पुष्कळ संतति असणाऱ्या व भाग्यहीन अशा होतील. तसेंच त्या दोन्ही हातांनीं आपलें मस्तक खाजविणाऱ्या अशा होऊन वडील मनुष्यें आणि पति ह्यांच्या आज्ञेचा अनादरपूर्वक भंग करितील. तसें च कलियुगांत राजे हि लोकांचें रक्षण न करितां करांच्या मिषानें द्रव्याचें हरण करणारे व लोकांच्या विचाचा अपहार करणारे होतील. वैश्य हे हि कृषि व वाणिज्य इत्यादिक आपल्या कर्मांचा त्याग

करून व शिल्प कर्मांनीं उपजीविका करूं लागून शूद्रवृत्तीनें च वागूं लागतील. व शूद्र हि संन्याशाचें वेष धारण करणारे, नीच, भिक्षेवर निर्वाह करणारे, पाखंडीपणाच्या वृत्तीचा आश्रय करणारे व संस्कारशून्य असे होतील. तसें च प्रजा हि दुर्भिक्ष आणि राजाचे कर ह्यांच्या पीडेनें अत्यन्त त्रासून जाऊन व अतिशय दुःख पावून गहूं आणि सातू यांनीं संपन्न अशा परदेशांत जाऊन राहतील. तदनंतर वेदमार्ग नष्ट होऊन लोक पाखंडी झाले असतां अधर्माच्या वृद्धी मुळें मनुष्याचें आयुष्य कमी होईल. तसें च लोक हे पाखंडपणानें ग्रस्त होऊन जाऊन "देव घेऊन करावयाचें काय! ब्राह्मण हवेत कशाला? वेदांचें कारण काय? आणि पाणी घेऊन स्वच्छता तरी करावयाची कशाला!' याप्रमाणें विरुद्ध प्रकारची बडबड करूं लागतील. पर्जन्य थोडा पडूं लागेल, धान्यें हि थोडीं च पिकूं लागतील व फळें हि प्रायः निःसत्व होऊं लागतील. कलियुगामध्यें प्रायः श्वश्रू आणि श्वशुर (सासु सासरे) हीं च वडील मनुष्यें होतील आणि पत्नीचे बंधु व पत्नी हे च काय ते आप्तइष्ट होतील."

मुसलमानांची राजकीय सत्ता ज्ञानेश्वरकालानंतर थोडक्या च दिवसांत महाराष्ट्रांत स्थापन झाल्या कारणानें व मुसलमानी धर्माचा प्रसार हें च त्यांच्या राजकीय सत्तेचें ध्येय असल्या कारणानें महाराष्ट्रांतील जनतेवर मुसलमानांचा अनन्वित जुलूम होऊं लागला. तरवारीच्या जोरावर कित्येक महाराष्ट्रियांस मुसलमानी धर्माची दीक्षा दिली गेली. धार्मिक बाबतींत महाराष्ट्रीय प्रजेची गांजणूक अनेक प्रकारांनीं होऊं लागली. मुसलमान राजकर्त्यांचें अनुकरण करण्याच्या बुद्धीनें महाराष्ट्रांतील ब्राह्मणक्षत्रियादि वर्णांचे लोक आपले स्वधर्माचार सोडून देऊन मुसलमानी आचार व चालीरीति स्वीकारूं लागले. हे सर्व प्रकार हरहमेष दृष्टीस पडूं लागल्यामुळें व पुराणांतरीं वर्णिलेल्या वरील प्रकारांशीं त्याचें बरेंच साम्य असल्या कारणानें पुराणांतरीं वर्णिलेलें कलियुग खरोखर च अवतरलें, अशी महाराष्ट्रांतील विचारवंत पुढाऱ्यांची समजूत झाली. ज्ञानेश्वरकालापासून तों समर्थकालापर्यंत मुसलमानी अमलाचा जितका काळ गेला, त्या काळांत महाराष्ट्रियांच्या कलियुगविषयक कल्पना कोणत्या स्वरूपाच्या होत्या व महाराष्ट्रीय समाजाची मनोरचना कशा प्रकारची होती हें दर्शविणारे कांहीं प्रमुख संतकवींचे उद्गार आम्ही प्रस्तुत स्थळीं नमूद करितों.

( १ ) नामदेवांचे उद्गारः—

ऐका कलियुगींचा आचार। अधर्मपर झाले नर॥ ये कलिमाझारी। पुत्र पित्याचे वैरी॥ आणिक एक वर्तेल अपवित्र। ब्राम्हण सांडितील वेदमंत्र। आचार सांडूनि होती शूद्र। ऐसे अपवित्र कलियुगीं॥ थोर वर्तमान पडेल काळु। चहूं वर्णांचा होईल एकचि मेळु। कोणी कोणाचा न धरिती विटाळु॥

नामदेवांनीं कलियुगाचें याप्रमाणें वर्णन करून त्यांच्या काळच्या समाजस्थितीचें चित्र खालील ओव्यांत काढलें आहे.

देवा पाप छळें कांपते मेदिनी। षट्कर्मे ब्राह्मणीं सांडियेली॥ दैत्यांचेनि भारें दाटली अवनी। प्रथम चरणीं कलियुगीं॥ पाखांडी वेदांते न मानिती बळी। अधर्म प्रवर्तला महीतळीं। ऐसीं पापें कळीं थोर झालीं॥ म्हणोनियां जिवें त्रासु घेतला। सत्य लोपलें धर्म बुडाला। अज्ञानि काय पाहतोसि उगला। यांचें विठ्ठला म्हणे नामा॥

( २ ) मुसलमानाची सत्ता महाराष्ट्रांत ज्या काळीं कळसास पोहोंचली होती त्या काळीं एकनाथ संत होऊन गेले. कलियुगाविषयीं एकनाथांच्या कल्पना काय होत्या यांचें उत्तम दिग्दर्शन त्यांच्या खालील उद्गारांत दृष्टोत्पत्तीस पडतें:—

कलीं वाढलासे अधर्म। ब्राह्मण सांडिती आपुलें कर्म॥ शुद्ध याति असोनि चित्त। सदा नीचाश्रय करीत॥ देवपूजा नेणे कर्म। न घडे स्नानसंध्या धर्म॥ ऐसा कलीचा महिमा। कोणी न करी कर्माकर्म॥ एकाजनार्दनीं शरण। घडो संतसेवा जाण॥

कलियुगामाजी थोर जालें पाषांड। पोटासाठीं संत जाले उदंड। नाहीं विश्वास संतदया मानसीं। बोलती वांयांविण सौरस अवघा उपहासी॥ वेद पठन शास्त्र संभाषे पुराणमत। अवघे घोंघोनि ठेविती बोलती वाचाळ मत्त॥ देव भजन संत पूजन तीर्थ महिमा न कळे मूढा। ऐसे कलियुगीं जाले जाणत जाणत दगडा॥ एकाजनार्दनीं कायावाचा राम जपा। सोपें हें साधन तेणें नोहे पुण्यपापा॥

( ३ ) आतां समर्थांच्या पूर्ववयांत महाराष्ट्रांत उदयास आलेले वैराग्यसंपन्न संत श्रीतुकाराम यांनीं केलेल्या कलियुगाच्या वर्णनाचे कांहीं नमुने खालीं देतों:—

हातीं होन दावीती वेना। करिती लेंकींच्या धारणा॥ ऐसे धर्म झाले कलीं। पुण्य रंक पाप बळी॥ सांडिले आचार। द्विज चाहाड झाले चोर॥ टिळे लपविती पातरीं। लेती विजारा कातरीं॥ बैसोनिया तक्तां। अन्यायेविण

पिडिती लोकां ॥ मुदबख लिहिणें । तेलतुपसाखण केणे ॥ नीचाचे चाकर । चुकलिया खाती मार ॥ राजा प्रजा पीडी । क्षेत्री दुश्चितासी तोडी ॥ वैश्य-शूद्रादिक । हे तों सहज नीच लोक ॥ तुका म्हणे देवा । काय निद्रा केली धावा ॥

त्या काळच्या महाराष्ट्रीय समाजाच्या स्थितीचे निदर्शक या हि पेक्षां तुकाराम महाराजांचे चरख उद्गार आम्ही खालीं देतों. तुकाराम महाराजांना ज्या गोष्टी समाजांत प्रत्यक्ष दिसत होत्या त्यांचें हुबेहुब चित्र त्यांनीं काढलें असून त्यास च त्यांनीं कलियुग असें म्हटलें आहेः—

पाहा हो कलिचें महिमान । असत्यासी रिझलें जन । पापा देती अनु-मोदन । करिती हेळण संतांचें ॥ ऐसें अधर्माचें बळ । लोक झकविले सकळ । केलें धर्माचें निर्मूळ । प्रळयकाळ आरंभला ॥ थोर या युगाचें आश्चर्य । ब्रह्मकर्म उत्तम सार । सांडूनियां द्विजवर । दावलपीर स्मरताती ॥ राहिले वर्णाश्रमधर्म । अन्योन्य विचरती कर्म । म्हणवितां रामराम । श्रम महा मानिती ॥ विषयलोभासाटीं । सर्वांविसीं प्राण साटी । परमार्थी पीठ मुठी । मागतां उठती सुनींसी ॥ धनाढ्य देखोनि अनामिक । तयातें मानिती आवश्यक । अपमानिले वेदपाठक । सात्विक शास्त्रज्ञ संपन्न ॥ पुत्र ते पितिया-पाशीं । सेवा घेती सेवका ऐसी । सुनांचिया दासी । सासा झाल्या आंदण्या ॥ बहुत पाप झालें उचंबळ । उत्तम न म्हणती चांडाळ । अभय भक्षिती विटाळ । कोणी न धरती कोणाचा ॥ कामिनी विटंबिल्या कुळवंती । वदनें दासीचीं चुंबिती । सोंवळयाची स्फीती । जगीं मिरविती पवित्रता ॥ मद्यपानाची सुराणी । नवनीता न पुसे कोणी । केळवल्या व्यभिचारिणी । दैन्यवाणी पति-व्रता ॥ अर्धीके धान्यें दिवस दिवसें । गाई म्हैसी चेवल्या गोरसें । नगरें दिसती उदासें । पिकली बहुवसें पाखांडें ॥ गीता लोपली गायत्री । भरलें चमत्कार मंत्रीं । अश्वाचियेपरी । विकिती कुमारी वेदवक्ते । वेदाध्ययन-संहिताऋचि । भकांधा करिती तयांची । आवडी पंडितांची । मुसाफावरी बैसली ॥ कैसें विनाशकाळाचें कौतुक । राजे झाले प्रजांचे अंतक । पिते पुत्र सहोदर एकाएक । शत्रुघातें वर्तती ॥ पूर्वी होतें भविष्य केलें । संतीं तें यथार्थ झालें । ऐकत होतों तें देखिलें । प्रत्यक्ष लोचनीं ॥ आतां असो हें अघवें । गति नव्हे कलीमध्यें । देवासी भाका करणें वेगें । स्मरावें अंतरीं रे ॥ आगा ये वैकुंठनायका । काय पाहातोसि या कौतुक । कलीनें गांजिलें लोकां । देतो हाका सेवक तुकयाचा ॥

(४) विष्णु पुराणांतर्गत कलियुगवर्णनपर जो उतारा मागें दिला आहे त्यांतील कित्येक बाबींचा प्रतिध्वनि वरील तुकाराम महाराजांच्या अभंगांत उमटल्याचें स्पष्टपणें दिसून येतें. आतां समर्थांचे श्रेष्ठ बंधु

रामीरामदास यांचे कलियुगाचे विपर्यांचे कांहीं उद्गार खालीं देतों:—

कलियुग महा घोर । सर्व दोषाचा आकार । वर्णचतुष्टय नारी नर । सर्व धर्मपराङ्मुख ॥ परान्नपरद्रव्यपरस्त्रीलोलुप । द्विज होती कैंचा पापभयसंकल्प । कैंचें तीर्थ व्रत दान जप । उपहास करिती करितयाचे ॥ मछमांसाशनें जीविका । होईल सर्वां ब्राह्मणांदिकां । असो सर्व धर्म लोपे लोकां । अल्पायुष्य अपमृत्यु ॥ म्लेंछराज्य होईल प्रबळ । पीडा पावेली द्विजकुळ । ब्राह्मण करकर्षणभेणें विकळ । गिरिकंदरीं भ्रमती सकुटुंब ॥ अत्र तीव्र शासन यावनी । अब्रह्मण्य जाली कित्तेक अवनी ॥ आतां च जाला वर्णसंकर । अशेष उद्भवला पापाचार । कैंची भक्ति कैंचा हरिहर । बाह्याकार किंचित ॥

तसेंच

कन्याविक्रय करिती ब्राह्मण । वेद शास्त्र विकिती पुराण । विकिती हरिकथा नामस्मरण । नाना द्रव्यें आणि रस ॥ दुष्ट सेवा दुष्ट प्रतिग्रह । दुराचारी दुराग्रह । गोब्राह्मणा अति निग्रह । तेथें कैंचा प्रतिपाळ ॥ क्षत्री वैश्य स्वधर्मभ्रष्ट । शूद्र जाले सेवानष्ट । किती हें चि बोलावें स्पष्ट । सीण वाटे वाचेसी ॥

या प्रमाणे कलियुगाचें वर्णन श्रेष्ठांनीं केलें आहे. अगदीं शुद्धाचार संपन्न माणूस असला

परी परकीय संसर्गासी काय करी ॥

अशी श्रेष्ठानीं शंका प्रदर्शित करून असल्या प्रकारच्या विचित्र परिस्थितींत खालील ओव्यांत दर्शविलेला उपाय सुचविला आहे.

जयाचें रामीं मीनलें मन । तया काय करिती बाह्य दुर्जन । तनुतेसी तरी आहे च निदान । दास लीन श्रीरामीं ॥

या उपायापेक्षां अन्य उपाय कांहीं नाहीं असे श्रेष्ठांनीं खालील ओव्यांत नमूद केलें आहे.

यथार्थ कृपाळ सर्वेश्वर । जें शरीर आहे नश्वर । नाहींतरी महा भागवत नर । काय करिते ये काळीं ॥

वरील उद्गार नमुन्यादाखल दिलेले आहेत. या सर्व उद्गारांवरून मुसलमानी राजसत्ता महाराष्ट्रांत नांदत असतां महाराष्ट्रियांची मनोरचना कशा प्रकारची बनली गेली होती, हें उत्तम प्रकारें आढळून येतें. सुरवातीपासून शेवटपर्यंत, कलियुग सुरू झालें, सद्गुणांचा ऱ्हास होत आहे, धर्माची पायमल्ली होत असून कोणी हि आचारधर्माचें परिपालन करीत नाहीं, दुःख व दारिद्र्य यांची पीडा सर्वत्रांस होत आहे व हा सर्व प्रकार कलियुग अवतरल्यामुळें

होत आहे, अशी ठाम समजूत त्या काळीं सर्व महाराष्ट्रभर पसरलेली होती व प्रत्यक्ष वस्तुस्थिती हि त्या च स्वरूपाची अस्तित्वांत होती. विपन्नावस्थेंत सांपडलेल्या महाराष्ट्रीय जनतेचा उद्धार कोणत्या मार्गानें होईल अशा विषयींचे उद्गार वरील संत कवींच्या वाङ्मयांत क्वचित् च आढळण्यांत येतात. उलट त्या काळच्या लोकांची मनोरचना किती हताश स्वरूपाची बनली होती, हें वर दिलेल्या रामीरामदासांच्या शेवटच्या उद्गारांवरून उत्तम प्रकारें व्यक्त होतें.

शिवकालास सुरवात होई तों कलियुगविषयक कल्पनेचा पगडा महाराष्ट्रीय समाजाच्या विचारवंत पुढाऱ्यांवर या प्रकारें बसल्या कारणानें राष्ट्रोद्धारार्थ कोणत्या हि प्रकारचे प्रयत्न करावे, अशी भावना त्या काळीं महाराष्ट्रांत उदयास आल्याचें मुळीं च दिसत नाहीं, मग प्रत्यक्ष राष्ट्रोद्धारार्थ प्रयत्न झाल्याचें त्या काळीं आढळत नाहीं, यांत कांहीं नवल नाहीं.

कलियुगाच्या कल्पनेखालीं महाराष्ट्रीय जनता दडपून गेली असतां श्रीसमर्थरामदास स्वामी उदयास आले. बारा वर्षें बालपण गेल्यानंतर बारा वर्षें त्यांनीं तपश्चर्येंत घालविलीं. नंतर बारा वर्षें सर्व भरतखंडांत समर्थांनीं पर्यटन केलें. भरतखंडांतील प्रजा व मुसलमान राज्यकर्ते व इतर मुसलमानधर्मी लोक यांचे परस्पर संबंध कशा प्रकारचे होते, हें पर्यटनांत त्यांच्या पूर्णपणें लक्षांत आलें. भरतखंडांतील प्रजा हीन, दीन, सद्गुणविरहित व परधर्मियांच्या जुलमाखालीं चिरडून जात असलेली त्यांच्या निदर्शनास आली. परंतु याशिवाय त्यांच्या पूर्वीं होऊन गेलेल्या महाराष्ट्रीय समाजाच्या विचारवंत पुढाऱ्यांपैकीं कोणास हि न भासलेली अशी एक नवीन कल्पना त्यांना भासूं लागून त्यांच्या अवलोकनांत आलेल्या गोष्टींवरून ती त्यांना पूर्णपणें पटली. महाराष्ट्रांत रामरावणयुग मूर्तिमंत अस्तित्वांत असल्याचें त्यांना भासूं लागलें. रावणकाळाची जनता व त्या काळचा रावण राजा व त्याचे अनुयायी हे च हुबेहुब भरतखंडांत फिरून अवतरले आहेत, अशी समर्थांची पूर्ण खात्री झाली. भरतखंडाच्या स्थितीचें हें समर्थांचें परीक्षण त्यांच्यापूर्वीं होऊन गेलेल्या नामदेवादि महाराष्ट्रीय समाजाच्या पुढाऱ्यांनीं केलेल्या परीक्षणाहून अर्थात् च भिन्न प्रकारचें होतें. कलियुग-कल्पनेंत विपन्नावस्थेंतून सुस्थिति प्राप्त करून घेण्याच्या कल्पनेस वाव च राहात नाहीं. महाराष्ट्रीय जनतेची हीन दशा ही कलियुगप्राप्त च असल्या-कारणानें ती निमूटपणें सहन करण्यावांचून दुसरा मार्ग नाहीं, एवढ्या च कल्पनेचा कलियुगकल्पनेंत समावेश होतो. प्रयत्नाचा मार्गच शक्य राहिला

नाहीं, अशी ठाम समजूत झाल्यामुळें महाराष्ट्रांत सर्वत्र निराशजनित शांतता नांदूं लागली.

रामरावणयुगाची पुनरावृत्ति महाराष्ट्रांत चालू आहे, ही जी समर्थांची कल्पना तीमध्यें महाराष्ट्राच्या उद्धाराच्या कल्पनेस वाव आहे. रावणाच्या जाचामुळें देवादि ग्रस्त होऊन हीन दशेप्रत पोंचले अशा स्थितींत परमेश्वरानें रामरूप धारण करून रावणाचा संहार केला व हीन दशेप्रत पोंचलेल्या देवादिकांचा उद्धार करून रामराज्याची स्थापना केली व सर्व प्रजा सुखी व आनंदी झाली. या सर्व गोष्टींचा रामरावणयुगाच्या कल्पनेंत अंतर्भाव होतो. रामरावणयुगाच्या कल्पनेंतील राष्ट्रोद्धाराचा जो विशिष्ट स्वरूपाचा भाग आहे, त्याचा पाया भगवद्गीतेंतील "यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत" इत्यादि भगवद्वचनांत आहे. या उक्तीचा समर्थांच्या मनावर पूर्ण पगडा असल्याचें

धर्म स्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार ।
जाले आहेत पुढें होणार । देणें ईश्वराचें ॥

या त्यांच्या उक्तीवरून दिसून येतें. तत्कालीन महाराष्ट्रीय जनतेचीं मनें भाविक व श्रद्धावान् होतीं. महाभारत, रामायण, भगवद्गीता इत्यादि ग्रंथांत प्रतिपादिलेल्या सिद्धान्तावर सर्व महाराष्ट्रियांचा दृढ विश्वास होता, यामुळें श्रीसमर्थांस भासलेली रामरावणयुगाची कल्पना त्यांनीं महाराष्ट्रांत प्रवृत्त करतां च ती तत्कालीन महाराष्ट्रियाना सहज पटून मान्य झाली.

समर्थ उदयास येण्यापूर्वी महाराष्ट्रियांच्या मनोभूमींत अस्तित्वांत असलेली कलियुगविषयक कल्पना नाहींशी करून रामरावणयुगाची कल्पना त्यांच्या काळच्या महाराष्ट्रीय जनतेच्या मनांत समर्थांनीं प्रवृत्त करून राष्ट्रोद्धाराचें बीज महाराष्ट्रीय जनतेच्या अंतःकरणात पेरलें व छत्रपति शिवाजी महाराजांच्या स्वराज्यसिद्धीस महाराष्ट्रियांची मनोरचना सर्वस्वी अनुकूल केली. रामरावणयुगकल्पना त्यांच्या कालास समर्थांनीं ततोतंत लागू केली ही निवळ आमची कल्पना आहे, असा आक्षेप येण्याचा संभव आहे. या आक्षेपाच्या निरसनार्थ समर्थांच्या व तत्कालीन इतर ग्रंथकारांच्या लेखांतील एतद्विषयक कांहीं उद्गार नमुन्यादाखल आम्ही येथें उद्धृत करितों.

शिवभारतांतील परमानंद कवीच्या खालील उद्गारावरून रामरावणयुगकल्पना त्या काळीं महाराष्ट्रांत मूर्तिमंत अस्तित्वात असल्याचें दिसून येतें.

यवनानाममी यद्वाः सर्वेप्यंशास्सुरद्विषाम् ।
जगतीं निजधर्मेण निमज्जयितुमुद्यताः ॥ १८-३७

अर्थः- यवनांचे हे सर्वच वंश असुरांचे अंश होत. हे आपल्या धर्मांच्या योगें पृथ्वीला बुद्धनिण्यास उत्सुक झाले आहेत.

तस्मादेतान् हनिष्यामि दानवान् यवनाकृतीन् ।
प्रथयिष्यामि धर्मस्य पंथानमकुतोभयम् ॥ १८-३८

अर्थः- म्हणून या यवनरूपी दानवांना मी मारीन आणि धर्मांचा निर्भय असा मार्ग प्रचलित करीन.

यवन हे दानवांचेच वशज असून धर्मांध बुद्धविण्याकरितां ते उत्पन्न झाले आहेत ही कल्पना परमानद कवीनें वरील श्लोकात व्यक्त करून पुढे शिव भारताच्या विसाव्या अध्यायाच्या १४ व्या श्लोकांत अफजलखानास प्रत्यक्ष रावण च म्हटलें आहे.

अवध्यं सर्वदेवानां दशाननमिरापरम् ।
सहितं सर्वसैन्येन मोहितं मायया मया ॥

अर्थः-सर्व देवांना अवध्य असा जणू काय दुसरा रावण च, सर्व सैन्यासह माझ्या मायेनें मोहित झाला आहे.

परमानंद कवीनें दुसऱ्या एका स्थळीं व्यक्त केलेले खालील उद्गार फार महत्वाचे आहेतः--

ये हताः प्रथमं देवैर्दुर्मदास्त्रिदशाद्विपः ।
ते मां तुदन्ति तिष्येऽस्मिन् उपेत्य म्लेच्छरूपताम् ॥ ५-३७

अर्थः--ज्या दुष्ट दैत्यांचा देवानीं पूर्वी संहार केला, तेच ह्या कलियुगामध्यें म्लेंच्छरूप धारण करून मला पीडा देत आहेत.

आतां खुद्द समर्थांचे या प्रकारचे किती तरी उद्गार दाखवितां येतील. परमानंदाची ही च कल्पना समर्थांनीं खालील उद्गारांत व्यक्त केली आहे.

पूर्वी जे मारिले होते । तेचि आतां वळावले । कोपला देव देवांचा । आनंदवनभूवनीं ॥ त्रैलोक्य गांजिले मागें । ठाऊकें विवेकी जना । कैपक्ष घेतला रामें । आनंदवनभूवनीं ॥

छत्रपती शिवाजी महाराजास त्या काळचे महाराष्ट्रीय रामा सारखे लेखित असत असें खालील उल्लेखावरून निश्चित अनुमान करण्यास हरकत नाहीं. सुप्रसिद्ध जेधे शकावलींत खालील उद्गार आढळतात.

" कान्होजी जेधे यांज पासून कावजी कोंढाळकर व केरोजी तुपे यांस मागोन घेऊन हशमाच्या हजारिया सांगितल्या. पवाडा केला त्यामध्यें आहे कीं ' हनुमंत अंगद रघुनाथाला जेधे बादल सिवाजीला ' ऐसे."

या उद्गारावरून त्या काळच्या सामान्य प्रकारच्या महाराष्ट्रियांची

समजूत छत्रपती शिवाजी महाराज रामाचा अवतार आहेत अशी असल्याचें स्पष्ट दिसतें. रामरावणयुगाची पुनरावृत्ति महाराष्ट्रांत होत आहे, अशा प्रकारची कल्पना त्या काळीं जागृत असून त्या कल्पनेच्या योगानें महाराष्ट्रांतील लोक भारून गेले होते.

रामरावणयुगाची कल्पना श्रीसमर्थांनीं महाराष्ट्रीय जनतेंत प्रवृत्त केल्यावर ती पटवून देण्याकरितां समर्थांनीं कोणकोणत्या मार्गांचा अवलंब केला व त्या कल्पनेंत अंतर्भूत होणाऱ्या रावणपराजय व रामराज्याची अथवा धर्मराज्याची स्थापना या कल्पनेच्या सिद्धीस पोषक अशीं नूतन साधनें समर्थांनीं कोणतीं निर्माण केलीं, हा महत्वाचा मुद्दा उपस्थित होतो व मथळ्यांतील विषय-विवेचनाच्या पूर्ततेच्या दृष्टीनें या मुद्याची चर्चा व विवेचन करणें ओघानें च प्राप्त होतें. रामरावणयुगकल्पनेचा महाराष्ट्रीय जनतेच्या थेट खालच्या थरापर्यंत प्रसार करण्यास्तव महाराष्ट्रीय जनतेचीं अंतःकरणें आकर्षित करून ही कल्पना तीस पटवून देतील, अशा ऐपतीचे अनेक शिष्य विशिष्ट प्रकारचें शिक्षण देऊन समर्थांनीं तयार केले. आधुनिक काळांतील विचारप्रवर्तन करणारीं वर्तमानपत्रें समर्थकालीं अस्तित्वांत नव्हती. परंतु वर्तमानपत्रांच्या संस्थेपेक्षां हि अधिक कार्यक्षम अशा दुसऱ्या दोन संस्था त्या काळीं महाराष्ट्रांत चांगल्या जोमदार स्थितींत अस्तित्वांत होत्या. या दोन संस्था म्हणजे कीर्तनकार व पुराणिक या होत. जनतेच्या मनावर आपल्या कीर्तनानें अगर पुराणानें परिणाम होईल, अशा प्रकारची ऐपत शिष्याच्या ठिकाणीं येण्याकरितां समर्थांच्या खालील उक्तींत दर्शविलेल्या स्वरूपाचा शिक्षणक्रम समर्थांनीं आंखला.

प्रथम लिहिणें दुसरें वाचणें । तिसरें सांगणें अर्थांतर ॥ आशंकानिवृत्ति ऐसी चौथी स्थीती । पांचवी प्रचीती अनुभवें ॥ साहावें तें गाणें सातवें नाचणें । ताळी वाजवणें आठवें तें ॥ नवां अर्थभेद दाहावा प्रबंध । आकरांवा प्रबोध प्रचीतीसीं ॥ बारावें वैराग्य तेरावा विवेक । चौदावा तो लोक राजी राखे ॥ पंध्रावें लक्षण तें राजकारण । सोळावें तें जाण अवेग्रता ॥ प्रसंग जाणावा हा गुण सत्रावा । काळ समजावा सर्वां ठाईं ॥ आठ्रावें लक्षण वृत्ती उदासीन । लोलंगता जाण तेथें नाहीं ॥ येकोणीसावें चीन्ह सर्वांसी समान । राखे समाधान ज्याचें त्याचें ॥ विसावें लक्षण रामउपासना । वेध लावी जना भक्तीरंगें ॥ स्फु. ओ. १४

या उक्तींत दर्शविलेल्या प्रकारचें शिक्षण देऊन समर्थांनीं अनेक शिष्य तयार केले. महाराष्ट्रांत च काय परंतु भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रांतांत

समर्थांनीं अशा प्रकारचें शिक्षण देऊन तयार केलेल्या शिष्यांस पाठवून त्यांच्याकडून त्या त्या प्रांतीं मठस्थापना करविली. समर्थांचे हे शिष्य सुखलोलुप होऊन पुरुषा झोडीत मठांत स्वस्थ बसणारे नव्हते. अखंड पर्यटन करून भिक्षेच्या मिषानें 'परांतरें परीक्षून सोडावीं' अशा प्रकारची समर्थांची शिकवण असल्यामुळें हे शिष्य सर्व देशांत भ्रमण करीत फिरत व रामरावणयुगाच्या कल्पनेचा प्रसार करीत. समर्थांनीं निर्माण केलेल्या या चालत्या बोलत्या वर्तमानपत्रांनीं महाराष्ट्रांतील कानाकोपऱ्यातील लोकांचे अंतःकरणावर ही कल्पना उत्तम रीतीनें बिंबवून नूतन होणाऱ्या रामावतारा-विषयीं त्यांचा पूज्यभाव जागृत केला. सर्वतोपरी त्या अवतारास साहाय्यभूत व्हावें अशी भावना समर्थशिष्यांच्या कामगिरीच्या योगानें सर्व महाराष्ट्रांत उदित झाली. एकाद्या माणसाच्या विचारी मनास एकादी गोष्ट पटल्यानंतर ज्या उत्सुकतेनें व जोरानें त्याच्या हातून ती होते, त्यापेक्षा अधिक उत्सुकतेनें व जोरानें ती च गोष्ट एकाद्या भावना-प्रधान माणसाच्या श्रद्धावान् मनास पटल्यानंतर त्याच्या हातून होते. समर्थकालीं महाराष्ट्रीय जनता श्रद्धावंत होती. अमुक एक गोष्ट करणें धर्मदृष्ट्या विहित आहे, असें मनास पटतां च ती गोष्ट करण्यास शेंकडों लोक एका पायावर तयार होत असत. अशा प्रकारची मनोरचना त्या काळच्या महाराष्ट्रीयांची असल्या कारणानें रामावतार-कल्पनेनें त्यांचीं मनें साहजिक च भारून जाऊन त्यांची कर्तृत्वशक्ति वर्धमान पावली.

समर्थांनीं प्रवर्तिलेल्या रामरावणयुगकल्पनेच्या प्रसारार्थ सर्व देशभर विशिष्ट प्रकारचे शिष्य विखुरण्याचें कार्य ते करीत असतां त्या कार्यासमवेत श्रीहनुमानदैवताची स्थापना समर्थांनीं शेंकडों ठिकाणीं केली व शिष्यांकरवीं करविली. चाफळ खोऱ्यांत श्रीरामदैवताची स्थापना समर्थांनीं त्यांच्या महत्कार्यास प्रारंभ करतांना च करून रामजन्मोत्सव करण्याचा प्रघात सुरू केला व हा च प्रघात समर्थशिष्यांनीं ज्या ज्या ठिकाणीं मठस्थापना केली, त्या त्या ठिकाणीं सुरू केला. श्रीराम व श्रीहनुमान या दैवतांच्या उपासनेंत कोणत्या ध्येयांचा अंतर्भाव होतो, याचा उलगडा करून समर्थांनीं प्रवर्तिलेली नूतन रामरावणयुगकल्पना फलद्रूप होण्यास तीं ध्येयें कशा प्रकारें उपकारक झालीं याचें आता दिग्दर्शन करूं. खुद्द चाफळ येथें श्रीरामदेवतेची स्थापना करून रामजन्मोत्सव करण्याचा प्रघात समर्थांनीं सुरू केल्यापासून

उत्सवानिमित्त प्रचंड यात्रा भरविण्याचा परिपाठ सुरू झाला. महाराष्ट्रांतील निरनिराळ्या ठिकाणाहून या यात्रेनिमित्त शेंकडों लोक जमत असत. समर्थ-शिष्यांपैकीं कांहीं शिष्यांची, या यात्रेनिमित्त लोक चाफळास घेऊन येणें, ही कामगिरी ठरली होती. चाफळाप्रमाणें च समर्थशिष्यांच्या मठांचा प्रसार महाराष्ट्रांत ज्या ज्या ठिकाणीं झाला, त्या त्या ठिकाणीं रामजन्मोत्सव व तन्निमित्त यात्रा भरण्यास सुरवात झाली. रामजन्मोत्सवाच्या यात्रेनिमित्त दरसाल लुळणाऱ्या असंख्य जनसमूहाच्या अंतःकरणांत रामराज्याची कल्पना उत्तम प्रकारें बिंबली जात असली पाहिजे, हें उघड आहे. तत्कालीन रामदासी सांप्रदायाचीं पत्रें जीं प्रसिद्ध झालीं आहेत, त्या पत्रांत अनेक ठिकाणीं " चढता वाढता देवाचा उत्सव, चढतें वाढतें राज्य " हें सूत्ररूप वचन आढळून येतें. रामजन्मोत्सवाच्या योगानें महाराष्ट्रीय जनतेच्या अंतःकरणावर होणारा वरील परिणाम प्रत्यक्ष घडत असल्यावरून च वरील सूत्ररूप वचन अस्तित्वांत आलें असलें पाहिजे, असें मानल्यावांचून गत्यंतर नाहीं.

चाफळ खोऱ्यांत समर्थ अवतीर्ण झाल्यानंतर त्यांनीं अकरा ठिकाणीं श्रीमारुतीची स्थापना केल्याचें सर्वश्रुत च आहे. याशिवाय अनेक ठिकाणीं त्यांनीं श्रीहनुमानदेवतेची स्थापना केली होती. त्यांच्या शिष्यांनीं ज्या ज्या ठिकाणीं मठस्थापना केली, त्या त्या ठिकाणीं व त्या ठिकाणच्या आसपासच्या प्रदेशांत श्रीहनुमानदेवतेच्या स्थापनेची त्यांनीं परंपरा चालू ठेविली. श्रीहनुमान-देवतेच्या ठिकाणीं प्रचंड शक्ति, अतुल शौर्य, सतत उद्योग, प्रखर बुद्धिमत्ता व श्रीरामार्थ सर्वस्वाचा त्याग करण्याची वृत्ति, हे सद्गुण वसत होते. समर्थकालीं स्वराज्यस्थापनेचें जें महत्कार्य छत्रपति शिवाजीमहाराजांनीं हातीं घेतलें होतें, तें कार्य सिद्ध करण्याकरितां वरील सर्व गुणांची जोपासना महाराष्ट्रीय जनतेंत होणें अत्यंत जरूर होतें. पुणें प्रांतांतील बारा मावळे, त्या च प्रमाणें भोर प्रांतांतील खोरीं व किल्ले हा स्वराज्यस्थापनेचा मूळचा प्रांत. या प्रांतांत प्रस्तुत काळीं दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या हल्लींच्या मावळ्यांचे पूर्वज हे च शिवाजी महाराजांच्या स्वराज्याचे प्रथमचे शिपाई. समर्थांनीं या सर्वांस हनुमान देवतेचे उपासक बनवून वर नमूद केलेल्या गुणांची जोपासना त्यांच्या ठिकाणीं आपल्या शिष्यांकरवीं केली. युद्धप्रसंगीं त्यांचें रक्षण करून त्यांना यशस्वी करण्यास्तव श्रीहनुमान देवतेच्या मूर्तीचे ताईत प्रत्येक शिपायाच्या दंडावर धारण करण्याचा परिपाठ समर्थांनीं

सुरू करून त्यांना मुसलमान शिपायांवर शौर्याच्या बाबतींत ताण करणारे शिपाई बनविले. श्रीहनुमान देवतेच्या उपासनेच्या योगानें मेंढरासारखे गरीब मावळे वाघ बनले व छत्रपति श्रीशिवरायरूपी रामाची आज्ञा होतां च ती पार पाडण्याकरितां वाटेल तो त्याग करण्यास ते सज्ज झाले. विजापूरच्या आदिलशाहीच्या अगर अहमदनगरच्या निजामशाहीच्या कारकीर्दींत पठाण अगर मोगल अधिकाऱ्यांचा चाबकाचा मार निमूटपणें सहन करणारे मावळे युद्धप्रसंगीं पठाण व मोगल शिपायांच्या अंगावर तुटून पडूं लागले. शौर्याप्रमाणें च स्वामिनिष्ठा व धन्यानें सांगितलेलें वाटेल तितकें दुस्तर कार्य पार पाडण्याची तत्परता इत्यादि सर्व गुण मारुतीच्या उपासनेच्या योगानें त्या काळच्या मराठा शिपायांच्या आंगीं निर्माण झाले.

आतां समर्थांच्या रामोपासनेंत अंतर्भूत होणाऱ्या ध्येयांचें स्पष्टीकरण करूं. वनवास पत्करून रावणाचा व त्याच्या अनुयायांचा संहार केल्यानंतर सिंहासनाधिष्ठित झालेल्या रामाची उपासना समर्थांनीं सुरू केली. रामराज्य म्हणजे श्रुतिस्मृतिप्रणीत धर्मानुयायी क्षत्रियाचें राज्य. या राज्यांत ज्या त्या वर्णानें आपापलीं कर्में धर्मानुसार करीत असणें व स्मृतिधर्मास अनुसरून राजानें प्रजेकडून राजविभाग घेऊन तिचें पुत्रवत् पालन करणें या दोन गोष्टींचा समावेश होतो. प्रजेवर जुलूम जबरदस्ती, त्या च प्रमाणें प्रजेचें दैन्य अगर दुःख यांना रामराज्य कल्पनेंत वाव मिळत नाहीं. सर्व प्रजा सुखांत व आनंदांत असते. राजा हा च युगाचा निर्मिता असून यथाशास्त्र कर्मानुष्ठान करण्यास राजा जेव्हां तत्पर असतो, तेव्हां कृतयुग होतें, असें मनुस्मृतींत सांगितलें आहे. हें मनुस्मृतींतील वर्णन रामराज्यास पूर्णपणें लागूं पडतें. ' आनंदवनभुवन ' या समर्थांनीं केलेल्या प्रकरणांत छत्रपतींनीं केलेल्या स्वराज्यस्थापनेनंतर महाराष्ट्रांत उदयास आलेल्या स्थितीचें वर्णन खालील प्रमाणें केलें आहे.

विजई दीस जो आहे । ते दीसीं सर्व उठती । आनर्थ मांडला मोठा । आनंदवनभुवनीं ॥ देवची तुष्टला होता । त्याचे भक्तीस भुकला । मागुता क्षोभला दुखें । आनंदवनभुवनीं ॥ कल्पांत मांडला मोठा । म्लेंचदैत्य बुडावया । कैपक्ष घेतला देवीं । आनंदवनभूवनीं ॥ बुडाले सर्व ही पापी । हिंदुस्थान बळावलें । अभक्तांचा क्षयो जाला । आनंदवनभुवनीं ॥ पूर्वीं जे मारिले होते । ते ची आतां बळावले । कोपला देव देवांचा । आनंदवनभुवनीं ॥ त्रैलोक्य गांजिलें मागें । ठाउकें विवेकी जना । कैपक्ष घेतला रामें । आनंदवनभूवनीं ॥ भीम ची धाडिला देवें । वैभवे धांव घेतली । लांगूळ चालिलें पुढें । आनंद-

घनभूवनीं ॥ येथून वाढला धर्मु । रमा धर्मसमागमें । संतोष मांडला मोठा । आनंदवनभुवनीं ॥ बुडाला औरंग्या पापी । म्लेंचसंव्हार जाहाला । मोडलीं मांडलीं छेत्रें । आनंदवनभुवनीं ॥ बुडाले भेदवाही ते । नष्ट चांडाळा पातकी । ताडिले पाडिले देवें । आनंदवनभूवनीं ॥ गळाले पळाले मेले । जाले देशधडी पुढें । निर्मळ जाहाली पृथ्वी । आनंदवनभुवनीं ॥ उदंड जाहाले पाणी । स्नान संध्या करावया । जप तप अनुष्टानें । आनंदवनभुवनीं ॥ नाना तपें पुन्हश्चर्णें । नाना धर्म परोपरीं । गाजली भक्ति हे मोठी । आनंदवनभुवनीं ॥ लीहीला प्रत्ययो आला । मोठा आनंद जाहाला । चढता वाढता प्रेमा । आनंदवनभुवनीं ॥ बंड पापांड उडालें । शुध आध्यात्म वाढलें । राम कर्ता राम भोक्ता । आनंदवनभुवनीं ॥ देव भक्त येक जाले । मिळाले जीव सर्व हि । संतोष पावले तेथें । आनंदवनभूवनीं ॥ सामर्थें येशकीर्तीची । प्रतापें सांडिली. सीमा । मीदेंची दीधलीं सर्वे । आनंदवनभुवनीं ॥ राम कर्ता राम भोक्ता । रामराज्य भुमंडळीं । सर्वस्व मीच देवाचा । माझा देव कसा ह्मणों ॥

वाचकांनीं तें प्रकरण मुळावरून साद्यन्त वाचावें व मुलांनीं पाठ करावें.

हें वर्णन तंतोतंत रामराज्यास लागू असें आहे. रामराज्यांत अंतर्भूत होणाऱ्या वरील ध्येयांचा प्रचार श्रीरामोपासनेच्या योगानें सर्व महाराष्ट्रभर करून तें राज्य प्रत्यक्ष अस्तित्वांत आणणाऱ्या रामरूपी छत्रपति महाराजांविषयीं अखिल महाराष्ट्रीय जनतेचीं अंतःकरणें समर्थांनीं लोलुप केलीं. कलियुग व त्यांत अंतर्भूत होणाऱ्या जुलूम, दुःख, दारिद्य, अधर्माचरण इत्यादिकांचा लय होऊन रामराज्य अवतरणार अशा प्रकारचा दृढ विश्वास, महाराष्ट्रीय जनतेच्या अंतःकरणांत रामोपासनेच्या योगानें समर्थांनीं उत्पन्न केला. अखिल महाराष्ट्रियांच्या अशा प्रकारें श्रीसमर्थांनीं तयार केलेल्या मनोरचनेचा छत्रपति शिवाजी महाराजांनीं स्वराज्यस्थापनार्थ निर्माण केलेल्या भौतिक साधनांशीं संयोग घडून महाराष्ट्रभूत स्वराज्य म्हणजे च धर्मराज्य अथवा रामराज्य अवतीर्ण झालें.

श्रीसमर्थ रामदासस्वामींनीं केलेल्या महत्कार्याचें स्वरूप हें अशा प्रकारचें आहे. समर्थ उदयास येण्यापूर्वी महाराष्ट्रांत सूर्यासारख्या प्रखर बुद्धिमत्तेचे विद्वान् श्रीज्ञानेश्वर, नामदेवासारखे उत्कट श्रीविठ्ठलभक्त, सर्वां भूतीं समदृष्टि ठेवणारे मृदु अंतःकरणाचे सदाचारसंपन्न एकनाथ, देवाच्या सत्यत्वासाठीं सर्वस्वाची होळी करून तन–मन–धन परमेश्वरास अर्पण करणारे पूर्ण वैराग्यशील तुकाराम महाराज, अशीं अद्वितीय नररत्नें उत्पन्न होऊन गेलीं. महाराष्ट्रियांस हीं सर्व च नररत्नें पूज्य व वंदनीय आहेत.

परंतु ज्ञान, वैराग्य, सामर्थ्य, इत्यादि गुणांनीं युक्त अशा श्रीसमर्थांच्या पदरीं मार्यंत बुडालेल्या अखिल महाराष्ट्राच्या आत्म्याचा भ्रमनिरास करून महाराष्ट्रास स्वराज्योन्मुख करण्याचें, ब्राह्मण धर्मास विहित अशा प्रकारचें महत्कार्य सिद्ध केल्याचें श्रेय पडतें, हें निर्विवाद आहे.



## ( १०९ )

## फाटकांनीं आम्हांस निरुत्तर केलें

जनीं निंदितां सुटला कोण आहे । जन सर्वदा सर्व निंदून राहे ।
जया वर्णितां सीणली वेदवाणी । जनें निंदिला राम कोंदडपाणी ॥

विविधज्ञानविस्ताराच्या जानेवारीच्या अंकांत रा. फाटक यांनीं ' रामदासांचें राजकारण ' असा निबंध लिहून त्यांत मुख्यतः असें प्रतिपादन केलें कीं, *श्रीसमर्थांनीं स्वतः राजकारण केलें नाहीं, दुसऱ्यास शिकविलें नाहीं* च त्यांच्या ग्रन्थांत जो ' राजकारण ' शब्द आला आहे, तो त्यांनीं ' चातुर्य ' या अर्थी योजिला आहे. या मताचें खंडन आम्ही यथामति पुण्यास वसंत-व्याख्यानमालेंत केलें व तेंच सविस्तर गेल्या दोन अंकांत दिलें व पुढील दोन चार अंकांत देणें आहे. आमचा हेतु असा कीं, फाटकांच्या लिखाणानें कोणाचा बुद्धिभेद होऊं नये व साधल्यास रा. फाटकांना हि तें खंडन पटून त्यांच्यांत सुविचार जागृत व्हावा. आमचा दुसरा हेतु सफल फसला, याचें वाईट वाटतें. आम्ही करावयास गेलों एक आणि परिणाम झाला दुसरा च. रा. फाटक अत्यन्त च पिसाळले. ते आतां श्रीसमर्थांच्या हि *निंदेला* प्रवृत्त झाले आहेत. जानेवारीच्या त्यांच्या त्या लेखावरून त्यांच्या पोटांत इतकें विष सांठविलेलें असेल अशी आम्हास कल्पना झाली नव्हती. जेथें पहावें तेथें जो तो श्रीसमर्थांना च डोक्यावर घेऊन नाचतो, त्यांचीं वचनें उद्धृत करतो, त्यांच्या गौरवांत स्वतःला विसरतो, यायोगें रा. फाटक इतके चिडून गेले कीं, त्यांच्या पोटांत आजवर सांठविलेलें विष एकदाचें ओकून पडलें आणि त्यानें विविधज्ञानविस्ताराच्या आज आलेल्या जुलैच्या अंकांतील ४८ पृष्ठांपैकीं ४१ पृष्ठें भरलीं आहेत. श्रीसमर्थांच्या निंदेला त्यांनीं पारावार ठेवला नाहीं ! त्या ४१ पृष्ठांत मधून मधून त्यांना वाताच्या ज्या जोराच्या उचक्या आल्या त्याधरसें ' रामदासांचें पुच्छ ', ' आत्महत्येचा प्रयत्न ', ' राज्यसत्तेशीं खटका टाळला, मवाळ धोरण, ' ' शिष्यिणींचा अपवाद, ' ' शिवाजीची बायको मागितली, ' ' देवाचा यवनवेष ', ' यवनाच्या उच्छिष्टाचें औषध, ' ' समर्थ-

प्रतापाचा गोंधळ', ''श्री'विरहित रामदास,' इत्यादि गरल बाहेर पडलें आहे. पुण्याच्या व्याख्यानांत पोतदारांनीं अध्यक्षपदावरून सांगितलें होतें कीं, फाटक आपले मित्र आहेत व आपण मुंबईस गेलों ह्मणजे बहुधा त्यांच्या च कडे उतरतों. काय चमत्कार पहा! दोघे मित्र. दोघांनीं हि श्रीसमर्थवाङ्मयाचा सारखा अभ्यास केला, पण एकाला अमृत लाभलें आणि दुसऱ्याच्या वाट्याला विष आलें, एकानें गुणांचा संचय केला आणि दुसऱ्यानें नेमके नांवाचे दोष निवडून काढले!

विखारा मुखीं दुग्ध तें वीष जालें। महा तीव्र किल्मीष बाहेरि आलें॥

याचें कारण एक च. पोतदारानीं हंसाचा गुण उचलला आणि स्वत: फाटक सांगतात, आपली दृष्टि कावळ्याची आहे. साधुनिंदेच्या भरांत ते विचारतात च "अतिरेक टाळावा, असा उपदेश रामदासांच्या वाङ्मयांत आहे, परंतु या उपदेशाच्या विरुद्ध जर त्यांचें आचरण खरोखरी च असेल तर कावळ्याप्रमाणें व्यंगाच्या क्षतावर नजर ठेवणाऱ्या लोकस्वभावानें तसें क्षत दिसतां च त्यामध्यें अपवादाची चोंच खुपसून त्याचें विदारण केल्यास खेद मानण्यात हंशील काय?"

खेद होतो खरा, पण तो या निंदकाच्या निंदेनें श्रीसमर्थांच्या वैभवांत कांहीं उणेपणा येईल ह्मणून नव्हे, तर रा. फाटकांच्या निंदेची मजल येथवर जावी, याचा खेद होतो. नाहीं नाहीं ती निंदा त्यांनीं केली आहे. आडनांवावरून रा. फाटक ब्राह्मण आहेत असें आम्ही समजतों. त्यांनीं केलेली निंदा ऐकून आमचे एक ब्राह्मण नसलेले मित्र म्हणाले च "असली निंदा करणारा ज्या जातींत जन्मास येऊ शकतो त्या जातींत परमेश्वरानें मला जन्म दिला नाहीं हे परमेश्वराचे उपकार होत. इतकी अधम मनोवृत्ति अन्यत्र कोठें सापडणार नाहीं." ब्राह्मणांची निंदा करणें हा ज्यांचा धंदा त्यांना हि हा निंदक लज्जेनें खालीं मान घालावयास लावील. महाराष्ट्रांतला कोणी हि जातिवंत महाराष्ट्रीय इतक्या खालच्या कोटीला जाऊन पोंचणार नाहीं. कोणाच्या स्वप्नांत हि येणार नाहीं असली निंदा फाटकांनीं श्रीसमर्थांची केली आहे. त्यांनीं केलेली ती निंदा, नुसतें उत्तर देण्यासाठीं सुद्धां, मनांत आणवत नाहीं, उच्चारवत नाहीं, उतरून घेववत नाहीं! फाटकांनीं आम्हास निरुत्तर केलें!

नको रे नको मानवा साधुनिंदा। नको रे नको निंदितां थोर बाधा।
जितां सिद्ध चि यातना पावसील। अंतीं रवरव भोगितां जाणवेल॥

धुळें. १।८।१९२९

## ( ११० )

# रामदासी सांप्रदायांतील रामकथेचा परिपोष

( लेखक—भास्कर वामन भट )

असो हे कथा बोलिली राघवाची । जनीं सर्वदा ऐकती धन्य त्यांची ।
कथा ऐकतां ते महां दोष जाती । दुखें नासती लोक ते धन्य होती ॥

( श्री रामदासाची कविता प्रथम खंड पान १३० )

श्रीसमर्थ रामदास स्वामींनीं रामरावणयुग कल्पना महाराष्ट्रांत प्रवृत्त केल्याचें मागील लेखांत आम्ही साधार सिद्ध केलें आहे. समर्थांचीं जीं अनेक स्फुट प्रकरणें उपलब्ध झालीं आहेत, त्यापैकीं एका प्रकरणात पूर्वकालीं श्रीरामचंद्र प्रभूनें कोणती महत्वाची कामगिरी केली, याचें समर्थांनीं प्रथम दिग्दर्शन केलें असून त्यांच्या कालांत श्रीराम प्रभु कोणत्या स्वरूपाचें कार्य करीत होते, हें दर्शविलें आहे. रामरावणयुगाची पुनरावृत्तिच समर्थांच्या काळीं प्रत्यक्ष घडत आहे, अशी त्यांची भावना असल्याचें या प्रकरणावरून उत्तम प्रकारें दृष्टोत्पत्तीस येतें. हें प्रकरण आम्ही येथें देतों.

राम हा देव देवांचा । देव प्रतक्ष सोडिले । गाजली गोष्टी वैकुंठीं । माजली सचराचरीं ॥ १ ॥ बंदीचे सोडिले देव । आनंदीं घातले सदा । कष्टले लोक देवाचे । त्यावरी फीरला दिसे ॥ २ ॥ रावणु तर्कटु मोठा । त्रैलोक्य पीडिलें बळें । पीडिलें पाळिलें सर्वें । राम व्याघ्र पंचाननें ॥ ३ ॥ मातले हस्त ते मोठे । तुरंगें गोधनें बहु । चौताळला राम तेथें । वर्धाती राक्षसें किती ॥४॥ चपेटी लपेटी दाटी । लाटालाटी करीतसे । मातले दैत्य ते मोठे । आन्याय करिती बहु ॥ ५ ॥ धाडिले चिर्डिले राजे । गाणातो रणदेवता । देव रसी मुनी योगी । तापसी बहुतांपरी ॥ ६ ॥ तुंबर नारदादीक । देव मृदांग वाजवी । गाजवीतो ध्वनी नाना । दुर्जना लाजवीतसे ॥ ७ ॥ प्रस्तुत कोपला देवो । देवद्रोही पुरे पुरे । सर्व हि चालिल्या फौजा । सेनाभार परोपरीं ॥ ८ ॥ देव तो चेतला आहे । भडसा पुर्वीतसे । काये होईल पाहावें । राहावें सुखभुवनीं ॥९॥

( रामदासाची कविता प्रथमखंड पान ४१२ )

मागील लेखांत जो सिद्धांत आम्हीं प्रतिपादिला आहे; त्याजला या प्रकरणांतील समर्थांच्या उद्गाराच्या योगानें चांगली च बळकटी येत आहे.

समर्थ रामदास स्वामी यांना स्वतःस भावत असलेल्या रामरावणयुगकल्पनेस पोषक अशा बाबी म्हणजे समर्थांनीं केलेली श्रीराम व श्रीहनुमान या दैवतांची स्थापना, त्या दैवताच्या भक्तीचा सर्व महाराष्ट्रभर समर्थांनीं केलेला

प्रसार व ठिकठिकाणीं रामजन्मोत्सव करण्याचा समर्थांनीं सुरू केलेला परिपाठ या असल्याचें आम्हीं मागील लेखांत दर्शविलें आहे. कोणत्या हि देवतेच्या भक्तीचा प्रसार जनतेंत करावयाचा खात्रीचा मार्ग म्हटला म्हणजे त्या देवतांच्या कथा सामान्य जनतेस समजतील अशा भाषेंत तयार करून त्यांचा प्रसार त्या जनतेंत करावयाचा, हा आहे. श्रीराम व श्रीहनुमान या दैवतांच्या भक्तीचा प्रसार महाराष्ट्रांत करून रामरावणयुगकल्पना महाराष्ट्रीय जनतेस समर्थांना पटवून द्यावयाची होती. या समर्थांच्या हेतूच्या सिद्धीस्तव महाराष्ट्रीय जनतेस ज्ञात असलेल्या मराठी भाषेंत श्रीरामप्रभूच्या चरित्रांतील प्रसंगासंबंधाच्या अनेक कथा समर्थांनीं स्वतः रचिल्या व आपल्या शिष्यांकरवीं रचविल्या; आणि या कथांचा प्रसार त्यांनीं त्यांच्या काळीं सर्व महाराष्ट्रभर केला.

स्वतः समर्थांनीं व त्यांच्या शिष्यांनीं रामकथेचा परिपोष कोणत्या विशिष्ट पद्धतीनें व कोणत्या प्रमाणांत केला, याचें दिग्दर्शन त्यांनीं प्रवृत्त केलेल्या रामरावणयुगकल्पनेविषयीं आम्हीं जी चर्चा मागील लेखांत केली आहे, त्या चर्चेस पोषक होणार आहे. महाराष्ट्रांत मुसलमानांची सत्ता प्रस्थापित झाल्यावर रामरावणयुगाची पुनरावृत्ति होत आहे, असें जें समर्थांस भावलें, त्या च प्रमाणें त्यांच्या पूर्वी महाराष्ट्रांत होऊन गेलेल्या इतर विचारवंत महाराष्ट्रीय पुढाऱ्यांस भावलें होतें कीं नाहीं, त्या च प्रमाणें रामकथेचा परिपोष समर्थांच्या पूर्वी कोणीं कोणीं केला व केला असल्यास कोणत्या हेतूनें व कोणत्या प्रमाणांत तो केला गेला इत्यादि मुद्यांची चर्चा हि आमच्या मागील लेखांत प्रतिपादिलेल्या सिद्धांतास उपकारक होणार आहे. व या च कारणास्तव प्रस्तुतच्या लेखांत या सर्व मुद्यांची चर्चा करण्याचें आम्हीं ठरविलें आहे.

कोणत्या हि सुसंस्कृत राष्ट्राच्या वाङ्मयांत त्या राष्ट्राच्या विचारांचें व विकारांचें प्रदर्शन होत असतें. विकार आणि विचार यांत च त्या राष्ट्राच्या आकांक्षांचा समावेश होतो. आकांक्षांचें पर्यवसान कृतींत होतें. कोणत्या हि राष्ट्राच्या आकांक्षा कोणत्या स्वरूपाच्या होत्या व त्या तशा प्रकारच्या बनण्यास कोणतीं कारणें झालीं व त्यांस कोणत्या प्रकारचें मूर्त रूप प्राप्त झालें, हें ठरविण्याचें विश्वसनीय व उत्तम साधन म्हणजे त्या राष्ट्राचें वाङ्मय हें होय. समर्थसंप्रदायांतील रामकथेच्या परिपोषाचें वैशिष्ट्य व प्रमाण लक्षांत येण्याकरितां समर्थपूर्वकालीं मराठी वाङ्मयांत रामकथेचा परिपोष कोणीं कोणीं केला व कोणत्या प्रमाणात केला या

संबंधाची चर्चा करणें अवश्य आहे. मराठी वाङ्मयाचा इतिहास लक्षांत घेतां ज्ञानेश्वराचा काल हा त्या वाङ्मयाचा उगमकाळ होय. या काळापासून तों श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या निधना पावेतों मराठींत पुष्कळ वाङ्मय निर्माण झालें; व त्यापैकीं बरा च महत्त्वाचा भाग प्रस्तुत काळीं आपणास उपलब्ध झाला आहे. या वाङ्मयाच्या आधारानें ज्ञानेश्वरकालापासून तों रामदासाच्या निधनापावेतों महाराष्ट्रीयांच्या आकांक्षा कोणकोणत्या काळीं कसकशा स्वरूपाच्या होत्या व त्यांत स्थित्यंतरें कशीं कशीं घडत गेलीं, याची उत्तम प्रकारची कल्पना आपणास करिता येते. या काळांत रामकथेचा परिपोष महाराष्ट्रांत कोणकोणत्या व्यक्तींनीं कोणकोणत्या प्रमाणात केला, याचें परीक्षण प्रथम करून नंतर समर्थांनीं त्यांच्या काळीं केलेल्या रामकथेच्या परिपोषाचें दिग्दर्शन केलें म्हणजे समर्थांनीं केलेल्या रामकथेच्या परिपोषाचें वैशिष्ट्य उत्तम प्रकारें लक्षात येणार आहे.

रामकथा हें आपणा सर्व भारतीयाचें 'जुनें ठेवणें' आहे. भरतखंडाच्या कोणत्या हि प्रांतांतील अगदीं निरक्षर व अडाणी माणसास राम, लक्ष्मण, सीता, हनुमान, रावण व बिभीषण हीं नांवें माहित नाहींत, असें क्वचित् च आढळतें. हिंदुसंस्कृतींत जन्मास आलेल्या माणसाच्या रक्तांत त्याच्या जन्मापासून च रामकथा जन्मास आलेली असते, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. अशा रीतीनें प्रत्येक हिंदूच्या स्वाभाविक मनोरचनेचा रामकथा हा एक भाग च होऊन बसला आहे. तथापि पार पुरातन काळापासून निर्माण झालेल्या संस्कृत व आधुनिक काळीं उदयास आलेल्या प्राकृत वाङ्मयाकडे नजर टाकिली असता रामकथेचा विशिष्ट प्रकारचा परिपोष विशिष्ट पद्धतीनें अनेक कवींनीं व ग्रंथकारानीं निरनिराळ्या काळीं केल्याचें आढळून येतें. रामकथेचा मूळ पाया वाल्मिकी रामायणानें घातला. या मूळ पायावर काव्यें, नाटकें, चंपु, अध्यात्मिक ग्रंथ इत्यादि नानाप्रकारची मनोहर प्रासादरूपी ग्रंथरचना संस्कृत भाषेंत अनेक कवींनीं व विद्वानांनीं केलेली आहे. रामकथाविषयक संस्कृत भाषेंत निर्माण झालेलें हें वाङ्मय कोणतें ध्येय साध्य करण्यास्तव रचण्यात आलें, हा विचार तूर्त बाजूस ठेवून ज्ञानेश्वरकालापासून तों समर्थ उदयास येण्यापूर्वीच्या कालापावेतों रामकथेचा परिपोष महाराष्ट्रात कसकसा केला गेला, याचें आम्ही प्रथम दिग्दर्शन करितों.

ज्ञानेश्वराचा जन्म शके ११९३ मध्यें होऊन त्यानीं शके १२१८

मध्यें समाधि घेतली. त्यांच्या जन्मकालापासून समर्थांच्या जन्मापावेतों म्हणजे शके १५३० पावेतों ३३७ वर्षांचा काल गेला. या ३३७ वर्षांच्या काळांत मराठी भाषेंत ग्रन्थरचना करणारे असे लहान मोठे तीन चारशें कवि व ग्रंथकार होऊन गेले. रामकथेच्या परिपोषाच्या या कालविभागाचें शके १२०० ते १३००, शके १३०० ते १४०० व शके १४०० ते १५५० असे तीन कालविभाग करून या कालविभागांत रामकथेचा परिपोष कोणीं कोणीं कोणत्या पद्धतीनें केला, याचा विचार करणें सोईचें आहे; व या कालविभागांत झालेल्या रामकथेच्या परिपोषाची चर्चा यथानुक्रमें आह्मी करितों.

## शके १२०० ते शके १३०० चा काळ

या काळांत निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाई हीं चार भावंडें नामांकित संतकवि ह्मणून प्रसिद्धीस आलीं. ज्ञानेश्वरांची ज्ञानेश्वरी उर्फ भावार्थ-दीपिका व अनुभवामृत हे दोन तत्त्वज्ञानात्मक ग्रंथ सुप्रसिद्ध आहेत. या शिवाय त्यांचे कांहीं अभंग हि उपलब्ध आहेत. ज्ञानेश्वरांचे वडिल बंधु निवृत्तिनाथ व धाकटे बंधु सोपानदेव व बहीण मुक्ताबाई यांनीं केलेले अभंगरूपी वाङ्मय उपलब्ध झालें आहे. या चार हि भावडांनीं महाराष्ट्रांतील इतर संतांप्रमाणें महाभारत, रामायण इत्यादि ग्रंथांतील कथांचा परिपोष केल्याचें आढळून येत नाहीं. या काळांतील या प्रसिद्ध व्यक्तीं खेरीज दुसरे सुप्रसिद्ध संतकवि म्हणजे श्रीविठ्ठलभक्त नामदेव हे होत. यांनीं केलेलें अभंग-रूपी वाङ्मय पुष्कळ च आहे. कृष्णचरित्रांतील कित्येक प्रसंगासंबंधाचीं कथा-नकें काव्यरूपानें त्यांनीं रचलेलीं प्रसिद्ध आहेत. परतु नामदेवांनीं रामकथेचा परिपोष काव्यरूपांत केल्याचें आढळून येत नाहीं. या सुप्रसिद्ध सतकवींखेरीज इतर हि दुसरे कवि या काळांत होऊन गेले आहेत; परतु त्यांपैकीं हि कोणीं रामकथेचा परिपोष केल्याचें आढळून येत नाहीं.

## शके १३०० ते शके १४०० चा काळ

या कालविभागांत रामकथेसंबंधाचें वाङ्मय कोणीं निर्माण केल्याचें आढळत नाहीं. मराठी वाङ्मयरचनेच्या दृष्टीनें या काळाचा विचार केला असतां हा काल जवळ जवळ वांझ च म्हटला तरी चालेल.

या बाबतींत कै० भावे ह्यांनीं आपल्या महाराष्ट्र सारस्वतांत व्यक्त केलेला खालील अभिप्राय लक्षांत ठेवणासारखा आहे.

" चौदाव्या शतकांत व पंधराव्याच्या पूर्वार्धांत मराठींत ग्रंथरचना

झाली नाहीं. व त्या वें दीडशें वर्षांत मराठी लेखकांची लेखणी विश्रांति घेत पडली होती असा फार दिवसांचा समज आहे. पण तो अगदीं चुकीचा आहे. पूर्वीप्रमाणें या हि काळांत महाराष्ट्रांत ग्रंथरचनेचा क्रम सारखा चालू होता; पण या काळांतील रचना एक तर फार गुप्त ठेवण्यांत आली व जी थोडी थोडी बाहेर उजेडांत आली, तिचा परक्या राज्यकर्त्यांनीं व कडव्या असहिष्णु धर्मवेड्यांनीं जाळपोळ करून अगदीं नाश करून टाकिला. मुसलमानांनीं ग्रंथांचें काय केलें याची कहाणी सर्व प्रसिद्ध च आहे. पण दक्षिणेकडे समुद्रावरून आलेल्या ख्रिश्चन लोकांनीं तर या बाबतींत मुसलमानांच्या वर ताण केली. त्यांनीं ग्रंथ जाळले इतकें च नव्हे तर ते रचणारांना हि शासन लाविलें. आणखी याचे हि पुढें जाऊन त्यांनीं एक जाहीरनामा काढून एतद्देशीय लोकांनीं पोर्तुगीज भाषा च वापरली पाहिजे अशी ताकीद दिली. बरें, त्यानंतर आज दोन अडीचशें वर्षांत या पैकीं ग्रंथ मिळविण्याची कोणी करावी तशी खटपट केली नाहीं, किंवा जें मिळालें तें छापविण्याची तजवीज केली नाहीं. त्यामुळें तर कीटक आणि हवा या सर्व भक्षक शत्रूंनीं त्यांचा ठाव च पुसून टाकला. ”

मराठी वाङ्मयविकासाच्या दृष्टीनें हा काल कोणत्या कारणामुळें वांझ झाला, या संबंधाची भावे यांची उपपत्ति कोणास हि पटण्यासारखी आहे. कारणें कांहीं हि असोत, परंतु त्या काळचा महाराष्ट्रियांस परिचित असा एक हि रामकथाविषयक ग्रंथ अगदीं अलीकडील काळापावेतों उपलब्ध नव्हता. चौदाव्या शतकांतील मराठी वाङ्मयाविषयीं भाव्यांनीं केलेल्या चर्चेत कान्हो त्रिमलदास यानें रचिलेल्या पाताळकांडाचा उल्लेख केला आहे. यांत रामानें बिभीषणास लंका दिल्याचा कथाभाग ग्रंथकर्त्यानें वर्णिला आहे. कान्हो त्रिमलदास हा जंगम होता; व त्याचा ग्रंथ त्याच्या सांप्रदायी लोकांव्यतिरिक्त सर्वसामान्य महाराष्ट्रीय जनतेस परिचित झाल्याचें दिसत नाहीं. या गोष्टीचा विचार केला असतां रामकथापरिपोषाच्या दृष्टीनें या ग्रंथाचें महत्त्व विशेष मानितां येत नाहीं.

## शके १४०० ते शके १५६६ चा काळ

रामदासांचा जन्म शके १५३० मध्यें झाला. पहिलीं बारा वर्षें बालपण, व नंतरचीं बारा वर्षें पुरश्चरण व बारा वर्षें तीर्थाटण एकूण वर्षें छत्तीस गेल्यानंतर समर्थांच्या ग्रंथकर्तृत्वास प्रारंभ झाला, असें मानणें युक्त होईल;

यास्तव रामकथेच्या परिपोषाच्या दृष्टीनें शक १४०० ते १५६६ या दरम्यानच्या काळाचा च विचार करणें योग्य होईल. या काळाचा विचार केला असतां खालील ग्रंथकारांनीं रामकथेचा परिपोष केल्याचें आढळून येतें:—

१ केशवराज—यांचा काल सुमारें शके १४५०,
ग्रंथ रामायण

२ अनंतसुत ( कृष्णदास मुद्गल ) समाधीकाल शके १५२०, यांनीं रचलेलें रामायण उपलब्ध आहे.

३ एकनाथ समाधि शके १५२१. ग्रंथ, सीतामंदोदरीसंवाद, रामगीता, रामायण ( भावार्थ )

या तीन ग्रंथकारांनीं केलेल्या ग्रंथापैकीं एकनाथाचें भावार्थ रामायण हें महाराष्ट्रीयांच्या विशेष परिचयाचें आहे. त्याच्या खालोखाल महाराष्ट्रीयांस परिचित असें कृष्णदास मुद्गल याचें रामायण होय. ज्ञानेश्वरकालापासून तों एकनाथांच्या कालापावेतों रामकथेकडे महाराष्ट्रीय जनतेचें अगर महाराष्ट्रीय विचारवंत पुढाऱ्याचें विशेष लक्ष वेधलें गेल्याचें वर नमूद केलेल्या रामायण विषयक ग्रंथरचनेच्या अल्पतेवरून दिसून येतें. मुसलमानी सत्ता महाराष्ट्रांत प्रस्थापित झाल्यापासून कलियुग अवतरलें अशी ज्ञानेश्वरकालापासून तों एकनाथाच्या कालापावेतों उदयास आलेल्या नामदेव एकनाथ इत्यादि महाराष्ट्रीय संत पुढाऱ्यांची पक्की समजूत झाली होती, हें मागील लेखात त्या संतांचे जे उद्गार दिले आहेत त्यावरून पूर्ण सिद्ध झालें आहे. महाराष्ट्रीय समाजाच्या या पुढाऱ्यांची अशा प्रकारची पूर्ण समजूत झाली असून हि त्यांच्या लक्षात त्यांच्या काळच्या परिस्थितीचें रामरावणकाळाच्या परिस्थितीशीं साम्य असल्याचें कसें लक्षांत आलें नाहीं, या गोष्टीचें आश्चर्य वाटतें. जेथें मूळ कल्पना उदयास येण्याची च वानवा, तेथें रामकथेचा परिपोष विशिष्ट ध्येयास्तव विशिष्ट पद्धतीनें करण्याचा प्रयत्न त्या काळांत कोणाकडून केला जाऊ नये यात काहीं आश्चर्य नाहीं; असो. आतां कृष्णदास मुद्गलकृत रामायण व एकनाथी भावार्थ रामायण या दोन ग्रंथांची रचना त्या ग्रंथकर्त्यांनीं कोणत्या हेतूनें केली असावी हें पाहू.

कृष्णदास मुद्गल यानीं रामायणाचें युद्धकांड ओवी छंदांत रचिलें आहे. हा ग्रंथ रचण्यांत कृष्णदास मुद्गल यांचें ध्येय कोणत्या प्रकारचें होतें, हें त्या ग्रंथाच्या सुरवातीच्या खालील उताऱ्यावरून दिसून येतें:—

" असो हें बोलिलें सहज । पूर्वी बोलिला वाल्मिकराज । तेंचि उच्छिष्ट

कथितां बहु लाज । लावितो महाप्राणासि ॥ ७८ ॥ तरि लज्जा न लागावया-
कारणें । वाग्देवीनें केलें धावणें । कथामार्गी चालतां उणें । पडों नेदी सर्वथा
॥ ७९ ॥ उपमा लालित्य अर्थगौरव । तेंचि जाणावें शुद्धमुद्राकवित्व । ज्याचिये
गर्भी जे जे भाव । तेंचि चतुरीं निवडूनि घ्यावे ॥ ८० ॥ जैसे पद्मगर्भीचे
पराग । एक भोगूं जाणती भृंग । तेथें काय करावें मातंग । वृथा पुष्पकनाशक
॥ ८१ ॥ जे कवित्वीं नाहीं व्युत्पत्तिविलासु । ते कथेसि कैंचा तुंबळ रसु ।
तरी श्रोता नव्हे उदासु । ऐसें बोलिलें पाहिजे ॥ ८२ ॥ बोलिजैल आतां
बोलणें । परिसतां प्रश्निकां होय पारणें । ये पदप्रबंधींचि अक्षरें गुणें । आणिती
रत्न पुंजासी ॥ ८३ ॥ नाना अक्षरें नवरसाळें । कथा कल्पवल्लीचीं फळें ।
ज्यांचें भाग्य आगळें । ते स्वइच्छे सेविती ॥ ८४ ॥ कथा रामायणी विचित्र ।
वाराणसीपरीस सुक्षेत्र । विचारितां होय पवित्र । गंगेहूनु आगळी ॥ ८५ ॥
सुधारसाहूनि गौल्य । क्षीरनिधीपरीस सखोल । उत्तम रत्नाहूनि अमोल्य ।
कथा रामायणी ॥ ८६ ॥ शीतकराहूनि शीतळ । तमांतकापरीस तेजाळ ।
व्योमाहूनि विशाळ । अर्थविपर्यी ॥ ८७ ॥ कंदर्पकांतीपरीस निर्मळवती ।
वैकुंठवनितेपरी भाग्य देती । गौरीच्या अपेक्षा गुणवंती । शिवासि प्रिय होय
॥ ८८ ॥ गौरीहूनि अगळी गुणें । शिवासि प्रिय पदार्थी कवणें । म्हणऊनि
श्रोतयांचें आक्षेपणें । सहजेंचि पैं जालें ॥ ८९ ॥ वक्ता विनवी जोडला करीं ।
जें मथन जालें क्षीरसागरीं । तें हालाहल निघालें बाहेरि । तेणें सृष्टी आहाळली
॥ ९० ॥ ऐसें देखोनि शिव दयाळ । मग प्राशन केलें हालाहल । तेणें तनु
निर्मळ । गदगदां पैं लागली ॥ ९१ ॥ पुढें पिनाकपाणी काय करी । शीतळ
गंगा शिरीं धरीं । तिणें न तिवेचि मग मौळीचां पारीं । चंद्रकळा ठेविली
॥ ९२ ॥ फलद नव्हे ऐसेपरीही प्रेत्न । मग त्या हिमालयाचें कन्यारत्न ।
तिशीं शिव दे आलिंगन । परि न सुटे उष्णता विषाची ॥ ९३ ॥ मग तेणे
कैलासनाथें । रामकथा आणिली श्रवणपंथें । करीं धरिली सुखस्वार्थें । तेणें
सर्वांग निवालें ॥ ९४ ॥ ऐसी ही कथा रामायणी । भक्तिज्ञानवैराग्यवेणी ।
प्रयाग वाल्मिकाची वाणी । पूर्वदत्तें प्राप्त होय ॥ ९५ ॥ तरी या वाल्मिक
ऋषीचा महिमा । बोलिजे तितुक्या न्यून उपमा । जें भविष्य काव्य रघुत्तमा ।
रायाचें कथिलें ॥ ९६ ॥ महाकाव्य हें अर्थपुष्ट । वाल्मीककृत शिवें मानिलें
श्रेष्ठ । तेंचि परिसा मान्हाष्ट्र । भवच्छेदक सुखदातें ॥ ९७ ॥ मान्हाष्ट्र ऐसे
वाटे लोकां । परि हे वाल्मीककाव्याची शुद्ध टीका । येक येक अक्षरें ऐका ।
महापातकें नाशती ॥ ९८ ॥ आणिकें नाना व्रतें तपें । आचरतां बहुत
कष्टरूपें । पुढें क्लेशांतीं पूर्वसंकल्पें । इच्छाफळ पाविजे ॥ ९९ ॥ तैसी कथा
नव्हे रामाची । परिसतां पीयूषापरि रुचि । आणिक हे चहूं अर्थांचीं । फळें

भोगावित असे ॥ १०० ॥ कथार्पर्थी महाराष्ट्रवचनें । परि हीं रसिकें अति गहनें। जैसीं वनमक्षिकांचीं पदनें । मधूतें स्रवतीं ॥ १ ॥

महापातकांचा नाश करणारी रामकथा असल्यामुळे मूळ वाल्मीकिकृत रामायणाचें रूपांतर करणें हें, हा ग्रंथ करण्यांत ग्रंथकर्त्याचें ध्येय होतें, असें वरील उताऱ्यावरून स्पष्ट दिसतें. आतां एकनाथांच्या भावार्थ रामायणावरून तो ग्रंथ रचण्यांत त्यांचें ध्येय काय होतें, तें पाहूं.

एकनाथांचा हा ग्रंथ ओवी छंदांत असून बराच मोठा आहे. वाल्मीकिकृत संस्कृत रामायण हा ग्रंथ आधारभूत धरून विषयाचें विवेचन करीत असतां एकनाथांनीं इतर रामायण ग्रंथाचें हि आधार घेतले आहेत. हा ग्रंथ रचण्यांत एकनाथांचें ध्येय कोणत्या प्रकारचें होतें, हें लक्षांत येण्याकरितां त्या ग्रंथांतील खालील उतारा दिला आहे.

जैसी ज्यासी श्रीरामीं भक्ती । तैसी त्यावरी रामप्रीती । हें बोलिलेंसे बहुतां ग्रंथीं । मीच किती अनुवादों ॥ ९३ ॥ जैसा भाव तैसी प्रीती । जैसी प्रीती तैसी प्राप्ती । जैसी प्राप्ती तैसी स्थिती । हाचि परमार्थी मुख्यार्थ ॥ ९४ ॥ ग्रंथीं राखोनिया गुह्यार्थ । मुख्यत्वें दावावा परमार्थ । हाचि कवित्वाचा निजस्वार्थ । येणें रघुनाथ संतुष्ट ॥ ९५ ॥ संतुष्ट होती श्रोते । संतुष्ट होती वक्ते । संतुष्ट होती कथाकर्ते । श्रीरामचरित्र रामायण ॥ ९६ ॥ कथा परिसतां रामायण । पूर्वज उद्धरती जाण । पूर्वजांचें नवलाव कोण । उद्धरे संपूर्ण त्रिजगती ॥ ९७ ॥ श्रीरामकथेची नव्हाळी । हे सदाशिवाची जपमाळी । मणिकर्णिका अंतकाळीं । जपे कर्णमूळीं तें हें ब्रह्म ॥ ९८ ॥ सावधान करणें निजमना । तेचि मणिकर्णिका सत्य जाणा । आदरें परिसतां रामायणा । तें तारक पूर्ण ब्रह्म ॥ ९९ ॥ आदरें रामकथा श्रवण । तें तारक ब्रह्म रामायण । काशी मणिकर्णिका आपण । हात जोडूनि उभ्या तेथें ॥ १०० ॥ या लागीं रामकथेपासीं । तीर्थें तिष्ठती अहर्निशीं । चारी मुक्ति होती दासी । कथाउल्हासीं परमानंद ॥ १ ॥ कथा रामायणीं अगाध । पदोपदीं परमानंद । श्रवणें ओसंडे आनंद । निजात्मबोध श्रीरामें ॥ २ ॥ रामायणाच्या निजकीर्ती । सुखें शिवादिक डुलती । तेणें पावन त्रिजगतीं । कथाश्रवणार्थी श्रीराम संतोषे ॥३॥

(बालकांड अध्याय २७)

(एकनाथी रामायण निर्णयसागरप्रत इ. स. १९१७)

वरील उताऱ्यांत " ग्रंथीं राखूनिया गुह्यार्थ । मुख्यत्वें दावावा परमार्थ । हाचि कवित्वाचा निजस्वार्थ । येणें रघुनाथ संतुष्ट ॥ " ह्या ओवींत एकनाथांनीं जो अभिप्राय व्यक्त केला आहे, त्याचा नमुना म्हणून त्या च ग्रंथांतील

खालील ओव्या दिल्या आहेत.

श्रीरामाच्या मनोगता । अनुकूल वर्ते सीता । सीतेचिया मनोरथा । परिपूर्णता श्रीरामें ॥ ७७ ॥ सीतेचा भाव श्रीरामीं पूर्ण । राम सीतेसीं संपूर्ण । सीता रामें सुखसंपन्न । सुखी रघुनंदन सीतेचेनि ॥ ७८ ॥ रामरसें रसज्ञ सीता । सीतेच्या रसनें श्रीराम भोक्ता । श्रीराम देखणें सीता डोळसता । तिचेनि देखता श्रीराम ॥ ७९ ॥ श्रीरामें सीता सुंदर पूर्ण । सीतेनें राम शोभे सगुण । श्रीरामें सीता सुलक्षण । सीतेचेनि लक्ष्यलक्षण श्रीरामा ॥ ८० ॥ श्रीराम सीतेचा निजभोग । सीतेचेनि श्रीराम सुरंग । श्रीरामें सीता शोभे सांग । सीता सर्वांग श्रीराम ॥ ८१ ॥ सीता रस श्रीराम स्वाद । सीता सुमन श्रीराम सुगंध । सीता बुद्धि श्रीराम बोध । अनन्यसिद्धि येरयेरां ॥ ८२ ॥ सीता वचन श्रीराम वचनार्थ । सीता पद श्रीराम पदार्थ । सीता मुक्ति श्रीराम मुक्त्यर्थ । परम स्वार्थ येरयेरां ॥ ८३ ॥ सीता जीव राम जीवन । सीता मन राम मनोज्ञ । सीता चित्त श्रीराम चैतन्य । आनंदघन येरयेरां ॥ ८४ ॥ सीता धरा श्रीराम धारक । सीता चाळण श्रीराम चाळक । सीता व्याप्य श्रीराम व्यापक । सुखसंतोष येरयेरां ॥ ८५ ॥ सीता क्रिया राम कर्ता । सीता भोग्य राम भोक्ता । सीता ज्ञान राम ज्ञाता । एकात्मता अतिप्रीतीं ॥ ८६ ॥ सीता शर्करा राम गोडी । सीता व्यवसाय राम जोडी । एकात्मता अति आवडी । न कळे फुडी श्रुतिशास्त्रां ॥ ८७ ॥ येरयेरांविण जाण । न करिती उदकपान । येरयेरांविणें न खाती पान । प्रीति अनन्य येरयेरां ॥ ८८ ॥ येरयेरां वेगळेपण । होऊं न शकती अर्धक्षण । अणुमाजी दोघेजण । नांदती पूर्ण पूर्णत्वें ॥ ८९ ॥ ऐसीऐसिया अनन्यगतीं । श्रीराम भोगीं सीता सती । सीतेचिया निजात्मप्रीतीं । श्रीराममूर्ति उल्लासे ॥ ९० ॥ सीतेचा भावार्थ संपूर्ण । देखोनि उल्लासे रघुनंदन । सीता भाव धरी द्विगुण । प्रीति चतुर्गुण श्रीरामीं ॥ ९१ ॥ सीता भाव धरी अधिकाधिक । तंव तंव श्रीरामीं ओसंडे सुख । कैसी अति प्रीति अलोलिक । एकएका अनन्य ॥ ९२ ॥

( बालकांड अध्याय २७ )

( एकनाथी रामायण. निर्णयसागरप्रत इ. स. १९१७. )

भावार्थ रामायण रचण्यात रामकथेच्या द्वारें परमार्थपर तत्त्वाचें विवेचन करून स्वतःचा उद्धार करण्याची पात्रता वाचकात आणणें हें एकनाथाचें ध्येय असल्याचें वरील उताऱ्यावरून स्पष्ट दिसून येतें. कृष्णदास मुद्गल यांनीं केलेलें रामायण, त्या च प्रमाणें एकनाथानीं केलेलें भावार्थ रामायण हे ग्रंथ रचण्यात रामरावणयुद्धकल्पनेस पोषक अशा प्रकारच्या कल्पना महाराष्ट्रीयांच्या मनात

उद्दीपित कराव्या, अशा प्रकारचें ध्येय या ग्रंथकारांचें नव्हतें हें उघड आहे. समर्थ उदयास येण्याच्या पूर्वीच्या काळांत महाराष्ट्रांत रामकथेचा परिपोष कोणींकोणीं व कोणत्या ध्येयास्तव केला, व तो कोणत्या प्रमाणांत केला याचें येथपावेतों विवेचन झालें आहे.

आतां महाराष्ट्रेतर प्रांतांत रामकथेच्या परिपोषाचा जो ओघ यावत्काल-पावेतों सारखा जोरानें वाहात आहे, त्याविषयींची प्रस्तुत स्थळीं चर्चा करणें अवश्य आहे. उत्तर हिंदुस्थानांत तुळशीकृत रामायण या ग्रंथाचें पारायण करणारे लक्षावधि लोक आहेत. या रामकथेच्या जिवंत ओघाचें उत्पादक सुप्रसिद्ध संत तुलसीदास हे होत. शके १४५४ मध्यें म्हणजे समर्थ जन्मास येण्यापूर्वी ७५ वर्षे अगोदर ते जन्मास आले. महाराष्ट्रीय संत एकनाथ यांचें तुलसीदास हे जवळ जवळ समकालीन होत. तुलसीदासांच्या जन्मापावेतों महाराष्ट्रांत मुसलमानी राज्य स्थापन होऊन जितका काळ लोटला होता, त्यापेक्षां जवळ जवळ दोनशें वर्षे अधिक मुसलमानी राज्य उत्तर हिंदुस्थानांत स्थापिलें गेल्यानंतर लोटिलीं होतीं. यामुळें महाराष्ट्रीय समाजाच्या दैन्यावस्थेपेक्षां हि उत्तर हिंदुस्तानातील हिंदु समाजाची वाताहत व दैन्यावस्था मुसलमानी राज्यसत्तेच्या योगानें अधिक प्रमाणांत झाली होती. अशा प्रकारच्या परिस्थितींत तुलसीदासांचा जन्म झाला. शुक्रक्षेत्रात त्याचें शिक्षण झाल्यानंतर गृहस्थाश्रमी या नात्यानें त्यांनीं आपला संसार थाटला. पुढें त्यांना उपरति होऊन ते निःसीम रामभक्त बनले. मथुरा, वृंदावन, कुरुक्षेत्र, प्रयाग इत्यादि स्थलीं त्यांनीं यात्रा केल्या; अयोध्येस वास करीत असतां श्रीरामानें तुलसीदासास स्वप्नांत दर्शन देऊन सर्व लोकास समजेल अशा भाषेत रामायण रचण्याविषयीं आज्ञा केली. या आज्ञेस अनुसरून ' रामचरितमानस ' ( ज्यास प्रस्तुत कालीं तुलसीकृत रामायण असें म्हणतात ) या नांवाचा ग्रंथ तुलसीदासानीं रचिला. हा ग्रंथ रचण्यात तुलसीदासाचें ध्येय कोणत्या प्रकाराचें होतें, याची कल्पना या ग्रंथातील खालील उताऱ्यावरून करतां येते.

राम सकुल रन रावनु मारा । सीय सहित निजपुर पगु धारा । राजा राम अवध रजधानी । गावत गुन सुर मुनि बरबानी ॥ सेवक सुमिरत नाम सप्रीती । बिनु स्रम प्रबल मोहदलु जीती ॥ फिरत सनेहमगन सुख अपने । नामप्रसाद सोच नहिं सपने ॥

रामानें रणकंदन माजवून एका रावणाचा च काय तो निवेश केला, आणि सीतेस घेऊन तो आपल्या राजधानींत परत आला. नुसत्या अयोध्या राजधानीचे राम हे राजे होत. एवढ्याच गुणावरून देव आणि ऋषी त्याचे गोडवे गात आहेत. परंतु रामभक्त सप्रेम नामस्मरणानें च मायेच्या प्रचंड सैन्याचा विध्वंस करून स्वानंदसाम्राज्यात स्वच्छंद संचार करीत राहातो आणि नामाची कृपा त्याचेवर अशी असते कीं, स्वप्नांत हि त्याला कधीं शोक करण्याचा प्रसंग येत नाहीं.

दो०—ब्रह्म राम तें नाम बड बर दायक-बर दानि ।

रामचरित सतकोटि महँ लिय महेस जिय जानि ॥

तस्मात् सगुण राम व निर्गुण राम या दोन्ही पेक्षा हि रामनाम समर्थ असून तें वरदाचे हि वरद होय. ही खात्री जाणूनच श्रीविश्वेश्वरानें शतकोटी रामायणातून तेवढें नामच उचलून घेतलें.

चौ० नामप्रसाद संभु अबिनासी । साज अमंगल मंगलरासी । सुक-सनकादि सिद्ध-मुनि-जोगी । नामप्रसाद ब्रह्म सुख भोगी । नारद जानेउ नाम-प्रसादू । जगप्रिय हरि हरि-हर प्रिय आपू ॥

त्याच नामाच्या प्रसादेंकरून अविनाशी शंभु अमंगलवेष असूनहि मंगलराशि बनला. शुकसनकादि सिद्ध मुनी आणि योगी याना तरी नामाच्याच अनुग्रहानें ब्रह्मसुख भोगण्यास मिळालें. नारदानें नामाचा प्रभाव जाणला, म्हणून तर तो संसारानुबंधी जी माया तिचा परिहार करून खुद्द हरिहराचादि जीव कीं प्राण होऊन बसला.

नाम जपत प्रभु कीन्ह प्रसादू । भगतसिरोमनि भे प्रह्लादू । ध्रुब सगलानि जपेउ हरिनाऊँ । पाएउ अचड अनुपम ठाऊँ । सुमिरि पवनसुत पावन नामू । अपने बस करि राखे रामू । अपत अजामिल गज गनिकाऊ । भये मुकुत हरि-नाम प्रभाऊ ।

नामजपामुळेंच प्रभूनीं कृपा केली आणि प्रल्हाद भक्तशिरोमणि झाला. ध्रुवानें तर अत्यंत उद्विग्नतेनें भगवन्नाम जपलें होतें, तरी देखील तो अनुपम व अढळ अशा पदीं जाऊन बसला. हनुमंतानीं देखील त्या पवित्र नामस्मरणानेंच रामास आत्मवश करून ठेविलें. अजामीळ, गजेंद्र, पिंगला वेश्या इत्यादिक देखील हरिनामप्रभावानेंच उद्धरून गेले.

*कहउँ कहाँ लगि नाम बडाई । राम न सकहिं नामगुन गाई ।*

या नामाची थोरवी मीं कोठवर सांगावी ? प्रत्यक्ष राम देखील

आपल्या नामगुणांचे वर्णन करूं शकणार नाहींत.

दो०—नाम राम को कलप तरु कलि कल्याननिवासु।
जो सुमिरत भए भाँग ते तुलसी तुलसीदासु ॥ ३२ ॥

या कलिकालांत कल्याणभवन अशा कल्पतरु एक रामाचें नामच होय. ज्यांनीं ज्यांनीं त्याचें स्मरण केलें ते भाग्यास चढले. ( ह्याला प्रमाण कवी स्वतःचेंच देत आहेत. ) आधींचा तुळशी तो आज मित्तीस तुलसीदास म्हणून गाजत आहे.

चौ०–चहुं जुग तीन काल तिहुँ लोका। भये नाम जपी जीव बिसोका।
बेद पुरान-संत-मत एहू। सकल- सुकृत-फल राम सनेहू।

चारी हि युगांत, तिन्ही हि काळांत आणि तिन्ही हि लोकांत कोणी जीव जर शोकरहित झाला असेल, तर तो नाम जपानें च होय. वेद, पुराणें आणि संत यांचें मत तरी असें च आहे कीं, रामभक्ति हें च सर्व सुकृतांचें फल होय.

ध्यानु प्रथम जुग मखविधि दूजे। द्वापर परितोषन प्रभु पूजे। कलि केवल मल-मूल-मलीना। पापपयोनिधि जनमन मीना। नाम काम तरु काल कराला। सुमिरत समन सकल जगजाला।

कृतयुगांत ध्यानयोगानें, त्रेतायुगांत यज्ञयागानें आणि द्वापारयुगांत पूजाविधीनें प्रभु संतुष्ट होतात. कलि म्हणजे केवळ पापमूळ आणि मलिन असून त्यांतील लोकांचीं मनें पापसमुद्रांत मीना प्रमाणें निमग्न झालीं आहेत. अशा त्या कराल कलिकालांत नाम हाच कल्पतरु असून त्याच्या च स्मरणमात्रेंकरून सकल मायाजालाचा नाश होतो.

रामनाम कलि अभिमतदाता। हित परलोक लोक पितुमाता। नहि कलि करम न भगतिबिबेकू। रामनाम अवलंबन एकू। कालनेमि कलि कपट-निधानू। नाम सुमति सुमरथ हनुमानू।

रामनाम हें कलींत इच्छित वस्तु देणारें, परलोकींचा सखा आणि इहलोकींचे मायबाप होत. कलींत कर्म नाहीं, भक्ति नाहीं अथवा ज्ञान हि नाहीं. त्यांत काय तो एक रामाचा च आधार आहे. कलि हा कपट-निधान कालनेमी असून सुबुद्ध आणि बलाढ्य अशा हनुमान एक नाम च होय.
[ श्री तुलसी रामायण ( मराठी भाषांतरासहित ) जामदार कृत पा. ३१-३२ ]

कलियुगांत रामनामस्मरण हा च एक खात्रीचा मोक्ष प्राप्तीचा मार्ग असल्या कारणानें रामचरितमानस ग्रंथाच्या वाचनानें मानवी प्राण्यास मोक्ष-प्राप्ति व्हावी, या हेतूस्तव तुलसीदासांनीं आपला ग्रंथ रचिल्याचें वरील उताऱ्यावरून स्पष्ट होत आहे. त्या परिस्थितीच्या योगानें रामरावणयुगाची

कल्पना समर्थांच्या मनांत उद्भूत झाली, त्या च प्रकारची परिस्थिति तुलसीदासांच्या सभोंवती असतां त्यांच्या मनांत ती कल्पना उद्भूत झाल्याचें दिसत नाहीं.

पूर्वी जे मारिले होते । ते चि आतां वळावले । कोपला देव - देवांचा आनंदवनभुवनीं ॥ २९॥ (रामदासांची कविता प्रथम खंड ४२४)

ही गोष्ट समर्थांच्या लक्षांत आली, त्याप्रमाणें तुलसीदासांच्या लक्षांत आली नाहीं. यामुळें तुलसीकृत रामायणामध्यें रामनामाचा महिमा वर्णन करणें, हा जो रामकथा गाणारांचा सर्वसामान्य हेतु त्या च हेतूनें तुलसीदासांनीं आपल्या ग्रंथाची रचना केली.

आतां समर्थ ज्या काळीं जन्मास आले, त्या नंतरच्या काळांत त्यांच्या प्रमाणें इतर ग्रंथकारांनीं रामकथेचा परिपोष कसकसा महाराष्ट्रांत केला याचें आम्ही दिग्दर्शन करितों.

१ आनंदमूर्ति ब्रह्मनाळकर (समर्थपंचायतनांपैकीं एक सत्पुरुष.) समाधिशक १६१८. रामदासांचे समकालीन. ग्रथाचें नांव रामचरित्र.

२ मुक्तेश्वर जन्म शके १५३१. समर्थांचे समकालीन. ग्रंथाचें नांव रामायण

३ शिवराम- शके १६०७. ग्रंथ अध्यात्मरामायण.

वरील तीन ग्रंथकारांनीं केलेल्या ग्रयांपैकीं आपल्या विशेष परिचयाचा ग्रंथ म्हटला म्हणजे मुक्तेश्वरकृत रामायण हा होय. मुक्तेश्वरांची त्यांच्या साधुत्वापेक्षां एक श्रेष्ठ प्रतीचे कवि अशी ख्याति आहे, व त्यांच्या रामायण ग्रंथाचें निरीक्षण केलें असतां त्या ग्रंथाची भाषा, त्यांत उपयोगांत आणिलेलीं निरनिराळीं वृत्तें यावरून ही गोष्ट दिसून येणार आहे. मुक्तेश्वरानीं रामायण ग्रंथाची रचना कोणत्या ध्येयास्तव केली, हें त्या ग्रंथांतील खालील उताऱ्यावरून दिसून येतें.

श्रीमद्रामपदाम्बुजे हृदि सदा ध्यातुर्भवाब्धेर्भिया ।
मुक्तेशस्य विराजते सुरुचिरा वाणी गुणग्राहिणी ।
नानानाटकभावपद्यरचनासंदोहसान्द्रीकृता ।

---

* देवांचा देव कोण याचा खुलासा समर्थांच्या खालील ओवीवरून होतो।—

राम हा देव देवांचा । देव मतक्ष सोडिले ।

(रामदासाची कविता प्रथम खंड पान ४३२)

सुधाख्या सुजनैर्मनोहरतरा संसारदुःखापहा ॥ १ ॥
जयतु विजितमन्त्रं जानकीप्राणमित्रं ।
विबुधविनतिपात्रं विश्वविख्यातमन्त्रम् ॥
दशरथनृपपुत्रं दैत्यसंहारमंत्रं रघुपतिनिजसूत्र रामरामेति मन्त्रम् ॥२॥
संसारसागरसमुत्तरणैकमन्त्वं ब्रह्मादिसर्वसुरपूजितसिद्धमन्त्रम् ।
दारिद्र्यदुःखगतशोकविनाशमंत्रं वन्दे महाभयहर रघुराजमंत्रम् ॥ ३ ॥
संसारार्णवि दुस्तरीं बहु बहू कामादिकीं मोहिले ।
दंभोपाधिकनेममायिकसुखा दाराधनें गोविलें ।
विद्यावादवितंडजालकलनीं सर्वांसि गर्वाधिलें ।
पद्मावल्लभपाद सूलभ जगीं निर्धारितां मानिलें ॥ ४ ॥
रघुकुलतिलकाचें नाम याचे वसो दे ।
विषयरतिसुखाचा काम जीवीं नसो दे ।
मग तुज नलगे ती मुक्तिचिंता कराया ।
परमगति विमुक्ती आप लागे वराया ॥ ५ ॥
रघुकुलतिलकाची पुण्यचरित्रगंगा ।
समरस यमुना हे देशवाणी अमोघा ।
भुवनजनकपुत्री गुप्तसायुज्यरंगा । श्रवणपरिघवेणी साम्य होय प्रयागा ॥ १६ ॥
हृदयकमललिंगालागि पीयूष भावें ।
श्रवणकनककुंभीं सादरेशीं भरावें ।
अनुदिन गुण नामीं नित्य शर्मी रमावें ।
अचरचरजिवांतें रामरूपीं नमावें ॥ १७ ॥

( मुक्तेश्वर रामायण बालकांड )

रामनामस्मरणद्वारें मोक्षप्राप्तीचा लाभ होतो, तो लाभ प्राप्त होण्याकरितां मुक्तेश्वरांनी आपल्या ग्रंथाची रचना केली. मुक्तेश्वर हे समर्थांचे समकालीन. *जी परिस्थिति समर्थांच्या सभोंवार होती ती च मुक्तेश्वरांच्या हि* सभोंवार होती; परंतु महाराष्ट्रीय समाजाच्या तत्कालीन परिस्थितीवरून जी कल्पना समर्थांच्या मनात उद्भूत झाली, तिचा मुक्तेश्वरांच्या मनात उदय झाला नाहीं. येथ पावेतों केलेल्या विवेचनावरून समर्थांच्या पूर्वी व काळीं रामकथा रचणारे जे अनेक ग्रंथकार होऊन गेले, त्यांचें रामकथा रचण्याचें ध्येय मोक्षप्राप्तीचा मार्ग सुलभ करून देणें हा असल्याचें स्पष्ट झालें आहे.

आता समर्थांनीं रामकथेचा परिपोष कोणत्या ध्येयास्तव केला, खुद्द त्यांच्या ह्यातींत त्यांनीं स्वतः व त्यांच्या शिष्यांनीं रामकथेचा परिपोष कोणत्या प्रमाणांत केला ह्याच्या चर्चेकडे आह्मी वळतों. समर्थ रामदास स्वामी हे निःसीम रामभक्त होते, हें सर्वश्रुत आहे. श्रीराम प्रभू-विषयीं समर्थांची निष्ठा कोणत्या स्वरूपाची होती, या विषयींची बरोबर कल्पना होण्याकरितां समर्थांच्या स्फुट प्रकरणांपैकीं एका प्रकरणांतील खालील उद्गार आह्मी येथें देतों.

आम्हां नाहीं चाड ते कोणीं येकाची । दृढ राघवाची कास धरूं ॥ ६ ॥
कास धरूं जेणें पावनची केलें । तेथें माझें जालें समाधान ॥ ७ ॥
समाधान जालें प्रलयासी आलें । धन्य तें पाउलें राघवाचीं ॥ ८ ॥
राघवाचीं पदें मानसीं धरीन । विश्व उधरीन हेळामात्रें ॥ ९ ॥
हेळामात्रें मुक्त करीन या जना । तरीच पावना राघवाचो ॥ १० ॥
राघवाचा दास मी जालों पावन । पतित तो कोण उरों शके ॥ ११ ॥
उरों शके ऐसें कल्पांतीं घडेना । जो कोण्ही पुसेना त्यासी उणें ॥ १२ ॥
उणें न संगता माझ्या सूर्यवंशा । कोण्हाची दुराशा नाहीं आम्हा ॥ १३ ॥
आम्हा नाहीं उणें राघवाच्या गुणें । ब्रीदची राखणें पावनाचें ॥ १४ ॥
पावनाचें ब्रीद आम्हा प्राप्त जालें । प्रचीतीस आलें कितीयेक ॥ १५ ॥
कितीयेक जन ज्ञानें उधरीले । कृतकृत्य जाले तत्काळची ॥ १६ ॥
तत्काळची मोक्ष हें ब्रीद रामाचें । होत आहे साचें येणें काळें ॥ १७ ॥
येणें काळें मोक्ष जरी मी देईना । दास म्हणवीना राघवाचा ॥ १८ ॥
राघवाचा वर पावलों सत्वर । जनाचा उधार करावया ॥ १९ ॥

( श्रीरामदासाची कविता प्रथम खंड पान २०६ )

वरील उद्गाराप्रमाणें च दुसऱ्या एका प्रकरणांतील खालील उद्गार महत्त्वाचे असून लक्षांत ठेवण्यासारखे आहेत.

कास या रघुनाथाची । धरितां सुख पावलों ।
इतर कष्टती प्राणी । घोर संसारसांकडीं ॥ १ ॥
सांकडीं तोडिलीं माझीं । राघवें करुणाळयें ।
पूर्वींच तुटली माया । दुःख शोक विसंचला ॥ २ ॥
सेवकु मानवीयांचे । कष्टती बहुतांपरी ।
सेविला देव देवांचा । तेणें मी धन्य जाहलों ॥ ३ ॥
नीच हे मानवी प्राणी । नीचाश्रय कामा नये ।
महत्कीर्ति श्रीरामाची । फावला महदाश्रयो ॥ ४ ॥

विबुधां आश्रय ज्याच्या । पावले बंदमोचने ।
सेवकु मारुती ऐसा । त्याचा मी म्हणती जनीं ॥ ५ ॥

निवाला सीव ज्या नामें । ज्या नामें वाल्मीक दसी ।
जें नाम सकळां तारीं । तें नाम मज अंतरीं ॥ ६ ॥

( श्रीरामदासांची कविता प्रथमखंड पान ३४१ )

समर्थांच्या चरित्राची गुरुकिल्ली या त्यांच्या उद्गारांत असून त्यांनीं त्यांच्या काळीं महाराष्ट्रांत केलेल्या कामगिरीची उपपत्ति लावतांना त्यांची श्रीरामप्रभूवरील वरील उद्गारांत दिसून येणारी निष्ठा विसरून चालावयाचें नाहीं.

समर्थांच्या वर दर्शविलेल्या निष्ठेस अनुसरून श्रीरामचंद्रप्रभूविषयीं अनेक स्तुतिपर प्रकरणें त्यांनीं रचिलीं आहेत.

या प्रकरणांव्यतिरिक्त रामचरित्रपर समर्थांनीं केलेली ग्रंथरचना म्हणजे त्यांनीं केलेलें रामायण हें होय. समर्थांनीं रामायणाचीं फक्त दोन च कांडें मराठींत रचिलीं आहेत. एक सुंदरकांड व दुसरें युद्धकांड.

समर्थांनीं केलेल्या या कांडांची रचना व त्यांतील कथाभाग या बाबींच्या वैशिष्ट्याची चर्चा करण्यापूर्वी रामकथेचें महत्त्व समर्थांस कोणत्या दृष्टीनें वाटत होतें, याचें प्रथम दिग्दर्शन करणें अवश्य आहे. समर्थांनीं या संबंधाचा खुलासा युद्धकांडांतील खालील श्लोकांत केला आहे.

कथा शंकराची कथा कार्तिकाची ।
कथा चंडिकेची कथा मोरयाची ।
कथा वेंकटीची कथा वीठलाची ।
कथा मल्लयाची कथा भैरवाची ॥ ५ ॥

कथा भूमिक्षा वामना भार्गवाची ।
कथा कौरवा पांडवा माधवाची ।
कथा देव इंद्रादि ब्रह्मादिकाची ।
समस्तामधें श्रेष्ठ या राघवाची ॥ ६ ॥

जेणें फेडिला पांग ब्रह्मादिकांचा ।
बळें तोडिला बंद त्या त्रीदशांचा ।
म्हणोनी कथा थोर या राघवाची ।
जनीं ऐकतां शांत होते भवाची ॥ ७ ॥

कथा थोर रामायणी सार आहे।
दुजी ऊपमा ये कथेला न साहे।
तिन्ही लोक गाती सदा आवडीने।
भविष्योत्तरें वांटिलीं शंकरानें ॥ ८ ॥

ऋषीमाजि श्रेष्ठू विचारें वरिष्ठू।
सदा येकनिष्ठू सगूणीं प्रविष्टू।
चरित्रें विचित्रें वनामाजि वस्तां।
मुखें बोलिला राम नस्तां समस्तां ॥ ९ ॥

कथा राघवाची सदाशीव पाहे।
तळीं ऐकतां शेष थकीत राहे।
कथा श्रेष्ट हे ऐकतां दोष जाती।
जनीं सुकृती ऐकती धन्य होती ॥ १० ॥

(श्रीरामदासांची कविता प्रथम खंड पान ११)

रावणाच्या बंदिवासांतून श्रीरामानें ब्रह्मादि देवांना मुक्त केलें, यामुळें सर्व कथांत रामकथा समर्थांना श्रेष्ठ वाटली; व ह्मणून च या कथेपैकीं फक्त सुंदर आणि युद्ध या दोन कांडांतील च कथाभाग त्यांनीं मराठींत काव्यरूपानें वर्णिला. समर्थांपूर्वी होऊन गेलेल्या व त्यांच्या समकालीन ग्रंथकारांनीं कोणत्या हेतूनें उद्युक्त होऊन रामकथा गाइली, हें मागील विवेचनावरून आपल्या निदर्शनास आलें आहे. समर्थांच्या वरील उद्गारांत दृष्टोत्पत्तीस येणारा हेतु रामकथा रचणाऱ्या इतर कोणत्या हि ग्रंथकारानें व्यक्त केलेला आढळत नाहीं. *समर्थांनीं केलेल्या रामकथेच्या परिपोषाचें हें जें वैशिष्ट्य त्याचा, रामरावण-युगाची त्यांच्या काळीं पुनरावृत्ति होत असल्याची जी त्यांची भावना तिच्याशीं* फार निकट संबंध आहे. रामरावणयुगाची पुनरावृत्ति होत आहे, ही कल्पना महाराष्ट्रीय जनतेस पटल्यावर व ती त्यांच्या मनांत रुजविल्यावर त्या युगाचे रावणपराभव व रामविजय हें पर्यवसान सिद्ध होण्यास पोषक अशी गोष्ट म्हणजे रामकथेपैकीं सुंदर व युद्ध कांडांतील कथाभागाचा महाराष्ट्रीय जनतेंत प्रसार करणें हें होय. समर्थांनीं या दोन कांडांतील कथाभाग काव्य-रूपानें सजवून त्याचा प्रसार वरील हेतूनें महाराष्ट्रीय जनतेंत केला. श्रुतिस्मृति-प्रणीत धर्मस्थापनेस्तव स्वराज्यस्थापनेचें जें महत्कार्य छत्रपति शिवाजी महाराजांनीं सुरू केलें होतें, तें साध्य होण्यास दोन गोष्टींची आवश्यकता होती. पहिली गोष्ट म्हटली म्हणजे मुसलमानी राजसत्तेविषयीं सर्वसाधारण

महाराष्ट्रीय जनतेच्या मनांत द्वेष उत्पन्न करून तिजला तिच्याकडून मिळणारा पाठिंबा बंद करणें ही होय. दुसरी गोष्ट म्हणजे छत्रपति शिवाजी महाराजांकडून स्थापित होणाऱ्या स्वराज्यावर महाराष्ट्रीयांचीं मनें लुब्ध करून त्यांचा पूर्ण पाठिंबा त्यास प्राप्त करून देणें ही होय. मुसलमानी राजसत्तेच्या योगानें महाराष्ट्रीय जनतेच्या होणाऱ्या गांजणुकीमुळें वरील दोन गोष्टींपैकीं पहिली गोष्ट सिद्ध झाली होती. समर्थ चांफळ खोऱ्यांत अवतीर्ण होण्याच्या सुमारास छत्रपतींचें स्वराज्यस्थापनेचें कार्य नुकतेंच सुरू झालें होतें. शिवाजी महाराज हे विष्णूचे अवतार असून धर्मस्थापनेस्तव महाराष्ट्रांत अवतीर्ण झाले आहेत, ही भावना समर्थांनीं प्रवृत्त केलेल्या रामरावणयुगकल्पनेच्या योगानें महाराष्ट्रीय जनतेंत प्रसार पावली होती. अशा स्थितींत महाराष्ट्रीय जनतेंत व त्यांतल्यात्यांत त्या जनतेपैकीं क्षत्रिय वर्गांत धाडस, शौर्य, धैर्य, धारातीर्थी देह ठेवण्याची तयारी इत्यादि गुणांचा विकास करून स्वराज्यस्थापनेच्या कार्मी त्या जनतेस साह्यकारी बनविणें, ही स्वराज्यस्थापनेस पोषक अशा वर नमूद केलेल्या गोष्टींपैकीं दुसरी गोष्ट होय. ही गोष्ट साध्य करण्यास्तव समर्थांनीं रामायणापैकीं सुंदर व युद्ध हीं दोन च कांडें मराठींत रचिलीं व त्याचा प्रसार सर्व महाराष्ट्रीय जनतेंत केला. युद्धकांड नेहमीं वाचण्याविषयीं समर्थांची शिकवण असल्याचें समर्थशिष्य गिरिधर यांच्या खालील वचनावरून दिसून येतें.

रामदास समर्थ श्रीगुरु संत सज्जन तोषले ।
युद्ध कांड अखंड वाचित राहें ह्मणउनि बोलिले ।

( श्रीसमर्थप्रताप प्रस्तावना पान ४६ )

छत्रपति शिवाजी महाराजांच्या सैनिकांस समर्थकृत रामायण नित्य वाचून दाखविणारे पुराणिक त्या काळीं सैन्यांत ठेवण्याचा प्रघात असल्याचें सिद्ध करणारा पुरावा अद्यापपावेतों उपलब्ध झालेला नाहीं. परंतु त्या काळीं प्रत्येक किल्ल्यावर मुद्राधारी या नांवाचे अधिकारी असत. अशा एखाद्या शिवकालीन घराण्याचे कागदपत्र उपलब्ध झाल्यास वरील बाब सिद्ध करून दाखविणारा पुरावा पुढें येण्याचा संभव आहे. समर्थकाळीं या स्वरूपाच्या योजनांचा अवलंब दुसऱ्या एका नामांकित व्यक्तीकडून करण्यांत येत असे, हें पुराव्यानें सिद्ध झालें आहे. औरंगजेब बादशहा त्याच्या मुसलमानी सैनिकांच्या अंगांत धीरश्री उत्पन्न करण्याकरितां व त्यांनीं जिवावर उदार होऊन लढण्यास्तव कुराणांतील वाक्यें निशाणावर लिहून लढाईच्या वेळीं

तीं निशाणें धारण करणारे लोक सैन्यांत ठेवीत असे, ही गोष्ट मोंगल घराण्याच्या इतिहासलेखकांनीं नमूद केली आहे. प्रस्तुत काळीं क्षुल्लक भासणाऱ्या गोष्टी त्या काळीं महत्कार्य सिद्ध करण्यास कशा रीतीनें कारणीभूत होत असत, याची कल्पना करणें हल्लींच्या काळच्या कितीएक लोकांस जड जातें व वरील गोष्टीवर सकृद्दर्शनीं त्यांचा विश्वास बसत नाहीं. अशा लोकांची खात्री वर दर्शविलेला पुरावा उपलब्ध झाल्यावर यथाकालीं होणार आहे.

असो. आतां रामकथेपैकीं सुंदर व युद्ध कांडांतील कथाभागाचा च परिपोष समर्थांनीं काय हेतूनें केला, याचें आम्ही दिग्दर्शन करितों. हीं दोन्हीं कांडें समर्थांनीं श्लोकवृत्तांत केलीं आहेत. अगदीं अडाणी माणसास हि हें वृत्त म्हणण्यास सोपें जातें. या कांडांतील कथाभागांचा प्रसार सर्व साधारण महाराष्ट्रीय जनतेंत करावयाचा असल्या कारणानें श्लोक वृत्ताचा च अवलंब करणें युक्त होतें; व या कारणास्तव या कथाभागाची रचना या वृत्तांत समर्थांनीं केली असली पाहिजे, असें अनुमान करण्यास प्रत्यवाय नाहीं. समर्थविरचित रामायणांत वर्णिलेल्या कथाभागाची निवड हि, समर्थांनीं त्या कथा ज्या जनतेकरितां तयार केल्या होत्या त्या जनतेच्या मनोरचनेस अनुलक्षून केली होती. लंकेवर स्वारी करण्यापूर्वीं हनुमान व त्याचे अनुचर यांनीं सीतेच्या शोधार्थ केलेल्या उलाढालीचा कथाभाग सुंदरकांडांत वर्णिला आहे. हनुमानानें लंकेंत प्रवेश करून जी धामधूम व उत्पात उडविला, त्या देखाव्याचा चलिचित्रपट पाहात असतां प्रेक्षकाच्या मनोवृत्ति ज्याप्रमाणें स्फुरण पावतात, त्या च प्रमाणें समर्थांचीं हीं कांडें वाचीत असतां अगर श्रवण करीत असतां वाचणाऱ्यांचीं व श्रवण करणारांचीं मनें स्फुरण पावतात. सुंदरकांडांतील कथाभागांत अद्भुत रस ओतप्रोत भरलेला आहे. सामान्य प्रतीच्या महाराष्ट्रीय जनतेचीं मनें सुंदरकांडांतील कथाभागानें आकर्षित होऊन हनुमानासारखे प्रताप करण्याची लालसा त्यांच्या मनांत उत्पन्न होते. अफजुलखानवध, शाहिस्तेखानाच्या गोटात रात्रीं प्रवेश करून त्याची उडविलेली दाणादाण इत्यादि छत्रपतींच्या चरित्रातील प्रसंग हनुमानाच्या चरित्रांतील आढळणाऱ्या प्रसंगांच्या तोडीचे आहेत; व हीं कृत्यें करण्याची स्फूर्ति त्यांच्या अल्पवयांत रामायण ग्रंथाच्या श्रवणानें त्यांच्या मनावर घडलेल्या संस्कारापासून त्यांना झाली होती. छत्रपतींच्या मरणानंतर महाराष्ट्रावर औरंगजेबानें जी प्रचंड मोहीम केली, त्या मोहिमेंत

मराठ्यांच्या सेनाधिपतींनीं औरंगजेबाच्या सोन्याच्या तंबूचे कळस अचानक घाला घालून लांबविले, ही गोष्ट सर्वश्रुत आहे. हें व ह्या सारखीं दुसरीं कित्येक अद्भुत व धाडसाचीं कृत्यें त्या मोहिमेंत मराठ्यांच्या सैन्यानें केलेलीं आढळून येतात. रामायण ग्रंथातील कथाभागापासून मिळालेल्या स्फूर्तीचा हा प्रभाव असला पाहिजे यात संशय नाहीं. समर्थांनीं रचिलेलीं रामायणें आकर्षक करण्याकरिता अवलंबिलेल्या आणिक एका बाबीचा प्रस्तुत स्थळीं निर्देश करणें जरूर आहे. ही बाब म्हटली म्हणजे या काव्याच्या रचनेंत अनुप्रास या अलंकाराची त्यांनीं करून दिलेली रेलचेल ही होय. या अलंकाराच्या योगानें सामान्य माणसाचीं मनें त्वरित आकर्षित होऊन असल्या अलंकारप्रचुर काव्यावर त्याचीं मनें तेव्हा च बसतात.

समर्थकाळीं त्यांनीं केलेलीं हीं रामकथेपैकीं कांडें या कारणाकरितां फार लोकप्रिय झालीं असलीं पाहिजेत. समर्थांनीं रामकथेचा परिपोष कोणत्या विशिष्ट पद्धतीनें कोणत्या ध्येयास्तव केला व हा परिपोष रामरावणयुगकल्पनेस कशा रीतीनें पोषक झाला, याचें दिग्दर्शन येथपावेतों केलें. या च संबंधाच्या आणखी एक दोन महत्त्वाच्या बाबी नमूद करितों.

सज्जनगडीं समर्थांचा वास होऊ लागल्यावर तेथील दररोजच्या ठरलेल्या कार्यक्रमातील एक महत्त्वाचा भाग म्हणजे कीर्तन व पुराणश्रवण हा होता. बहुधा श्रीरामचंद्राच्या शतकोटि चरित्रापैकीं कोणत्या तरी एका प्रसंगावर कीर्तन व पुराण होत असे. अशा प्रसंगीं शिष्यसमुदायापैकीं एकाद्या शिष्यास प्रसंगोपात कीर्तन करण्याची अगर पुराण सांगण्याची समर्थ आज्ञा करीत. दररोज होणाऱ्या रामकथाकीर्तनाच्या व पुराणश्रवणाच्या कार्यक्रमामुळें सज्जनगडावरील वातावरण सदा सर्वदा रामचरित्रमय बनलें गेलें होतें व सर्वत्रांचीं अंतःकरणें रामचरित्रात तल्लीन झालेलीं असत. समर्थांचे अनेक शिष्य "स्वामीयाचे ग्रंथ विस्तारावे लोकीं। मठ हि त्या लोकीं करवावे।। ११६ ।। (श्रीसमर्थप्रताप पान १३ ) या ओवींत नमूद केलेलें कार्य करीत असत. समर्थांनीं केलेलीं रामायणें लिहून काढून त्याचा प्रसार महाराष्ट्रीय जनतेंत समर्थशिष्याकडून केला जात असला पाहिजे, असें अनुमान या ओवीच्या आधारें करण्यास प्रत्यवाय नाहीं. समर्थशिष्यांनीं महाराष्ट्रात व महाराष्ट्रेतर प्रांतात ठिकठिकाणीं मठ स्थापिल्याचें सिद्ध झालें आहे. ठिकठिकाणीं स्थापिलेल्या मठात सज्जनगडीं होणाऱ्या कार्यक्रमाचें अनुकरण केलें जात असलें पाहिजे, व

गडावरील रामचरित्रमय वातावरणाप्रमाणें च वातावरण निर्माण करण्यांत येत असलें पाहिजे असें विधान करणें अयुक्तिक होणार नाहीं. रामकथेचा परिपोष समर्थसांप्रदायांत त्यांच्या ह्यातींत कोणत्या रीतीनें केला गेला, हें दर्शविल्यावर त्यांच्या पश्चात् समर्थशिष्यांनीं व इतरांनीं या कथेचा परिपोष कोणत्या प्रमाणांत केला याचें शेवटीं दिग्दर्शन करून हा लेख आम्ही पुरा करितों.

वेणाबाई — ग्रंथः सीतास्वयंवर. निधनकाल शके १६००.

*गिरिधर* —जन्म शके १५७९; *ग्रंथः अन्दरामायण, मंगलरामायण,* छंदोरामायण, सुंदर रामायण, संकेतरामायण, निवृत्तिराम.

जगज्जीवन —काल शके १६३७. ग्रथ, रामायण.

माधवस्वामी–( तंजावरकर )–काल शके १६४०. ग्रथ रामायण ( ओवीबद्ध ), रामायण ( श्लोकबद्ध ), रामहास्यवदन.

माधवसुत –( तंजावरकर )–रामामृततरंग, रामपंचरत्न.

मेरुस्वामी —( तंजावरकर )–ग्रथः रामसोहळा.

मुकुंदस्वामी –( तंजावरकर )–ग्रथः रामकृपाविलास.

याप्रमाणें रामदासी सांप्रदायिकांनीं रामकथेचा परिपोष समर्थांच्या *पश्चात्च्या काळात केल्याचें दिसतें.* समर्थसांप्रदायेतर *खालीं* दर्शविलेल्या तीन ग्रंथाकारांनीं रामकथेविषयीं ग्रंथरचना ह्या च काळांत केली आहे.

गोसावीसुतनंदन—काळ; शके १५८० ते १६५०. ग्रंथ–सीतास्वयवर.

नागेश– काळ शके १६१५. ग्रंथ–सीतास्वयंवर.

जगजीवन प्रभु– ग्रंथ -- सुग्रीवकुंभकर्णसंवाद, सीताबिभीषणसंवाद, रामायण ( बालकांड ), सीतात्रिजटासंवाद.

वर नमूद केलेले ग्रंथकार व त्यांनीं नमूद केलेली ग्रंथसंख्या लक्षांत घेतां समर्थांनीं रामकथेच्या परिपोषाचा सुरू केलेला उपक्रम त्यांच्या पश्चात् उत्तम प्रकारें चालविल्याचें दिसून येतें. रामकथेचा परिपोष करण्यांत समर्थांचा जो हेतु होता, तो च हेतु त्यांच्या शिष्यांचा हि असला पाहिजे, असे अनुमान करणें युक्त होईल. समर्थांच्या पश्चात्च्या काळांत झालेल्या रामकथाविषयक ग्रंथापैकीं सर्वसाधारण महाराष्ट्रीय जनतेच्या परिचयाचे असे फार च थोडे ग्रंथ आहेत व त्याविषयींचें विवेचन एका स्वतंत्र लेखांत च करणें इष्ट होईल.

## ( १११ )

## ' भेजणार ' ह्मणजे काय ?

श्रीमत् ग्रन्थराजाच्या एकोणिसाव्या दशकाच्या सातव्या समासांतील पहिल्या तीन ओव्या अशा :

कथेचें घमंड भरून द्यावें । आणि निरूपणीं विवरावें ।
उणें पडों चि नेदावें । कोणीयेकविषीं ॥ १९-७-१
भेजणार खालें पडिला । तो भेजणारीं जाणितला ।
नेणता लोक उगा च राहिला । टकमकां पाहात ॥ २
उत्तर विलंबीं पडिले । श्रोतयांस कळो आलें ।
ह्मणिजे महत्त्व उडालें । वक्तयाचें ॥ ३

यांतील भेजणार ह्मणजे काय ? वरची खालची ओवी वाचली ह्मणजे साहिजक च मनांत येतें कीं, भेजणार ह्मणजे भजन करणारा असा अर्थ असावा. कोणाला हि विचारलें तरी भेजणार ह्मणजे भजन करणारा, ज्ञानी पुरुष, असा कांहीं तरी अर्थ सांगतात. सभेच्या प्रतींत भेजणार ह्मणजे लोकांना ज्ञान सांगणारा, असा अर्थ दिला आहे व त्या दोन चरणांचा अर्थ, ज्ञानी मनुष्याची चुकी ज्ञानी मनुष्याला च उमजणार, असा दिला आहे.

रा. पांगारकरांनीं हि हा च अर्थ मान्य करून ' भजन करणारा किंवा ज्ञाता कोठें घसरला, चुकला तर तज्ज्ञाला च तें कळतें, सामान्य श्रोते टकमकां पाहत राहतात ' असा दुसऱ्या ओवीचा अर्थ केला आहे.

सत्कार्योत्तेजक सभेच्या पूर्वी ज्यांनीं श्रीमत् दासबोधाच्या प्रती छापल्या होत्या, त्यांनीं फारसे फिकीरींत न पडतां शब्दाचें रूप हि बदलून टाकलें होतें. श्रीसमर्थांच्या काळीं केव्हां केव्हां कांहीं शब्दांवर विनाकारण मात्रा देत असत, असा मनाशीं विचार करून त्या पूर्वप्रकाशकांनीं ' भजणार खालीं पडला । तो भजणारीं जाणिवला ॥ ' असें स्वच्छ छापून, आपण ग्रन्थ शुद्ध छापला, असें वरती समाधान मानलें.

सर्वांच्या बरोबर आमचें हि समाधान झालें. फक्त मुळाबरहुकुम छापण्याचा संकल्प असल्यामुळें ' भजणार ' न छापतां ' भेजणार ' असें आम्हीं छापलें. अर्थाबद्दल कोणास च शंका माटली नाहीं.

पण, विविधज्ञानविस्तारानें पूर्वी एकदां सन १८७५-७६ सालीं, पुन्हां एकदां सन १८९०-९१ सालीं व त्यावर अलिकडे सन १९२३ त ' मराठेशाहींतील राजनीति ' अथवा रामचंद्रपंत अमात्य यांचें ' आज्ञापत्र ' ह्मणून जो एक अवघ्या पन्नास पृष्ठांचा व रद्दी आणि किंमतीचा, पण वस्तुत: पृथ्वीच्या मोलाचा ग्रन्थ छापला आहे, तो परवा कांहीं अन्य कारणासाठीं वाचीत असतां त्यांत ' भेजणें ' शब्द आला, आणि ' भेजणार खालें पाहिला ' हा चरण आठवून आम्ही थबकलों. आज्ञापत्राचीं नऊ प्रकरणें आहेत, पण तीं केवळ नऊ रत्नें आहेत.

' तें हें राज्य ' म्हणून जें श्रीशिवछत्रपतींच्या चारित्र्याचें अत्यन्त हृदयंगम वर्णन आहे तें या च आज्ञापत्रांतील पहिल्या प्रकरणांतील होय. "......... शरीरास्था न पाहतां केवळ अमानुष पराक्रम जे आजपर्यंत कोणीं हि केले नाहींत व पुढें कोणाच्यानें मनें हि कल्पवेना असे स्वामीं केले........ दक्षिणप्रांतीं इदिलशाही, कुतुबशाही व निजामशाई हीं पराक्रमी महान् सकलार्थे समृद्धिमंत स्थानें, तसेंच मोंगल एकएक सुभा लक्ष लक्ष स्वारांचा. या विरहित शामल, फिरंगी, इंग्रज, वलंदेज, रामनगरकर, पाळेगार, सोंदे बिदनूर म्हैसूरवाले, त्रिचनापल्ली आदिकरून संस्थानिक, तसेच जागजागी पुंड, चंदरराव, शिरके, सावंत, दळवी, बारघांटे निंबाळकर, घाटगे आदिकरून देशमुख व काटक सकल हि पराक्रमी सज्ज, ते सामान पुरे असतां हि बुद्धिवैभवपराक्रमें कोणाची गणना न करितां, कोणावर चालून जाऊन तुंबळ युद्ध करून रणाशीं आणिले, कोणावर छापे घातले, कोणास परस्परें कलह लावून दिले, कोणाचे मित्रभेद केले, कोणाच्या सैन्यांत शिरोन मारामार केली, कोणाशीं एकांगीकरून परामाविलें, कोणाशीं स्नेह केले, कोणाच्या दर्शनास आपण होऊन गेले, कोणास दर्शनास आणिलें, कोणास परस्परें दगे करविले, कोणी इतर प्रयत्नें न कळत त्यांच्या देशांत जबरदस्तीनें स्थळें बांधून अनुक्रमें आकाळिले; जलदुर्गसहित होते त्यांस नूतन च जलदुर्ग निर्माण करून परामविलें. दुर्घट स्थळें नौकामार्गें प्रवेशिलीं. असें ज्या ज्या उपायें जो जो शत्रु आकळावा त्या त्या उपायें तो तो शत्रु पादाक्रांत करून सालेरी अहिवंतापासून चंजी कावेरी तीरापर्यंत निष्कटंक राज्य, शतावधि किल्ले तसे च जलदुर्गे, कितीएक विशाल स्थळें, चाळीस हजार पागा व साठसत्तर हजार शिलेदार, दोन लक्ष पदाति, कोट्यवधि खजीना, तसें च उत्तम

जवाहीर, सकळ वस्तुजात संपादिलें. शाण्णव कुळींचे मराठे यांचा उद्धार केला. सिंहासनारूढ होऊन छत्र धरून छत्रपति म्हणविलें. धर्मोद्धार करून देव ब्राह्मण स्वस्थानीं स्थापून यजनयाजनादि षट्कर्मे वर्णविभागें चालविलीं. तस्करादि अन्यायी यांचें नांव राज्यांत नाहींसें केलें. देशदुर्गादि सैन्यादि बंद नवे च निर्माण करून एकरूप अव्याहत शासन चालविलें. केवळ नूतन सृष्टि च निर्माण केली. औरंगझेबा सारिखा महान् शत्रु परितापसागरीं निमग्न करून दिगंत विख्यात कीर्ति संपादिली तें हें राज्य" असो, आपण हें विषयांतर करीत आहोंत. वर्णनाच्या आकर्षक शक्तीपुढें इलाज चालला नाहीं, म्हणून हें विषयांतर झालें. प्रस्तुत आपणांस "भेजणें" शब्द पहावयाचा आहे.

तिसऱ्या प्रकरणांत "राजे झाले तरी अवगुणांचा त्याग व गुणांचा संग्रह एकदां च होतो असें नाहीं. याकरितां राजकुमारांजवळ शिक्षा करणार सभ्य मनुष्य एक दोन चार असे ठेवावे. नित्य त्याचे सहवासें वर्तवावें. शास्त्राभ्यास, लेखनाभ्यास अनालस्यपणें निजुरवादें करवावा. तसें च भेजणं, परजणें, कुस्ती घेणें, तालीम करणें या विद्येचे राजगुरु, जेठी आदिकरून बरे, त्या त्या विद्येंत निपुण असे पाहून ठेवावे. त्याकडून त्या त्या विद्येचा अभ्यास करवीत जावा. माया धरून अभ्यासास अंतर करू नये" इत्यादि मजकूर आहे.

या ठिकाणीं भेजणें म्हणजे भजन करणें खास नव्हे. मोल्सवर्थनें भेजणें शब्द दिलेला नाहीं. रा. वासुदेवराव आपटे यांच्या शब्दरत्नाकरांत तो शब्द नाहीं. हंसकोशकारानीं हि तो दिलेला नाहीं व दुसऱ्या कोणा हि शब्दकोश-कारानें तो दिला असेल, असें वाटत नाहीं. भेजणें, परजणें, कुस्ती घेणें, तालीम करणें इत्यादि संदर्भावरून शस्त्र, दांडपट्टा, लाठीकांठी, इत्यादि विषयक विद्याभ्यासातील 'भेजणें' ही एकादी क्रिया असावी, असें मनांत येतें. तात्पर्य, ती क्रिया ज्याला समजेल तो च ती क्रिया करणाराची झालेली चुकी उमजूं जाणे, असा वरील चरणांचा अर्थ होतो.

वाचकांनीं विचार करून त्यांना पटेल तो अर्थ घ्यावा व 'भेजणें' ही नक्की काय क्रिया आहे, तिचा शोध करावा. बडोद्याचे राजरत्न प्रो. माणिकराव कदाचित् पटकन् सांगूं शकतील.

वाचकांनीं आपआपल्या दासबोधाच्या प्रतींत वरील अर्थ लिहून ठेवावा.

[ ११२ ]

श्रीराम

# श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारकार्याचा जमाखर्च वगैरे

१८५१ आषाढ व. ४ (ता. २५-७-२९) पासून तों

आश्विन शु. ५ ( ता. ८-१०-२९ ) पर्यंत

## धुळें येथील जमाखर्च

**जमा**

११-८-० श्रीसमर्थसेवक सीताराम गोविंद आचार्य कर्दी यांनीं मिळविलेले
- २ हरिहरराव खाजगीवाले पंढरपूर
- ९ महाजन वकील, सोलापूर यांचे मार्फत
- ०८ नरहर पुरुषोत्तम

५२ श्रीस्वयंसेवक दादा गोखले, कल्याण यांचे मार्फत
- २५ हरि गोविंद भिडे
- ६ मा. चंद्रभागाबाई भ्र. आत्माराम अनंत मेंढजोगे
- ५ नरहर रावजी बीडकर
- २ मा. लक्ष्मीबाई भ्र. गंगाधर पुरंदरे
- १४ प्रल्हाद हरि घारप, प. वि. महाजन, दामोदर

**खर्च**

१३००- ०-० स्थापत्यविशारद वासुदेवराव गोमटे यांजकडे जावेस पाठविले ते:
- ३०० ता. १२-८-२९
- ५०० ता. ११-९-२९
- ५०० ता. ८-१०-२९

२८१- ७-० वेळोवेळीं कामगार माणसें घेऊन जावेस पाठविलीं, त्यांचे रेल्वेभाडें व त्यांस आगाऊ दिले ते नांवें मांडून वासुदेवराव यांस कळविले

१०- ०-० हुसेन वडार यास मानधास येथें दिले

१५- ६-० कुन्हाडी, कुन्हाची वगैरे

काशीनाथ जोशी, रा. ना. करमरकर, डी. एन् कर्णिक, गणेश गंगाधर पुरंदरे, त्रिंबक नारायण रानडे, मा. लक्ष्मीबाई भ्र रामचंद्र, सदाशिव श्रीपत पर ळीकर, दामुआण्णा वैशंपायन, विनायक महादेव भोळे, सीताराम आत्माराम वीरकर, खंडेराव केळकर, शेट चुनिलाल रघुनाथ, प्रत्येकीं एक रुपया

| | |
|---|---|
| ६-१०-६ | टपालखर्च |
| १३-१३-० | स्थापत्यविशारद वासुदेवराव गोगटे यानीं नेलेल्या पुस्तकाचे सत्कार्योत्तेजक सभेस दिले, ते त्याचे नांवें टाकून त्याना जमा करण्यास कळविले |
| १६२७- ४ ६ | |

१ " शंकर "—वडोदें

२५ श्रीसमर्थसेवक भीमदास विश्वंभर रामदासी, किणी, याचे मार्फत

१० श्री. चंद्रभागाबाई रानडे २ श्री. वहनीबाई मडमडे
२ श्री. लक्ष्मीबाई शानोबा वडवे १ श्री. रमाबाई विनायक जोग
१ श्री. प्रयागबाई धारूरकर १ ४-९ श्रीसमर्थप्रेरणा
७ ११-३ किरकोळ

१२ डॉ. आर. एम्. तेलंग, बरोरा यानीं जमविलेले

१५ रामराव हनुमंत दाहिहडेकर, अकोट

१ श्रीसमर्थसेवक वासुदेवराव मंत्री, मागणी, याचेजवळ गडावरील जीर्णोद्धारापैकीं शिल्लक असलेला

२१ श्रीसमर्थसेवक वेंकटाचार्य श्रीनिवासाचार्य उडपि, रामदुर्ग, यांनीं जमविलेले

१० नारायणराव गोपाळ कुळकर्णी ५ जिवाजी रामचंद्र चोनगेरी
५ तमाजी पांडुरंग कुळकर्णी २ पुरुषोत्तमराव गोविंदराव जोग
२ कृष्णराव व्यंकटेश हेडमास्तर
१ ४ व्यंकटाचार्य श्रीनिवासाचार्य उडपि
यांत ८४ म. ऑ. खर्च वजा जाता

१० श्रीसमर्थसेवक विष्णु गणेश गाडगीळ, मुंबई, यानीं जमविलेले

५ गोविंद बाळकृष्ण टिल्लु
२ ८ बाळकृष्ण नारायण फणस २ ८ सखाराम भिकाजी शिंदये

१५१ श्रीसेवक अनंत सखाराम वणीकर, अहमदाबाद, यांनीं पाठविले ते
१० आगष्ट महिन्याचे १० सप्टेंबरचे १३१ इतर

९-५-० श्रीसमर्थसेवक गं. के. पिंगळे, इंदूर, यांनीं जमविलेले
४ स. गो. सहस्रबुद्धे, मा. गो. होळकर, सी. र. खांडेकर व सी. का. देव, प्रत्येकीं एक
३-८-५ किरकोळ २ धान्यभिक्षा

२० श्री. सदाशिव रामचंद्र दाते, पुणें

१०० श्रीसमर्थसेवक सदाशिव खंडो आळतेकर, कऱ्हाड, यांचे मार्फत
५० श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधी, औंध
५५ नरहर रामचंद्र जोशी, महाबळेश्वर,
यांत ५ रु. खर्च वजा जातां

१-४-० रा. ना. पां. नवरे, मुंबई ( श्रावणपट्टीमंडळानुज्ञेनें )

१०-०-० रा. दत्तात्रय रामचंद्र आठवले, सांगली
९ श्रीरामाश्रम, सांगली
१ विष्णु गणेश साठे

५-०-० रा. वा. पु. साठे, मुलुंड

५-०-० रा. ना. गो. काजळे, लाहोर

१-०-० श्रीसमर्थकृपा

४५५- १- ० एकूण नवीन जमा
७७७२-१०-११ मागील शिल्लक
८२२७-११-११ एकूण जमा
१६२७- ४- ६ खर्च वजा
६६००- ७- ५ एकूण शिल्लक, पैकीं

१९० -७-२ धुळ्याचे पोस्टल बँकेंत
५०० -०-० चाफळ सोसायटींत ठेव
५४५७ -४-० सत्कार्योत्तेजक सभेकडे ठेव
४५२-१२-३ चिटणीसा जवळ
६६००-७-५

आजपर्यंत एकंदर रोख जमा रुपये २००८९-११-५

धुळें
१८५१ विजया दशमी
शंकर श्रीकृष्ण देव

( ११३ )

श्रीराम

# श्रीदासबोधाचें मुखवस्त्र

श्रीगणेशाय नमः । श्रीरामसमर्थ ।

सूक्ष्म नामरूपाचा शोध । तो हा ग्रन्थ दासबोध ।
प्रत्ययनिरूपण विशद । केलें असे ॥ १ ॥
कोठें काय बोलिलें हें कळेना । वेळेसी पाहातां सांपडेना ।
ग्रन्थपानें शोधितां नाना । घुरमारा होतो ॥ २ ॥
म्हणोन कांहीं येक स्मरण । वेळेसी व्हावया आठवण ।
संकेतसूचना निरूपण । बोलिलें असे ॥ ३ ॥
वीस दशक दोनसें समास । वेगळे लिहिले सावकाश ।
तरी जें पाहावें वेळेस । तें सांपडेना ॥ ४ ॥
म्हणोनी हीं संकेतवचनें । वेळेस वाचून पाहावीं मनें ।
सावधानपणें श्रवणमननें । सुचों लागे ॥ ५ ॥

प्रथम दशकीं पहिले समासीं । श्रोतेन पुसिलें वक्तयासी ।
येथून ग्रंथसंकेतासी । आरंभ जाहला ॥ ६ ॥
या ग्रन्थाचें नाम काय । प्रथामध्यें बोलिलें काय ।
ऐकिल्यानें होतें काय । पुसिलें सांगितलें ॥ ७ ॥
गणेश शारदा सद्गुरु संत । श्रोते कवेश्वर सभा परमार्थ ।
ऐसीं हे स्तवनें समस्त । नरदेह दाहवा ॥ ८ ॥

मूर्खलक्षण उत्तम गुण । कुविद्या आणि भक्तिलक्षण ।
रजोगुण तमोगुण । सत्त्वगुण सद्विद्या ॥ ९ ॥
त्यापुढें विरक्तलक्षण । मग पढतमूर्खलक्षण ।
दुसरा दशक संपूर्ण । निरोपिला ॥ १० ॥

गर्भवास प्रथम समंध । द्वितीय समंध सततीवेध ।
कांताहरण बहु खेद । पांचवे समासीं ॥ ११ ॥
आध्यात्मिक आधिभूतिक । तृतीय ताप तो आदिदैविक ।
मृत्युलक्षण वैराग्य नेमक । दाहवा जाण ॥ १२ ॥
तृतीय दशक दाहा समास । निरोपिले सावकाश ।
वीस दशक श्रोतयास । कळले पाहिजे ॥ १३ ॥

श्रवण कीर्तन विष्णोस्मरण । पादसेवन अर्चन वंदन ।
दास्य सख्य आत्मनिवेदन । मेरवर्णन दाहवें ॥ १४ ॥
चौथा दशक दाहा नामें । सांगितलीं अनुक्रमें ।
नाना संकेतार्चा धर्मे । समजोन घ्यावीं ॥ १५ ॥
गुरुनिश्चय गुरुलक्षण । शिष्यलक्षण उपदेशलक्षण ।
बहुधा ज्ञान विमळ ज्ञान । बद्धलक्षण बोलिलें ॥ १६ ॥
मुमुक्षुलक्षण साधकलक्षण । दाहावा सिद्धाचें लक्षण ।
पांचवे दशकीं संकेतकथन । निरोपिलें ॥ १७ ॥
प्रबोधलक्षण उपदेशलक्षण । विमळलक्षण युगलक्षण ।
माया ब्रह्म सृष्टिकथन । अष्ट विधा ॥ १८ ॥
सातवा उपासनालक्षण । दृश्य मिथ्या दृष्टांतलक्षण ।
शुद्ध साधन समाधान । दशक साहवा ॥ १९ ॥
भाषा व्यर्थ अर्थ सार । वस्तुविवरण विचार ।
चौदा ब्रह्मांचा विचार । विमळ ब्रह्म ॥ २० ॥
पांचवा द्वैतकल्पना । शुक मुक्त विवंचना ।
निरावलंबी अनुसंधाना । निरोपिलें ॥ २१ ॥
श्रवणानें होतें काय । श्रवण करावें तें काय ।
दक्षिणायन देहांत संशय । फिटोन गेला ॥ २२ ॥
सातवा दशक नामें दाहा । येरें मन घालून [illegible]
संकेत बोलिला आहे हा । श्रोतीं पाहावा ॥ २३ ॥
मुख्य सृष्टिकर्त्याचें विवरण । अनेक मतांचें [illegible]
चराचराचें मूळकथन । मायेमध्यें सूक्ष्म [illegible] ॥ २४ ॥
पंचभूतीं पंचभूतें । पांचवे समासीं [illegible] ।

जन्ममृत्यु घेतो कोण । हे आशंका फिटली ॥ ३० ॥
ज्ञाता ज्ञाने चि सुटला । बद्ध कैसा जन्मा आला ।
आठवे समासीं जाहला । वृत्तान्त ऐसा ॥ ३१ ॥
महा सूक्ष्म संधी नाहीं । कैसे उद्भवले सर्व हि ।
नववा जाहला दाहवा पाही । अंतरस्थिती ॥ ३२ ॥
नव्या दशकाचा सकेत । दाहा समासांचा मथितार्थ ।
श्रोतीं घालुनिया चित्त । बरें समजावें ॥ ३३ ॥

सकळांचें अंतकरण येक । दुसरे समासीं विष्णु मुख्य ।
भूतीं गुण मुख्य मुख्य । तिसऱ्यामध्यें ॥ ३४ ॥
चौथ्यांत संदेह फिटला । पाचवा पंच प्रळय बोलिला ।
साहवा भ्रम विशद केला । अनुक्रमें ॥ ३५ ॥
मुक्त जाहले सामर्थ्य चाले । प्रकृतीचें रूप केले ।
शिवशक्तीसी निवडिलें । नव्यामध्यें ॥ ३६ ॥
दाहव्यामध्यें जे चंचळ । त्याची त्रिविध नामें प्रांजळ ।
जगज्योतीची लीला सकळ । निरोपिली ॥ ३७ ॥
दाहवे दशकीं दाहा समास । निरोपिले सावकाश ।
श्रोतीं आणिजे मनास । विचारूनि ॥ ३८ ॥

चौ जीवाचीं रूपें केलीं । चौ देवाची रूपें सांगितली ।
पुढें शिकवण बोलिली । तिसऱ्यामध्यें ॥ ३९ ॥
शुद्ध विवेकनिरूपण । विशाळ बुद्धीचें लक्षण ।
नेमक विद्या पदरीं घालून । सांगितल्या ॥ ४० ॥
सातव्यामध्यें गुप्त गंगा । आठवे समासीं कर्ता बगा ।
पुढें अनंतनामी तो गा । धुंडूनि पाहवा ॥ ४१ ॥
धाहवे समासीं उत्तम गुण । शाहणे करावे न संपडोन ।
अक्रावे दशकीं निरूपण । ऐसें आहे ॥ ४२ ॥

प्रपंचीं परमार्थ नेमक । पुढें अचूक यत्न विवेक ।
पृथ्वीमध्यें बहुत लोक । तेहीं दोनी साधावी ॥ ४३ ॥
चौथा विवेक वैराग्य । पुढे त्रिविधा निवेदन योग ।
पुढें भूगोल विस्तार प्रयोग । निरोपिला ॥ ४४ ॥
त्यापुढें शुद्ध सबल विषय । आठवे समासीं काळनिर्णय ।
नववे समासीं दुर्बळा जयो । दाहवा तो शिकवण ॥ ४६ ॥
द्वादश दशकीं समास दाहा । निरोपिले सकेतें पाहा ।
श्रोतीं करूनि अववाश हा । शोध घेणें ॥ ४६ ॥

पहिला नाना देवांची स्तवनें । नाना जाणत्याची सगती धरणें ।
नाना विद्या अभ्यासणें । दुसऱ्यामध्यें ॥ ६४ ॥
नाना अकळ तिसऱ्यामध्यें । सर्व कळे देहसमधें ।
ऐसें हे चौथ्यामध्यें । निरोपण असे ॥ ६५ ॥
पाचवा हिशेबी सुरनीस । साहवा विवेकेंवीण सुदरवेश ।
सातवा ख्यालचेचा हव्यास । सेवेवीण ॥ ६६ ॥
आठवा नाना देवाच्या प्रतिमा । नववा निद्रेचा महिमा ।
दाहव्यामध्यें जाहली सीमा । मोकाट श्रोत्याची ॥ ६७ ॥
दशक अठरावा निवडून । दाहा समासाची खूण ।
बोलिली असे मन घालून । बरें पाहण ॥ ६८ ॥
पहिला बाळबद अक्षर । दुसरा अर्थाभ्यासविचार ।
तिसरा करटलक्षण प्रकार । चौथा संदेवलक्षण ॥ ६९ ॥
नाना जिनसाचे देव करणें । भ्रतारें स्त्रीचा उपदेश घेणें ।
तपीळपणें कदा नसणें । सातव्यामध्यें ॥ ७० ॥
नाना गुणी भूमडळीं । जैशासी तैशाची मडळी ।
खबर्दारी आपणा जवळी । बहुता प्रकारें ॥ ७१ ॥
आता दशक एकुणिसावा । दाहा समासाच्या नावा ।
निरोपिलें प्रत्यय पाहावा । अतर्यामी ॥ ७२ ॥
विश्वभरासी जन्ममरण । पुढें सृष्टि त्रिविध लक्षण ।
चौदा सूक्ष्म नामाभिधान । तिसऱ्यामध ॥ ७३ ॥
येक सत्तेचे नाना विभाग । मनुष्यवेश सृष्टिभोग ।
नाना देहीं येक योग । आत्मयाचा ॥ ७४ ॥
आळ घालिती ब्रह्मावरी । न्हैयत्राची नवल परी ।
प्राणप्रतिष्ठा केल्यावरी । टाकिती देव ॥ ७५ ॥
शुद्ध वस्तु निरूपण । दशक विसावा सपूर्ण ।
विसा दशकाचा निवाडा पूर्ण । साकल्यें केला ॥ ७६ ॥
स्तवन दशक मूर्खलक्षण । स्वगुणपरीक्षा नवविध भजन ।
मत्र दशक देवशोधन । चौदा ब्रह्म मायोद्भव ॥ ७७ ॥
गुणरूप जगज्योती भीमदशक । विवेकवैराग्य नामरूप दशक ।
अखडध्यान आत्मदशक । सप्ततीन्वय प्रकृतिपुरुष ॥ ७८ ॥
बहुजिनसी शिकरण पूर्ण । दशकाचीं नामें सपूर्ण ।
वीस दशक परिपूर्ण । बोलिलीं नामें ॥ ७९ ॥

इति श्रीदासबोधमुखस्वनिरूपण नाम समास ॥ १ ॥

———

( ११४ )

# दासबोधांतर्गत प्रळय

( लेखक—भास्कर वामन भट )

श्रीमद्दासबोधास त्याची महती व्यक्त करण्याकरितां " ग्रंथराज " असें म्हणतात. ग्रंथाचें हें विशेषण, त्यांतील चर्चाविषयाची गंभीरता, महत्त्व व विविधता हीं लक्षांत घेतां योग्य आहे, असें कबूल करणें प्राप्त आहे. समर्थांनीं या ग्रंथांत नाना विषयांसंबंधीं आपले विचार प्रकट केले आहेत. कोणत्या हि समाजांत एकादी महान् व्यक्ति निर्माण होऊन त्या व्यक्तीनें तत्कालीन समाजास मार्गदर्शक असा एकादा ग्रंथ जर निर्माण केला, तर त्या ग्रंथांत व्यक्त केलेले सर्व च विचार, तत्त्वें व कल्पना त्या महान् व्यक्तीनें स्वतः निर्माण केलेल्या असतात असें नाहीं. ती व्यक्ति ज्या समाजांत निर्माण झालेली असते त्या समाजाच्या संस्कृतींत अंतर्भूत होणाऱ्या सर्व वाबींचा त्या व्यक्तीच्या मनावर परिणाम होऊन त्या त्याच्या मनांत मुरलेल्या असतात. अशा रीतीनें त्या व्यक्तीच्या मनांत मुरलेल्या बाबी व तत्कालीन समाजास मार्गदर्शक होतील अशा प्रकारचे त्या महान् व्यक्तीचे विचार यांचा मिलाफ करून नवीन ग्रंथाची रचना त्या व्यक्तीकडून करण्यांत येते व तो ग्रंथ त्या महान् व्यक्तीकडून समाजापुढें मांडला जातो.

उपनिषदें, ब्रह्मसूत्रें, गीता, गीतेवर रचण्यांत आलेलीं निरनिराळ्या आचार्यांचीं भाष्यें इत्यादि आपल्याकडील ग्रंथांच्या रचनेविषयीं विचार केला असतां व त्या च प्रमाणें शिखांचा ग्रंथसाहेब, जुना करार, नवा करार, कोराण इत्यादि खिस्ती व मुसलमानी धर्मांचे ग्रंथ इत्यादिकांच्या रचनेचा विचार केला असतां आम्हीं केलेल्या वरील विधानाची यथार्थता कोणास हि पटण्यासारखी आहे. प्रस्तुत काळीं समर्थनिर्मित वाङ्मयाकडे ज्या थोड्या अभ्यासकांचें लक्ष गेलें आहे, त्यांपैकीं कांहींना समर्थांचें लघुत्व स्थापन करण्याचा अनावर मोह उत्पन्न झाला आहे. श्रीमद्दासबोधांत समर्थांनीं ग्रथित केलेले विचार नवीन नसून समर्थ जन्मास येण्यापूर्वीं महाराष्ट्रांत होऊन गेलेल्या महान् व्यक्तींनीं ग्रथित केलेले च विचार समर्थांनीं आपल्या ग्रंथांत व्यक्त केले आहेत, असें सिद्ध करण्याचे प्रयत्न सूर्यास दिपविण्याच्या बुद्धीनें प्रेरित झालेल्या काजव्या प्रमाणें अशा व्यक्तींकडून होऊं लागले आहेत. परंतु या प्रयत्ना-

पासून समर्थसूर्याचें लघुत्व स्थापन करण्याची फलनिष्पत्ति काजव्याला जितपत यश येतें तितपतच होणार, हें उघड आहे. कोणत्या हि महान् ग्रथाची महती, त्या ग्रथात ग्रथित केलेले विचार पूर्वी कोणीं हि ग्रथित केलेले नाहींत या एका च गोष्टीवर अवलबून असते असें नाहीं. तो ग्रथ ज्या काळीं ज्या समाजात निर्माण झाला, त्या काळच्या समाजाच्या विशिष्ट परिस्थितींत तो त्या समाजास कितपत मार्गदर्शक झाला यावर त्या ग्रथाची महती पुष्कळ अशीं अवलबून असते. या दृष्टीनें विचार केला असता कोणत्या हि महान् ग्रथाची खरी किंमत ठरविण्याचा सर्वोत्कृष्ट मार्ग म्हटला म्हणजे तो ग्रथ ज्या काळीं निर्माण झाला त्या काळच्या लोकावर त्या ग्रथाच्या शिकवणीचा काय परिणाम झाला याची चर्चा करून निष्पन्न होणाऱ्या सिद्धाताचें दिग्दर्शन करणें हा होय. याशिवाय असल्या ग्रथाविषयींच्या चर्चेच्या बाबतींत दुसरा एक दुय्यम प्रकारचा मार्ग संभवतो. प्रस्तुत आपल्यामध्यें पाश्चात्य शिक्षणाचा फैलाव झाल्यामुळें सुशिक्षित लोकाची एक प्रकारची नवीन दृष्टि बनली आहे. अशा प्रकारच्या सुशिक्षित लोकाच्या मनोरचनेस रुचेल अशा रीतीनें पुरातन ग्रथाकडे एका निराळ्या दृष्टीनें पाहाता येण्यासारखें आहे. आधुनिक काळीं भौतिक शास्त्राची प्रगति पार झपाट्यानें होऊन नानाविध विषयासबधीं नवीन तत्त्वें निष्पन्न झालीं आहेत. आपल्या पुरातन ग्रथात ग्रथित केलेल्या बहुविध बाबींस या तत्वाची कसोटी लावून या बाबी कितपत यथार्थ ठरतात याचें परीक्षण करणें हा हि एक मार्ग आहे.

दीर्घकालीन परपरागत सस्कृतीनें विभूषित असलेल्या आपल्यासारख्या मानवी समाजाच्या वाङ्मयात पूर्वी कोणीं कधीं हि न उच्चारलेले नूतन विचार अगर तत्त्वें आपल्या वाङ्मयातील कोणत्या हि महान् ग्रंथात आढळणें दुरापास्त आहे. ही गोष्ट विचारात घेता दासबोधात ग्रथित केलेले कोण कोणते विचार अगर तत्त्वें समर्थपूर्वकालीन कोणकोणत्या ग्रथात ग्रथित केलेले आढळतात तें हुडकून काढून त्याच्या आधारें समर्थांचें लघुत्व स्थापित करण्याचा खटाटोप करणें हा शुष्क व त्याज्य मार्ग आहे. हा मार्ग सोडून देऊन आता दर्शविलेल्या दुय्यम मार्गाच्या दृष्टीनें दासबोधात प्रळयाविषयीं आलेल्या कल्पनेसबधीं आम्ही प्रस्तुत लेखात चर्चा करण्याचें ठरविलें आहे. दासबोधात सृष्टीच्या उत्पत्तीसबधीं समर्थांनीं आपले विचार प्रगट केले आहेत. आधुनिक काळीं जगदुत्पत्तीसबधीं भौतिक शास्त्राच्या सहाय्यानें जे शोध

लागले आहेत, त्या दृष्टीनें दासबोधांतर्गत जगदुत्पत्ती विषयींचें विवेचन कितपत यथार्थ आहे, हा एक चर्चा करण्यासारखा प्रश्न आहे. तूर्त तो विषय सोडून देऊन समर्थांनीं दासबोधांत प्रतिपादिलेल्या प्रळया संबंधींच्या कल्पनेविषयीं अल्प चर्चा करितों.

समर्थांनीं दासबोधाच्या दहाव्या दशकाच्या पांचव्या समासांत प्रळयाचें वर्णन केलें आहे. त्यांत समर्थांनीं एकंदर पांच प्रळय वर्णिले आहेत. पिंडाचे दोन, ब्रह्मांडाचे दोन व विवेक प्रळय असे पांच प्रळय समर्थांनीं निरोपिले आहेत. पिंडाचे दोन प्रळय म्हणजे एक निद्रा व दुसरा मरण. ब्रह्मांडाचे दोन प्रळय आहेत. ब्रह्मदेवाचा एक दिवस झाला म्हणजे सर्व सृष्टीचा लय होऊन फिरून नूतन सृष्टि निर्माण होते, हा तिसरा प्रळय.

" *तिसरा ब्रह्मा निजेला । तों हा मृत्युलोक गोळा जाला ।*
भवघा व्यापार खुंटला । प्राणी मात्रांचा ॥
तेव्हां प्राणीयांचे सूक्ष्मांश । वायोचक्रीं करिती वास ।
कित्येक काळ जातां ब्रह्मयास । जागृती घडे ॥ "

या प्रमाणें तिसऱ्या सृष्टिप्रळयाचें समर्थांनीं वर्णन करून नंतर ब्रह्मांडप्रळयाचें वर्णन खालील ओंव्यांत केलें आहे.

" शतवरुषें मेघ जाती । तेणें प्राणी मृत्य पावती ।
असंभाव्य तर्कें क्षिती । मर्यादेवेगळी ॥ १३ ॥
सूर्य तपे बाराकळी । तेणें पृथ्वीची होय होळी ।
अग्नी पावतां पाताळीं । शेष विष वमी ॥ १४ ॥
आकाशीं सूर्याच्या ज्वाळा । पाताळीं शेष विष वमी गरळा ।
दोहिंकडून जळतां भूगोळा । दरी कैंची ॥ १५ ॥
सूर्यास खडतरता चढे । हुताशनेंच चहुंकडे ।
कोसळती मेरूचे कडे । धडधडायमान ॥ १६ ॥
*अमरावती सत्यलोक । वैकुंठ कैलासादिक ।*
वाहिवेगळे नाना लोक । भस्मोन जाती ॥ १७ ॥
मेरु अवघाचि घसरे । तेथील महिमाच वोसरे ।
देवसमुदाव वावरे । वायोचक्रीं ॥ १८ ॥
भस्म जालियां धरत्री । पर्जन्य पडे शुंडाधारी ।
मही विरे जळांतरी । निमिष्य मात्रें ॥ १९ ॥
पुढें सुर्नें उठेल जळ । तयास शोषील अनळ ।
पढें देवचरी ज्वाळ । मर्यादे वेगळे ॥ २० ॥

समुद्रींचा वडवानळ । शिव नेत्रींचा नेत्रानळ ।
सत्वाकंचुकींचा आवर्णानळ । सूर्य आणि विद्युल्यता ॥ २१ ॥
ऐसे ज्वाळ येकवटती । तेणें देव देहे सोडिती ।
पूर्वरूपे मिळोन जाती । प्रभंजनीं ॥ २२ ॥
तो वारा झडपी वैश्वानरा । वन्ही विझेल येकसरा ।
वायो धावें सैरावैरा । परवह्नीं ॥ २३ ॥
धूम्र वितुळे आकाशीं । तैसें होईल समीरासी ।
महुतांमधें थोडियासी । नाश बोलिला ॥ २४ ॥
वायो वितुळतांच जाण । सूक्ष्म भूतें आणि त्रिगुण ।
ईश्वर सांडी अधिष्ठान । निर्विकल्पीं ॥ २५ ॥
तेथें जाणीव राहिली । आणी जगज्जोती निमाली ।
शुद्ध सारांश उरलीं । स्वरूपस्थिती ॥ २६ ॥

याप्रमाणें समर्थांनीं चवथ्या प्रळयाचें वर्णन केल्यावर पांचव्या प्रळयाचें वर्णन असें:

" जितुकीं कांहीं नामाभिदानें । तये प्रकृतीचेनि गुणें ।
प्रकृती नस्तां बोलणें । कैसें बोलावें ॥ २७ ॥
प्रकृती अस्तां विवेक कीजे । त्यास विवेक प्रळये बोलिजे ।
पाचही प्रळय चोजे । तुज निरोपिले ॥ २८ ॥

समर्थांच्या या पंच प्रळयांचें वर्णन वाचल्यावर स्वाभाविक रीतीनें अशी जिज्ञासा उत्पन्न होते कीं, वेदांततत्त्वज्ञान व इतर दर्शनें यांत प्रळया विषयींच्या कल्पना कोणत्या स्वरूपाच्या आढळतात व त्यांचा आणि समर्थांनीं प्रतिपादिलेल्या कल्पनांचा मेळ कितपत घालतां येतो. त्या च प्रमाणें आधुनिक कालांत भौतिक शास्त्राचे जे नूतन सिद्धांत स्थापित झाले आहेत, त्यांचा समर्थांनीं प्रतिपादिलेल्या प्रळय कल्पनेशीं कितपत मेळ घालतां येतो, या हि मुद्याचें परीक्षण करण्याची जिज्ञासा उत्पन्न होते. ही जिज्ञासा तृप्त करण्यास्तव श्रुति, स्मृति, वेदान्तादिषड्दर्शनें आणि पुराणें आदिकरून प्राचीन ग्रंथांत प्रळयाविषयीं कोणत्या प्रकारचे उल्लेख आढळतात, त्यांचें आम्ही प्रथम दिग्दर्शन करितों. मनुस्मृतच्या पहिल्या अध्यायांत प्रळयासंबंधींचा उल्लेख खालील श्लोकांत आढळतोः—

एवं सर्वं स सृष्ट्वेदं मां चाचिन्त्यपराक्रमः ।
आत्मन्यन्तर्दधे भूयः कालं कालेन पीडयन् ॥ ५१ ॥
यदा स देवो जागर्ति तदेदं चेष्टते जगत् ।

यदा स्वपिति शांतात्मा तदा सर्वं निमीलति ॥ ५२ ॥
तस्मिन्स्वपति सुस्थे तु कर्मात्मानः शरीरिणः ।
स्वकर्मभ्यो निवर्तन्ते मनश्च ग्लानिमृच्छति ॥ ५३ ॥
युगपत्तु प्रलीयन्ते यदा तस्मिन्महात्मनि ।
तदायं सर्व भूतात्मा सुखं स्वपिति निर्वृतः ॥ ५४ ॥
तमोऽयं तु समाश्रित्य चिरं तिष्ठति सेंद्रियः ।
न च स्वं कुरुते कर्म तदोत्क्रामति मूर्तितः ॥ ५५ ॥
यदाणुमात्रिको भूत्वा बीजं स्थास्नु चरिष्णु च ।
समाविशति संसृष्टस्तदा मूर्तिं विमुञ्चति ॥ ५६ ॥
एवं स जाग्रत्स्वप्नाभ्यामिदं सर्वं चराचरं ।
संजीवयति चाजस्रं प्रमापयति चाव्ययः ॥ ५७ ॥

अर्थः—ज्या वेळीं तो देव जागा होतो म्हणजे सृष्टि व स्थिति यांची इच्छा करितो त्या वेळीं हें जग श्वास, प्रश्वास, आहार इत्यादि चेष्टा करितें व ज्या वेळीं याचा आतां उपसंहार करावा असें त्यास वाटतें व तो निजतो म्हणजे इच्छारहित होतो तेव्हा हें जग प्रलय पावतें. या प्रमाणें तो निद्रित झाला असतां कर्माप्रमाणें देह धारण करणारे प्राणी आपल्या देहधारणादि कर्मांपासून निवृत्त होतात. व त्यांचें मन सर्व इंद्रियांसह वृत्तिशून्य होतें. एका च कालीं जेव्हां त्या महात्म्यामध्यें सर्व भूतें प्रलय पावतात तेव्हां हा सर्व भूतांचा आत्मा जाग्रत्स्वप्न व्यापार सोडून सुखानें निजल्यासारखा होऊन राहातो. हा जीव ज्ञाननिवृत्तिरूप तमाचा आश्रय करून दीर्घकाळ इंद्रियादिकांसह राहातो. तो आपलें श्वासप्रश्वासादि कर्म हि करीत नाहीं व अशा वेळीं तो पूर्व देहांतून निघून अन्यत्र जातो. (हें प्राण्याच्या मरणाचें वर्णन आहे.) (पांच भूतें, इंद्रियें, बुद्धि, मन, वासना, कर्म, प्राणादि वायु व अविद्या यांस पुर्यष्टक असें म्हणतात.) या आठ अणुमात्ररूप होऊन जेव्हां तो वृक्षादिकांचें कारण व मनुष्यादिकांचें कारण अशा बीजामध्यें प्रवेश करितो तेव्हां पुर्यष्टकरूप झालेला तो कर्मानुरूप दुसऱ्या स्थूल देहाचें ग्रहण करितो. याप्रमाणें तो अविनाशी ब्रह्म आपल्या जाग्रत्स्वप्नांच्या योगानें या स्थावरजंगमात्मक जगास सतत उत्पन्न करितो व त्याचा नाश करितो.

या उल्लेखांत फक्त दोन प्रकारच्या प्रळयाचें वर्णन आलें आहे. विष्णुपुराणांतील प्रळयाचें खालील वर्णन अधिक विस्तृत असून त्यात नित्य, नैमित्तिक, प्राकृत

आणि आत्यतिक असे प्रळयाचे चार प्रकार वर्णिले आहेत.

" नैमित्तिक प्राकृतिकस्तथैवात्यन्तिको द्विज।
नित्यश्च सर्वभूतानां प्रलोयोऽय चतुर्विध. ॥ ३८ ॥
ब्राह्मो नैमित्तिकस्तत्र यच्छेते जगतः पतिः।
प्रयाति प्राकृते चैव ब्रह्मांडं प्रकृतौ लयम् ॥ ३९ ॥
ज्ञानादात्यन्तिक: प्रोक्तो योगिनः परमात्मनि।
नित्यः सदैव जातानां यो विनाशो दिवानिशम् " ॥ ४० ॥

अर्थः—" नैमित्तिक, प्राकृतिक, आत्यतिक आणि नित्य याप्रमाणें चार प्रकारचा प्रळय आहे. त्यापैकीं ज्याच्या ठायीं जगदीश्वर शयन करितो तो ब्राह्म नांवाचा. हा च नैमित्तिक होय. सर्व ब्रह्मांडाचा प्रकृतीमध्यें जो लय होतो, तो च प्राकृतिक प्रलय होय. परमात्म्याचें ज्ञान झाल्यामुळें योगी लोकाचा परमात्म्याच्या ठायीं जो लय होतो, तो आत्यतिक प्रलय आणि जगतीतलावर, उत्पन्न झालेल्या प्राण्यांचा जो हा रात्रदिवस नेहमीं नाश होत असतो तो नित्य प्रलय होय. "

वेदान्ततत्वज्ञानात्मक ग्रंथांत वर्णिलेल्या प्रलयाचें येथें आम्ही थोड-क्यांत दिग्दर्शन करितों. मानवी प्राण्यास लागणारी गाढ झोंप अगर सुषुप्ति हा नित्य प्रलय. गाढ झोंप लागलेल्या प्राण्यास गाढ झोंप लागली आहे तों पावेतों दृश्य जग नसल्यासारखें च असतें. प्रत्येक मानवी प्राण्याच्या अनुभवास येणारा हा नित्य प्रलय होय. ब्रह्माचा एक दिवस पूर्ण झाला म्हणजे सृष्टीचा होणारा लय तो नैमित्तिक प्रलय. तिसरा प्रकृतिप्रलय. प्रकृतिप्रलय म्हणजे सर्व ब्रह्मांडाचा मूल प्रकृतींत अगर मायेंत लय होणें हा होय. प्रकृति प्रलयानंतर फिरून सृष्टि निर्माण होते, व फिरून ब्रह्मांडाचा मूल प्रकृतींत लय होतो. या प्रमाणें सारखें चक्र चालू असतें. चवथा आत्यतिक प्रलय म्हणजे जगांतील अखिल प्राण्यास मुक्ति प्राप्त होणें हा होय. प्रत्येक जीवास मुक्ति मिळतां मिळतां अखिल जीव मुक्त होणें, एक हि जीव बद्ध स्थितींत न राहाणें हें या प्रळयाचें लक्षण आहे. प्रळयाच्या या कल्पनेंत नवीन सृष्टि निर्माण होण्याचें बंद पडतें.

आतां वेदाततत्वज्ञानाखेरीज इतर षड्दर्शनकाराचीं प्रळयाच्या कल्पने-विषयींचीं मतें कोणत्या स्वरूपाचीं आहेत, याचें परीक्षण प्रथम करून नतर समर्थांनीं वर्णिलेल्या पच प्रल्याच्या कल्पनेशीं ती ताडून पाहू. प्रलयाविषयीं ज्या चार प्रकारच्या कल्पना वर वर्णिल्या आहेत त्यापैकीं नित्य, नैमित्तिक व

प्राकृतिक या तीन प्रकारच्या प्रलयासंबंधीं षड्दर्शनकारांचा वर दर्शविलेल्या कल्पनांशीं मतभेद नाहीं. आत्यंतिक प्रलयाविषयीं च निरानिराळीं मतें व मतभेद आहेत.

श्रीमच्छंकराचार्यांनीं प्रकृतिप्रलय मान्य केला आहे. (ब्रह्मसूत्रभाष्य १-३-३०)

आत्यंतिक प्रलयाची कल्पना कांहीं वेदान्ततत्त्वज्ञांनीं मान्य केली आहे. परंतु शंकराचार्य व वाचस्पति मिश्र या दोघांना मात्र ही कल्पना संमत नाहीं. या दोघांच्या मतांप्रमाणें सर्व जीवास मुक्ति ही संभवत नाहीं. मुक्ति कांहीं थोड्या व्यक्तींना प्राप्त होणें संभवतें. नैय्यायिक आणि सांख्य यांना हें शंकराचार्यांचें मत ग्राह्य आहे. मीमांसकांना मात्र प्राकृतिक आणि आत्यंतिक या दोन्ही प्रलयाच्या कल्पना मान्य नाहींत.

आतां श्रुति, स्मृति आणि सूत्रें यांना आत्यंतिक प्रलयाची कल्पना कितपत मान्य आहे तें पाहूं. कठोपनिषदांत मुक्तीची इच्छा फार थोड्या प्राण्यांना असते, असें म्हटलें आहे.

कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षदावृत्तचक्षुरमृतत्वमिच्छन्।

हें कठोपनिषदांतील वचन लक्षांत घेतलें असतां अशील जीवांस मुक्ति प्राप्त होणें संभवत नाहीं. कारण मुक्ति प्राप्त होण्याची इच्छा असल्याविना ती प्राप्त होत नाहीं. व ही इच्छा फारच थोड्यांना असते. ब्रह्मसूत्राचा विचार केला असतां आत्यंतिक प्रळयाची कल्पना ब्रह्मसूत्रकारास मान्य नाहीं.

ब्रह्मसूत्राच्या प्रथमाध्यायाच्या तिसऱ्या पादाचें तिसावें सूत्र खालील प्रमाणें आहे:—

समाननामरूपत्वाच्चावृत्तावप्यविरोधो दर्शनात्स्मृतेश्च।

*अर्थ:—"सृष्टीची जरी पुनरावृत्ति होत असते तरी त्यांतील पदार्थांचीं नामें व रूपें सारखीं च असल्यामुळें शब्द प्रामाण्यसंबंधानें कसला हि विरोध येत* नाहीं. कारण, तसें श्रुतिस्मृतींवरून हि दिसत आहे, आणि नामरूपें सारखीं च असतात असें श्रुतीवरून सिद्ध होत आहे."

या सूत्रावर आचार्यांनीं जें भाष्य केलें आहे त्यांतील खालील भाग महत्त्वाचा आहे.

"प्रलीय मानपि चेदं जगच्छक्त्यव शेषमेव प्रलीयते। शक्तिमूलमेव च प्रभवति। इतरथाकस्मिकत्व प्रसङ्गात्। न चानेकाकाराः शक्तयः शक्य।

कल्पयितुम्। ततश्च विच्छिद्य विच्छिद्याच्यून्द्रवर्ता । भूरादि लोकप्रवाहाणां देव तिर्यङ् मनुष्यलक्षणानां च प्राणी निकाय प्रवाणां वर्णाश्रमधर्मफल व्यवस्थां चानादौ ससारे नियतत्वमिन्द्रियविषयसम्बन्धनियतत्वप्रत्येतव्यम्।

अर्थ—शिवाय महाप्रलयसमयीं जो जगताचा लय होत असतो तो ( निर्लेप म्हणजे अगदीं काहीं एक अवशिष्ट न राहाता होत नसून ) सस्कार-रूप शक्ति अवशिष्ट राहून च होत असतो आणि सस्काररूप शक्ति हें मूळ असल्यामुळें जगत् उत्पन्न होत असतें असें जर न मानिलें तर आकस्मिकत्व प्रसग येईल ( म्हणजे कारण नसून कार्य मात्र अकस्मात् उत्पन्न झालें असें मानण्याचा प्रसग येईल ) तस्मात् वारवार विच्छिन्न होऊन हि उत्पन्न होणाऱ्या भूरादिलोकाच्या परंपरा, देव, पशुपक्षी, मानव इत्यादिरूप प्राणिसमुदायाच्या परपरा, आणि वर्ण, आश्रम, धर्म व फलें ह्याच्या व्यवस्था–इद्रियें आणि विषय ह्याचा सबध जसा कायम ठरला आहे तसा–अनादि ससारामध्यें कायम च असतात.

महाप्रळयानतर नवीन सृष्टि कशा रीतीनें उदयास येते, याचें जें वरील स्पष्टीकरण आचार्यांनीं केलें आहे त्यावरून आत्यंतिक प्रळयाची कल्पना सूत्रकारास समत नाहीं हें उघड होत आहे.

आता भगवद्गीतेस आत्यंतिक प्रलय कितपत समत आहे याचा विचार करू.

मनुष्याणाम् सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये॥ यततामपि सिद्धाना कश्चिन्मां वेत्ति तत्त्वत ॥ ३ ॥ ( भ गी अ ७ )

असें वचन भगवद्गीतेंत आहे. या वचनाचा विचार केला असता जगातील सर्व मानवी प्राण्यास मुक्ति प्राप्त होण्याचा सभव दिसत नाहीं. भगवद्गीतेच्या सोळाव्या अध्यायात दैवी व आसुरी सपत्तीचें वर्णन केलें आहे. दैवी सपत्तीच्या योगानें मोक्ष प्राप्त होतो व आसुरी संपत्तीच्या योगानें मानवी प्राणी बद्ध होतो असें म्हटलें आहे. एकोणवीस व वीस या अध्यायात आसुरी सपत्तीनें युक्त असे लोक मरणोत्तर नीच कोटींत जन्मास येतात असें म्हटलें आहे.

श्रुति, स्मृति व सूत्रें यातील वरील वचनाचा विचार केला असतां आत्यन्तिक प्रलयाची कल्पना वेदान्त अगर इतर षड्दर्शनकार या कोणास च मान्य नाहीं, हें सिद्ध झालें आहे. सृष्टिप्रलय होऊन नवीन सृष्टि निर्माण होणें हा प्रलय मात्र सर्वमान्य मान्य आहे.

*प्रस्थानत्रयींतील वरील आधार एका बाजूस ठेवून अत्यंतिक प्रलयाच्या* कल्पनेचा विचार केला तर ही कल्पना साराशार विचारास पटण्यासारखी नाहीं. मानवी प्राण्याचा स्वभाव व मानवी प्राण्याची स्थिति यांच्या फार पुरातन काळापासून्नच्या इतिहासाचा विचार केला असतां मानवी प्राण्याची सत्व गुणाकडे प्रगति होत असल्याचें दिसत नाहीं. हें लक्षांत घेतां कधीं काळीं अखिल *मानवी प्राण्यांस मुक्ति प्राप्त होईल, ही गोष्ट शक्य दिसत नाहीं.*

आपल्या प्राचीन ग्रंथांत व तत्त्वज्ञानात्मक वाङ्मयांत आढळणाऱ्या *प्रलयाच्या कल्पनेसंबंधीं येथपावेतों* चर्चा केली. आतां दासबोधांत वर्णिलेल्या प्रळयाच्या कल्पनांचा वरील कल्पनांशीं कितपत मेळ घालतां येतो, याविषयीं थोडीबहुत चर्चा करूं. प्रथम गोष्ट ही लक्षात ठेवावयाची कीं, समर्थांनीं प्रळयाचें वर्गीकरण *पिंड-ब्रह्मांडाच्या दृष्टीनें केलें आहे. पिंडदृष्ट्या जो* निद्राप्रळय तो च नित्यप्रळय होय. समर्थांनीं पिंडदृष्ट्या वर्णिलेला जो मृत्यु-*प्रळय त्याचें वर्णन मागें दर्शविलेल्या प्रळयांत आढळत नाहीं.* नैमित्तिक-प्रळयाचें जें वर विवेचन केलें आहे, त्यावरून त्याचें समर्थांनीं वर्णिलेल्या सृष्टिप्रळयाशीं साम्य असल्याचें दिसतें. प्रकृतिप्रळयाच्या वर्णनावरून त्याचें साम्य समर्थांनीं वर्णिलेल्या ब्रह्मांडप्रळयाशीं असल्याचें दिसतें. अत्यंतिकप्रळयाशीं साम्य असणारा समर्थांनीं वर्णिलेल्या प्रळयांत कोणता च *प्रळय नाहीं. समर्थांनीं वर्णिलेला* पांचवा जो विवेकप्रळय त्याच्याशीं साम्य असणारा कोणता च प्रळय प्राचीन ग्रंथांतर्गत प्रळयांत आढळत नाहीं. समर्थांनीं वर्णिलेल्या प्रळयांत अत्यंतिक प्रळयाचें वर्णन ज्या अर्थी कोठें च आलें नाहीं, त्या अर्थी अत्यंतिक प्रळय [ म्हणजे अखिल मानवी प्राण्यांस मुक्ति प्राप्त होणें ही कल्पना ] त्यांना मान्य *नव्हती हें उघड आहे. समर्थांनीं वर्णिलेल्या पंच प्रळयाच्या वर्णनाचें वैशिष्ट्य म्हणजे पिंड ब्रह्मांडदृष्ट्या प्रळयाचें वर्गीकरण आणि प्राचीन ग्रंथांत न* आढळणारी अशी विवेकप्रळयाची कल्पना, हें होय. प्रकृतीचा लय झालेला नसता व सर्वनामाभिधान रूपी सृष्टि विद्यमान असता विवेकाच्या योगानें सत्स्वरूप जाणण्याचें सामर्थ्य ज्याच्या ठायीं असतें, तो च विवेकप्रळय अनुभवूं शकतो. लाखों लोकांपैकीं एखाद्यास च ही गोष्ट संभवते, इतरांस दुरापास्त आहे. प्रळयविषयक जुन्यानव्या कल्पनांची सांगड समर्थांनीं कशा प्रकारें घातली आहे, हें आतांपावेतों केलेल्या चर्चेवरून स्पष्ट झालें आहे.

आतां प्रस्तुत काळीं भौतिक शास्त्राची जी प्रगती झाली आहे त्या प्रगतीच्या दृष्टीनें, आपल्या प्राचीन तत्त्वज्ञानात्मक ग्रंथांत अगर समर्थांच्या दासबोधांत वर्णिलेल्या प्रळयांपैकीं आधुनिक शास्त्रास कोणकोणते प्रळय कितपत संमत असल्याचें दिसतें ह्याविषयीं थोडें फार विवेचन करूं. आधुनिक काळांत जगदुत्पत्तिशास्त्रज्ञांपैकीं डॉक्टर जिन्स यांनें एऑस या नांवाचा एक ग्रंथ जगदुत्पत्तीविषयीं लिहिला आहे. या ग्रंथांत डॉ. जिन्स यांनीं प्रळयाविषयीं पुढील विचार प्रगट केले आहेत. " या विश्वाची शेवटीं गति काय व्हावयाची याविषयीं निश्चित मत दर्शवितां येण्यासारखें आहे. या सर्व विश्वाचें शेवटीं प्रकाशांत रूपांतर होईल. सर्व पदार्थ नष्ट होतील. सूर्य, चंद्र, तारका यांचा हि प्रकाश नाहींसा होईल. अगदीं मंद स्वरूपाचा प्रकाश सर्व पोकळीभर सारखा पसरलेला राहील. प्रस्तुत काळीं जगदुत्पत्तिशास्त्राची जी प्रगति झाली आहे त्या दृष्टीनें हें निश्चित आहे. " याप्रमाणें सृष्टीची गति झाल्यानंतर फिरून नूतन सृष्टी निर्माण होणार नाहीं, असें डॉ. जिन्स यांचें मत आहे. सर आलिव्हर लॉज यांचें मत नूतन सृष्टि निर्माण होईल असें आहे. सृष्टीची उत्पत्ति आणि प्रळय या दोन्ही कल्पना मानवी मनाचा खेळ असून ही सृष्टि स्वप्नवत् आहे अशी वेदान्त तत्त्वज्ञानांत आढळणारी कल्पना डॉ० जिन्स यानीं हि आपल्या ग्रंथाच्या शेवटीं व्यक्त केली आहे. सृष्टि प्रळयाचें समर्थांनीं केलेलें वर्णन फार च त्रोटक आहे. हा प्रळय कशा प्रकारें होईल याची फोड समर्थांनीं केलेल्या वर्णनांत नाहीं. या प्रळयाचे शेवटीं

" तेव्हां प्राणियांचे सूक्ष्मांश । वायोचक्रीं करिती वास ।
कित्येक काळ जातां ब्रह्मयास । जागृती घडे ॥
पुन्हा मागुती सृष्टि रची । विसंचिले जीव मागुतें संची ।
सीमा होतां आयुष्याची । ब्रह्मप्रळय मांडे ॥

सृष्टि प्रळयानंतरच्या ज्या स्थितीचें वर्णन डॉ० जिन्स यांनीं केलें आहे, तशा प्रकारचें वर्णन समर्थांनीं केलेल्या सृष्टिप्रळयांत नाहीं.

समर्थांनीं ब्रह्मांडप्रळयाच्या वेळीं सृष्टींत काय काय प्रकार घडतील यांचें बरें च वर्णन केलें आहे. डॉ. जिन्स यानीं प्रळयोत्तर स्थितीचें केलेलें वर्णन

तेथें जाणीव राहिली । आणि जगज्जोती निमाली ।
शुद्ध सारांश उरली । स्वरूप स्थिति ॥

या समर्थांनी केलेल्या वर्णनाशीं ताडून पाहातां दृश्य सृष्टींत दृग्गोचर होणाऱ्या असंख्य पदार्थांचा अभाव होणें इतपत साम्य दोन्ही वर्णनांत आढळून येतें. समर्थांनी पंच प्रळयाचें वर्णन केल्यावर सहाव्या समासांत भ्रमनिरूपण केलें आहे. तो समास वाचला असतां सृष्टीची उत्पत्ति आणि सृष्टीचा लय हा निवळ भ्रम आहे, हें वेदान्ततत्त्वज्ञानास संमत असलेलें तत्त्व समर्थांस मान्य असल्याचें दिसतें.

आतां पंच प्रळयनिरूपणाच्या पूर्वीच्या व नंतरच्या समासांतील विषयांच्या निरूपणाचा विचार केला असता समर्थांस पंच प्रळयाचें निरूपण करण्याचें प्रयोजन कोणत्या कारणामुळें भासलें याचें दिग्दर्शन करून प्रस्तुतचा लेख आम्ही समाप्त करितों.

चवथ्या समासांत समर्थांनी सृष्टीची उत्पत्ति कशी झाली याचें वर्णन केलें असून दृश्य सृष्टीचा विस्तार कोणत्या मूळ तत्त्वापासून कोणत्या प्रकारें झाला हें दर्शविलें आहे. दृश्य सृष्टीचें वर्णन केल्यावर तिचें अखेर पर्यवसान कशांत व्हावयाचें व सृष्टींत निर्माण झालेल्या मानवी प्राण्याचें खरें कर्तव्य काय याचें दिग्दर्शन करणें समर्थांना ओघानें च प्राप्त झालें. वास्तव समर्थांनी पंच प्रळयाचें वर्णन पांचव्या समासांत केलें असून मोक्षसाधनाच्या दृष्टीनें मानवी प्राण्यास कोणत्या प्रळयाचें महत्त्व आहे, हें समर्थांनी प्रलयनिरूपण समासांत विशद केलें आहे. सहाव्या समासांत परब्रह्म सत्य असून उत्पत्ति, स्थिति आणि प्रलय उर्फ संहार हा सर्व भ्रम आहे,

एक परब्रह्म संचलें। कदापि नाहीं विकारलें।
त्या वेगळें भासलें। तें भ्रमरूप॥

असें मत समर्थांनी व्यक्त करून भ्रम निरास होऊन ज्यांनीं ब्रह्मरूप जाणलें ते महापुरुष व अशा पुरुषांना च विवेकप्रळय शक्य असतो असा सिद्धांत समर्थांनी स्थापित केला आहे. " आधीं केलें मग सांगितलें " अशी समर्थांची प्रतिज्ञा आहे. त्यांची ही प्रतिज्ञा लक्षांत घेता स्वतः अनुभवलेल्या विवेकप्रळयाचें वर्णन त्यांनीं या समासात केलें आहे हें उघड आहे.

या आपल्या भरतखंडांत विवेकप्रळय अनुभवणारे अनेक महापुरुष पूर्वी निर्माण झाले. प्रस्तुत काळीं आपला देश पारतंत्र्यरूपी विपन्नावस्थेत आहे. तथापि विवेकप्रळय अनुभवणारे ज्ञानी पुरुष या आपल्या देशांत निर्माण होण्याची परंपरा अव्याहत सुरू आहे. आधुनिक काळीं विवेकप्रळयाचा

अनुभव घेणारा महापुरुष म्हणजे श्रीरामकृष्ण परमहंस हा होय.

विवेकप्रळय अनुभवणाऱ्या महान् पुरुषास मानसिक अनुभव कोणत्या प्रकारचे येतात, याची कल्पना वाचकास यावी एतदर्थ श्रीरामकृष्ण परमहंस यांनीं स्वतः अनुभवलेली जी स्थिति त्यांच्या शिष्यास निवेदन केली ती आम्ही येथें देतों. ( प्रबुद्ध भारत, नोव्हेंबर १९२९ चा अंक, पान ५२२ पाहा. )

माहिमचरण चरण या शिष्यापाशीं रामकृष्ण आले व म्हणाले, " बरे च दिवस माझ्या मनांत एक गोष्ट तुला सांगावयाची होती, ती आज तुला सांगतों. ती गोष्ट म्हणजे माझ्या आत्मस्थितीबद्दल होय. जो कोणी साधन करील त्याला स्वरूपज्ञान होईल असें तुझें म्हणणें आहे. परंतु मला तें बरोबर वाटत नाहीं. नुसत्या साधनानें हें ज्ञान प्राप्त होत नाहीं. कांहीं विशिष्ट लोकांस च तें प्राप्त होतें. " याप्रमाणें रामकृष्णांनीं त्या शिष्यास म्हटल्यावर त्यांनीं स्वतः अनुभवलेली स्थिति त्यास सांगण्यास सुरवात केली. " ती माझी आई माझ्याशीं बोलली. तिचें मला दर्शन झालें. इतकें च नाहीं तर ती माझ्याशीं प्रत्यक्ष बोलली. मी † वटतळापाशीं होतों. गंगा नदींतून ती बाहेर आली. वा! कशी ती हसत होती! तिनें माझ्या हाताचीं बोटें धरून मजेनें मोडिलीं. नंतर ती माझ्याशीं बोलूं लागली. तीन दिवस माझ्या डोळ्यातून सारखे अश्रु वाहात होते. तेव्हां तिनें वेद, पुराणें, तंत्रें यांतील सर्व विषय मला समजावून सांगितले. एके दिवशीं तिनें मायेच्या मोहाचें गुह्य मला समजावून सांगितलें. एक लहानसा प्रकाश माझ्या खोलींत दिसूं लागला. नंतर तो मोठा होत होत सर्व जगतास त्यानें व्यापून टाकिलें. एकदां मला एक मोठा तलाव लव्हाळ्यानें भरलेला दिसला. वारा वाहूं लागून सर्व लव्हाळें नाहींसें झालें आणि सर्वत्र पाणी दिसूं लागलें. फिरून कांहीं वेळानें लव्हाळें दिसूं लागून पाणी दिसेनासें झालें. हें जें दृश्य तिनें मला दाखविलें, त्यांतील रहस्य पाणी हें सच्चिदानंद परमात्मस्वरूप व त्या स्वरूपदर्शनाच्या आड येणारें लव्हाळें ती माया हे होय. "

" माझे भक्त कोण कोण होणार आहेत, हें ते माझ्याकडे येण्यापूर्वीं काली मातेनें मला दाखविलें होतें. चैतन्याचा संकीर्तन मेळा वटतळापासून बकुळतळापर्यंत जात असलेला तिनें मला दाखविला. त्या संकीर्तन मेळ्यांत मीं, बळराम आणि महीमचरण यांस पाहिलें. "

" केशवसेनाची व माझी गांठ पडण्यापूर्वीं त्याजला काली मातेनें

---

† दक्षिणेश्वर देवालयांतील एक स्थळ.

मला दाखविलें होतें. समाधिस्थितींत असतां केशव व त्याचे अनुयायी यांचें मला दर्शन घडलें. मी ज्या खोलींत बसलों होतों, त्या ठिकाणीं पुष्कळ लोकांचा घोळका माझ्यासमोर बसला होता. एकादा पिसारा पसरलेला मोर ज्याप्रमाणें दिसतो तसा मला केशव दिसला. त्याच्या पिसाऱ्यांत त्याचे अनुयायी मला दिसले. त्याच्या डोक्यावर एक लाल माणिक झळकतांना मला दिसलें. हें लाल माणिक म्हणजे राजस गुण होय. केशव त्याच्या अनुयायांस सांगत होता. तो ( रामकृष्णपरमहंस ) काय बोलतो आहे, तें ऐका. ”

मी मातेला म्हणालों, हे लोक इंग्रजी कल्पनांचे भोक्ते आहेत; तेव्हां मीं त्यांच्याशीं बोलावें काय? तेव्हां मातेनें सांगितलें कीं, कलियुगांत या गोष्टी घडणार. हरी आणि काली हीं दोन नांवें त्या लोकांनीं येथून नेलीं. केशवाच्या अनुयायांपैकीं विजयाला यामुळें च केशवाच्या समाजांतून मातेनें नेलें. परंतु आदिब्राह्मसमाजाकडे माता गेली नाहीं.

स्वतःकडे बोट करून रामकृष्ण म्हणाले, “ यामध्यें कांहीं आहे. थोडे च दिवसांपूर्वीं गोपाळ या नांवाचा एक मुलगा माझ्या भेटीस येत असे. यामध्यें जो आहे, त्यानें त्याच्या छातीवर पाय ठेविला. तेव्हां गोपाळ आनंदांत निमग्न होऊन म्हणाला, तूं प्राप्त होण्यास पुष्कळ काळ लागेल. जगावर प्रेम करणाऱ्या माणसांमध्यें मला राहातां येणें शक्य नाहीं. नंतर मला नमस्कार करून तो निघून गेला. कांहीं दिवसांनंतर त्यानें आपल्या शरीराचा त्याग केल्याचें मला समजलें.

मला किती तरी आश्चर्यकारक देखावे दिसले. निर्गुण, निराकार, सच्चिदानंदाचें मला दर्शन घडलें. त्यांत मला दोन भाग दिसले. एका भागांत केदार चुनी आणि दुसऱ्या भागांत सगुण परमेश्वरावर निष्ठा ठेवणारे भक्त दिसले. दुसऱ्या भागांत विटकरासारखा लाल रंगाचा दिपवून टाकणारा प्रकाश दिसला. या उजेडांत समाधि लावून बसलेला नरेंद्र पाहिला. त्याचें नांव घेऊन मीं त्यास हाक मारिली. त्याचे डोळे किंचित् उघडल्यासारखे दिसले. सिमल्याच्या एका कायस्थ घराण्यांत त्याचा जन्म झालेला मला दिसला. तेव्हां मीं मातेची प्रार्थना केली, “ याला मायेनें बद्ध करून टाक; नाहींतर तो समाधींत आपल्या शरीराचा त्याग करील. ” सगुणरूप परमेश्वरावर निष्ठा ठेवणारा केदार नरेन्द्राकडे पाहात

होता; तो देचकला व तेथून नाहींसा झाला.

माझ्या शरिरांत प्रवेश करून या देहाशीं माता खेळत आहे, याचें कारण हें असावें. जेव्हां माझ्या शरिराची ही अवस्था झाली तेव्हां माझें शरीर देदिप्यान् झालें; माझी छाती लाल दिसूं लागली; नंतर मी मातेची प्रार्थना केली; " हे माते, तूं बाहेर दृश्यमान् होऊं नकोस. आंत च गुप्त राहा. " यामुळें माझें शरीर आतां कृश झालें आहे. नाहींतर लोकांनीं मला सतावून सोडलें असतें. माझें शरीर देदिप्यमान राहिलें असतें तर लोकांच्या झुंडीच्या झुंडी माझ्या दर्शनास लोटल्या असत्या. आतां क्षुद्र लोक माझ्या-पाशीं येत नाहींत. जे केवळ भक्त आहेत, तेवढे च माझ्या सन्निध येतात. मला हा रोग काय झाला आहे ? या रोगाचा अर्थ हा च आहे. "

" मला भक्तशिरोमणी होण्याची इच्छा झाली, तेव्हा मीं मातेची प्रार्थना केली. फिरून माझ्या मनांत इच्छा उत्पन्न झाली कीं, जे ईश्वराची मार्गप्रतीक्षा करीत आहेत, त्यांनीं मजपाशीं आलें च पाहिजे. आतां तुम्ही पाहात च आहां कीं, ते च लोक मजकडे येत आहेत. " . .

माझ्या शरीरांत कोण अधिष्ठित आहे, हें माझ्या बापास माहीत होतें. गर्भांत असतांना त्याच्या स्वप्नांत येऊन रघुवीरानें त्याला सांगितलें कीं मी तुझा मुलगा होणार आहे."

हल्लीं तो माझ्यांत प्रत्यक्ष वास करीत आहे. कामिनीकांचनाचा त्याग ? मला हें करितां येणें शक्य आहे काय ? स्वप्नांत देखील स्त्रीशीं मी रत झालों नाहीं.

नग्न तोतापुरी बावांनीं मला वेदांताचें ज्ञान दिलें. तीन दिवसांत मला समाधि साध्य झाली. माझी समाधि त्यांनीं पाहिली तेव्हां त्यांनीं एकदम उद्गार काढिले, " हें काय झालें ! " माझ्या शरिरांत कोणीं प्रवेश केला, हें त्यांनीं ओळखिलें व त्याला सोडून दे असें त्यांनीं मला सांगितलें.

हें जेव्हां त्यांनीं मला सांगितलें, तेव्हां मला अत्यानंद होऊन मी त्यांना म्हटलें, मला वेदांत पूर्णपणें ज्ञात झाल्याखेरीज मी तुला सोडणार नाहीं.

त्यानंतर एक दिवस मी त्यांच्यापाशीं वेदांताची चर्चा करीत होतों. तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं वेदांताची चर्चा फार केलीस तर तुझी भक्ति कमी होईल.

मी मातेला म्हटलें, या शरीराचें रक्षण कसें होईल; साधु आणि भक्त

यांच्या संगतींत मला कसें राहतां येईल. सेजो बाबूनें (मथुरानाथ) माझी सेवा चवदा वर्षे केली; याचें कारण मातेस मीं केलेली प्रार्थना होय.

या माझ्या शरिरांत जो वास करीत आहे तो मला मजकडे येणारे भक्त अध्यात्मिक दृष्ट्या कोणत्या दर्जाचे आहेत, हें सांगतो. गौरगाची प्रतिमा दिसू लागली आहे, हें मला कळतें. माझ्या भेटीस शाक्त येणार असल्यास मला पूर्वी कालीचें दर्शन होतें.

देवाच्या सायंकाळच्या आरतीच्या वेळीं वरच्या देवळाच्या गच्चीवर जाऊन, " ओहो, तुम्ही कोठें आहा, इकडे या. " पाहा एक जण मजकडे येत आहे कीं नाहीं.

तो परमात्मा या शरिरात वास करीत असून भक्तांशीं बोलत आहे आणि ते भक्त तरी कोणत्या दर्जाचे आहेत ! त्यांची अवस्था तरी किती आश्चर्य करण्यासारखी आहे ! नरेंद्राचा श्वासनिरोध आपोआप होऊ लागला आहे. त्यास समाधि लागली म्हणजे तो दोन दोन अडीच अडीच तास त्या स्थितींत असतो. हा तरी केवढा चमत्कार आहे !

सर्व प्रकारचीं साधनें मीं केलीं आहेत. ज्ञानयोग, कर्मयोग, भक्तियोग यांचा मी अनुभव घेतला असून आयुष्याची वृद्धि करण्याकरितां मीं हठयोग हि केला आहे. या माझ्या देहात कोणीतरी वास करणारा आहे. पूर्ण समाधि लागल्यावर मी भक्तसमवेत कसा राहू शकेन ? कोंवरसिंग मला म्हणाला कीं, " समाधींतून परत आलेला दुसरा मनुष्य मीं पाहिला नाहीं. तुम्ही प्रत्यक्ष नानक च आहा. "

माझ्या सभोंवार कामिनीकांचनासक्त व्यवहारी जन आहेत. असें असून हि मला अशा प्रकारची अध्यात्मिक स्थिति प्राप्त होते. मला वरचेवर समाधिस्थिति प्राप्त होते व मी आनदमग्न होतो. मी घोडींत बसलों असता कुकसाहेब आले. तेव्हा प्रताप मुजुमदार हे माझी समाधि पाहून याच्या अगात सचार झाला आहे, असें म्हणाले.

रामकृष्णपरमहंससारख्या आत्मसाक्षात्कारी पुरुषाचे त्यांनीं स्वतः त्यांच्या शिष्यास निवेदन केलेले अनुभव या प्रकारचे आहेत. अशा प्रकारचे अनुभव कोट्यवधि माणसांपैकीं एखाद्यास च येतात. श्रीरामकृष्णपरमहंस-सारख्या साधु पुरुषास असत्य गोष्टी कथन करण्याचें कांहीं च कारण नाहीं; *अर्थात् त्यांनीं निवेदिलेले अनुभव खोटे मानतां येत नाहींत.* त्यांनीं निवेदन केलेले अनुभव खरे मानिले म्हणजे समर्थांनीं विवेकप्रळयाचें

जें वर्णन केलें आहे, तशा प्रकारचा अनुभव कोट्यवधि माणसांपैकीं एकाद्या व्यक्तीस येणें संभवनीय असते, तशा प्रकारची मनःप्रवृत्ति शास्त्रा खेरीज राहात नाहीं. श्रीरामकृष्णांनीं निवेदन केलेले वरील अनुभव, हे विवेकप्रळय ज्यास म्हणतात, तशा स्वरूपाचा अनुभव येण्याच्या पूर्वीच्या स्थितींतील असावेत असें दिसतें. रामकृष्णपरमहंसाचें चरित्र ज्यांना परिचित आहे, त्यांना ही गोष्ट माहीत आहे कीं, त्यांच्या आयुष्याच्या शेवटच्या भागांत शिष्यमंडळींत बसून संभाषण करीत असतां त्यांच्या मनाची एकदम एकाग्रता होऊन त्यांस समाधि लागत असे व ही समाधि तास तास दोन दोन तास टिकत असे. समाधिस्थितींत च विवेकप्रळयाचा अनुभव प्राप्त होणें संभवतें. प्रकृती असतां विवेक कीजे । त्यास विवेकप्रळय बोलिजे ॥ असें जें समर्थांनीं म्हटलें आहे, ती स्थिति मानवी प्राण्यास समाधिस्थितींत च अनुभवितां येणें शक्य आहे. समर्थांनीं या ओव्यांत विवेक हा जो शब्द वापरला आहे, त्याचें त्यांनीं पुढल्या समासांत स्पष्टीकरण केलें आहे. हें स्पष्टीकरण विवेकप्रळयाचें स्वरूप लक्षांत येण्यास अत्यंत उपयुक्त असून महत्त्वाचें आहे. यास्तव महत्त्वाचा तेवढा भाग आम्ही खालीं देतों:—

येक परब्रह्म संचलें । कदापि नाहीं विकारलें ।
त्या वेगळें भासलें । ते भ्रमरूप ॥
जयासि बोलिला कल्पांत । त्रिगुण आणी पंचभूत ।
हें अवघें चि समस्त भ्रमरूप । मी तूं हा भ्रम ॥
उपासनाही भ्रम । ईश्वरभाव हा ही भ्रम । निश्चयेंसी ॥
श्लोक—भ्रमेणाहं भ्रमेयत्वं । भ्रमेणोपासका जनाः ।
भ्रमेणेश्वरभावत्वं । भ्रममूलमिदं जगत् ।
या कारणे सृष्टि भासत । परंतु भ्रमचि हा समस्त ।
या मध्यें जे विचारवंत । ते चि धन्य ॥

( दासबोध दशक १०, समास ६, ९–१२ )

पाश्चात्य मानसशास्त्रवेत्त्यांचें सृष्टींचीं गूढ तत्त्वें शोधून काढण्याचें मोठें हत्यार म्हणजे प्रयोग ( Experiment ) हें होय. या हत्याराचा एकाद्या आत्मसाक्षात्कारी पुरुषाच्या समाधि स्थितींतील मनःस्थितीचा थांग लागण्यास कितपत उपयोग होईल, हा प्रश्न आहे. या प्रश्नाच्या सोडवणुकीवर च समर्थांच्या विवेक प्रलयाचें यथार्थत्व अवलंबून आहे. परंतु अशा प्रकारचें साधन आधुनिक मानसशास्त्रवेत्त्यास जों पर्यंत सापडलें नाहीं, तों पावेतों ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास, श्रीरामकृष्ण परमहंस इत्यादि सत्पुरुषांच्या वचनांवर च सामान्य माणसास भरंवसा ठेवण्यावांचून गत्यंतर नाहीं.

[ ११५ ]

श्रीराम

# श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारकार्याचा

## जमाखर्च वगैरे

१८५१ आश्विन शु. ६ (ता. ९-१०-२९) पासून तों पौष शु. ३ (३।१।३०) पर्यंत

**जमा**

१००-०-० श्री. विश्वनाथ गोपाळ गोखले, अ. इंजिनिअर, कोपरगांव

५-४-० श्री अनंतचतुर्दशी शके १८५१ चि. वासुदेव पांडुरंग सुभेदार अमरावतीकर याचे स्मरणार्थ हरी पंढरीनाथ बहिरट श्री क्षेत्र पंढरपूर यांजकडून

३०-०-० श्री. अनंत सखाराम वणीकर अहमदाबाद यांजकडून
१० ता. १०।१०।२९
१० ता. १४।११।२९
१० ता. ९।१२।२९

२४-१५-० स्वयंसेवक गोविंद कमळाकर कुलकर्णी, तळे

**खर्च**

२१२०-०-० स्थापत्यविशारद वासुदेवराव गोगटे यांजकडे जांबेस पाठविले ते:—
३२० ता. ६।११।२९
५०० ,, ८।११।२९
३०० ,, २७।११।२९
३५० ,, १०।१२।२९
२५० ,, २१।१२।२९
४०० ,, २९।१२।२९

२४८-०-० कामगारांना धुळ्यास देऊन *वासुदेवराव यांस* त्यांचे नावें, टाकण्यास कळविले ते
१५ ता. ९।१०।२९
२० ता. १५।१०।२९
४५ ता. ३०।१०।२९
७१ ता. २०।११।२९

पिंपळगाव, कसबे नवा-
गणाची राजुरी येथें
मिळविलेली भिक्षा
२ नारायणदास छग-
नीराम मारवाडी
१६ परशराम लिंबा
लाडे, रामचंद्रदास
वैरागी, पंढरीनाथ दफे-
दार, बजरंगलाल मार
वाडी, रामराव राजाराम
पाटील, विश्वनाथराव
नाकेदार, गणेशराम

१७ ता. २८।१२।२१
७१ १०-६ प्रवासखर्च
२०३ ०-० चाकू, दाव्या, तट्टे वगैरे
१०-८-० मुरगाची वची
४-१४ ० छापणावळ
० १२ ० हुंडणावळ
०-६-० पोस्टेज परमॅनंट
०-३-० पावत्यांना तिकीटें
०-९-६ रजिस्टर व इन्शुअर
६-२-६ टपालखर्च

२६६६ १ ६ एकुण खर्च

शंकरलाल, बालमुकुंद किसनलाल, शंकरराव मास्तर, शालीकराम, मोहनलाल, सुकलाल, मयाजी सोनार, गोपाळराव कुळकर्णी, माधवराव पाटील, रखुपतराव सोनार बीडकर, प्रत्येकीं एक रुपया.
६०१५ किरकोळ

२५-४-० श्रीसमर्थसेवक गणेश काशीनाथ पिंपळखरे जळगाव, यानीं जमविलेले
५ वासुदेव रामचंद्र जोशी ३ भाऊसाहेब कोरान्ने
२ भाऊसाहेब चौघुले २ श्रीधर विठ्ठल दामले
१२ नानासाहेब करकरे, काका पिंपळखरे, यशवंतराव वामन पेटकर, द. वा. जोशी, आण्णासाहेब पाध्ये, महेश्वरपंत आवडेकर, भास्करराव कीर्तने, गोपाळराव भोसेकर, डॉ. भीमराव गुरुराव चिकेरूर, बापुराव बोडस, ग. के. पटवर्धन, प. गो. दुधमाडे, प्रत्येकीं एक
१८४ किरकोळ

११-० ० श्रीसेवक गंगाधर केशव पिंगळे, इंदूर, यांचे मार्फत
८ कृष्णराव शामराव मालोतकर, दत्तात्रय विनायक रत्नाकर, श्रीसतकृपा, रामचंद्र श्री ढोबळे, रा. सा. केळकर वैद्य, श्रीसतकृपा, मामासाहेब पैठणकर, सेवक, प्रत्येकीं एक
२८४ किरकोळ ८१२ धान्यभिक्षा

१ ०-० श्रीसमर्थप्रेरणा मो. वि रामदासी, किनी-अक्कलकोट

२५- ०-० कै. कु. गोदुबाई कोल्हटकर, धुळें, हिचे स्मरणार्थ

१६- ९-० सौ. भिकुताई कर्वे, किहुव्ही–पूर्व अफ्रिका, गेल्या चातुर्मासाचे व्रतोद्यापनार्थ

१- ५-० ' वर्धापनम् ' हस्तें ना. पां. नवरे, मुंबई

५- ०-० श्री. राजाराम कृष्ण आंबडेकर, मुंबई

११- ०-० श्री. जनार्दन सखाराम करंदीकर, उपसंपादक–केसरी, पुणें

२- ०-० श्रीरामदासांकित, इचलकरंजी ( नी. धों. फ. )

२५- ०-० डॉ. विश्वनाथ भिकाजी परांजपे, भुसावळ, हस्तें गोपाळराव

५- ०-० श्री. मेहकर महाराज यांचे मंगलप्रसंगीं खामगांव येथें संतसंमेलनांत जमलेले हस्तें राधे गोविंद केशवदत्त महाराज सोनगीरकर

१-१२-० ' शंकर ' बडोदे

१- ०-० श्रीसमर्थकृपा

१४४१-१४-० ता. १।१२ पासून तों ता. २३।१२।२९ पर्यंत धुळ्यांत रोख जमा झाले ते. त्याशिवाय पांचसहाशांचीं आश्वासनें आहेत. त्यांत विशेषतः वणी व यवतमाळ येथील रकमा येणें आहेत. हा जमाखर्च सादर करीपर्यंत त्या रकमा हातीं आल्या नाहींत. त्या येतांच त्यांचा जमाखर्च पुढें देण्यांत येईल.

वणी ( १५ )

१५-० दामोदर महादेव दामले

पांढरकवडा ( २०-८ )

५-० नळिकंठ सखाराम बर्वे, वकील

५-० विष्णु वामन मावे, वकील

४-० बाळकृष्ण रामचंद्र गोडबोले, सबजज्ज

०-८ डॉ. गुते    ५-० रामराव शिवराम पतकी

१-० सखाराम लक्ष्मण घाटंजीकर

यवतमाळ ( ३९ )

२५-० माधवराव श्रीहरि अणे    १-० गोपाळ तात्याजी कुंटे

०-८ लक्ष्मण राजाराम, एक विद्यार्थी

१२-८ महिला समाजातर्फे सेक्रेटरी सौ. यशोदाबाई बापट व अध्यक्ष सौ. आनंदीबाई दामले यांचे मार्फत
२ सौ. लक्ष्मीबाई लेहोकेर
८ सौ. सोनुबाई मसूरकर, सौ. धर्माधिकारी, सौ. महागांवकर, सौ. यशोदाबाई बापट, सौ. आनंदीबाई दामले, सौ. मैनाबाई केमकर, सौ. उमाबाई कुंटे, व श्री. ताई मराठे प्रत्येकीं एक रुपया
२८८ दहा स्त्रीसभासदांकडून प्रत्येकीं ८४

दारव्हा ( १०८-८ )

१६-८ लक्ष्मण गंगाधर जोगळेकर, वकील
३-० कृष्णाजी भास्कर लिमये
१०-० गोविंद चिंतामण नातु, वकील
११-० लक्ष्मण पांडुरग बल्लाळ
३-० नारायण शास्त्री तळेगांवकर
५-० वामन मुकुंद इंदापवार, वकील
३-० विनायक कृष्ण जोगळेकर, वकील
१५-० माधव नारायण दाऊ, वकील
१५-० पांडुरंग दामोदर यत्ते, वकील  ३-० पांडे वकील
४-० बापट वकील व बाळाभाऊ आगरकर प्र. २
१९-० पी. जी. पाटील, दीक्षित, वामनाचार्य, जे. सि. वैद्य, गुजराथी, कोमटी, भाऊराव पापळकर, मेने, शेंबेकर, डॉ. गोखले, दाजीबा घोटकर, वैद्य परांजपे, बळिरामपंत महाड, अण्णा बोरव, रामभाऊ पुराणीक, मोहोरील, शेंडे, बाळाभाऊ खानजोडे, बापुराव खांदाडे, प्रत्येकीं एक
१-० किरकोळ
शेवटच्या चार रकमा मिळून रु. २७ श्रीसमर्थसेवक विनायक कृष्ण जोगळेकर वकील यांनीं जमविले.

पुसद ( १९७ )

५-० अनंत विष्णु सप्रे, वकील
१५-० रामकृष्ण महादेव कुटुम्बे, वकील

५-० नारायण विठ्ठल द्रविड, वकील
५-० राजाराम नरहर पाठक, ११-० कोंडु गोपाळ कोशटवार,
५-० विष्णु चिंतामण नातु, वकील २-० ज्ञानोबा नारायण
१५-० विठ्ठल पुंडलीक चिद्दरवार
५-० नीळकंठ वासुदेव भट, शिक्षक
३-० व्यंकोबा तुळशीराम बिडवाई
२५-० नारायण महादेव सोनार
५-० रामचंद्र मारुती शिंपी ३-० वि. न. केसकर, वकील
५-० पुंजाप्पा गोपाळ चिद्दरवार ३-० शे. ना. पांडे
५-० शंकर सखाराम सरनाईक ५-० राजे भाऊसाहेब उदाराम
१६-० रामभट जोशी, विनायकराव पाठक, डॉ. बल्लाळ, प्रल्हाद माधव व्यवहारे, नारायणराव राजे, देसाई देशपांडे, वासुदेवराव बावणे, रामचंद्र व्यंकटेश, प्रत्येकीं दोन रुपये
१९-० डॉ. केळकर, संभाजी मास्तर, गलगलीकर, भा. ब. पुरोहित, दिवाणे कारकुन, दाजीसाहेब देशमुख, अंबादास गुरु कोराण्ये, दामोदरपंत शुक्ल, दाशेतकर, दत्तोपंत देशपांडे, माधवराव अन्वीकर, कोंडसा मोतिसा, नाथ पांडे, शं. अ. मेहेंदळे, देवराम अटर्णी, विठ्ठलचे गोपाळराव देशमुख, आप्पासाहेब मुनसराम, नानासाहेब भोजलेकर, कोमेरवार मास्तर, प्रत्येकीं एक रुपया.

नागपुर ( ५८२-२-० )

१०१ श्री. बाबुराव देशमुख
१०१ डॉ. लक्ष्मण वासुदेव परांजपे
५० डॉ. मोरेश्वर रामचंद्र चोळकर
७१-५ हिस्लॉप कालेजांतील व्याख्यानाचे वेळीं
५ ल. रा. देशपांडे १० नारायण काशिनाथ वैद्य
२५ वामन मारुतीराव शिंदे ५ प्रो. शं. दा. पेंडसे
५ रघुनाथ व्यंकटेश बांडे ४ वासुदेव कृष्ण देव
२ मोहनीकुल २ शामराव भिकाजी भूत

८ रामचंद्र जागेश्वर चांदे, पु. रा. जोशी, न. पां. मांडके, ना. रा. पंढरपुरकर, डी. जी. लांडगे, श्रीनिवास खड्डकार, पुरुषोत्तम गांधी, उमाकांत के. आपटे, प्रत्येकीं एक

५८५ न कळत व किरकोळ

३२-१२ सीताबर्डीवरील व्याख्यानाचे वेळीं

५ शिवराम हरि गोखले १ नरहर चिंतामण बरवे

२ शरचंद्र वामन रानडे २ दामोदर दिनकर भावे

१८ कृपाशंकर नियोगी, दातार, जोशी, वऱ्हाडपांडे, गाडगीळ, मोरेश्वर या. पटवर्धन, द. गो. जोशी, जयकृष्ण, जी. व्ही. जोगळेकर, श्रीमती सावित्रीबाई मटंगे, वा. ना. धारप, बा. ग. गाडगीळ, लिलाबाई नियोगी, डी. बी. निपाणी, मा. मा. दबडघाव, टी. भास्कर, व्ही. बी. टांगशाळे, का. ना. शेवडे, प्रत्येकीं एक

३८१३ किरकोळ

२५-० रा. ब. माधवराव किनखेडे

२५-० बॅरिस्टर गोविंदराव देशमुख

२५-० बॅरिस्टर मोरेश्वर वासुदेव अभ्यंकर

२५-० कृष्णाजी वामन दातार

६०-० ज. म. कायंदे, नारायणराव चिमोटे, वा. रा. पुराणीक वकील, जी. बी. लोये, डॉ. स. दा. देशमुख, सखाराम लक्ष्मण महाजन, प्रत्येकीं दहा

१०-० प्रो. दत्तात्रय वि. बाळ व रा. सा. जी. के. केळकर, प्रत्येकीं पांच

२०-० नारायण दाजीबा वाडेगांवकर

८-० दामोदर पांडुरंग शुक्ल, सदाशिव बळवंत करकरे, श्रीनिवास नारायण बनहट्टी, का. खं. गर्दे, प्रत्येकीं दोन

६-० गणेश नरहर लिमये, महादेव धर्म भट, विश्वेश्वर गणपतराव पुराणीक, मारुतराव संगमनेरकर, द. रा. लिमये, शि. के. ओक, प्रत्येकीं एक

४-० के. व्ही. फळणीकर, वि. ना. बल्हाळ, भी. ना. हुद्दार, रामभाऊ वागळदे, प्रत्येकी एक.

५-० स्वयंसेवक कृ. वि. सहस्रबुद्धे याचे मार्फत

१ व्यंकटेश भाडार, नागपूर

१ शंकर काशीनाथ सहस्रबुद्धे

१ गो. रा. देव, नागपुर  २ चूक भूल

१३-० स्वयंसेवक चिंतामण पुरुषोत्तम जोशी महाबकर याचे मार्फत

१ गोपाळ नारायण १ रामचंद्र शहापूरकर

१ केशव नाराकण जोशी, कुदगोळ

१ दिनकर बल्लाळ देसाई, चिकोडी

३८१४ किरकोळ  ५८२ चूकभूल

खामगांव ( २८६-४-० )

५-० अमृतराव ताटके, ॲ. डि. जज्य

५-० के. गी. गुप्ते, एजंट, इंपिरियल बँक

२५-० रामचद्र हरि देवधर, वकील

२५-० नारायण महादेव जोशी, वकील

२५-० त्रिंबक केशव भडग, वकील

२५-० सदाशिव विनायक व भास्कर विनायक भिडे, वकील

२५-० नारायण विश्वनाथ कर्वे

५०-० श्रीमती मनोरमाबाई फाटक

१५-० महादेव काशीनाथ चादे, वकील

४०-० नारायण यशवंत टिपणीस वकील, बॅरिस्टर विनायक धोंडो साठ्ये, श्रीधर मो. असेरकर वकील, त्र्यंबक लक्ष्मण ओक वकील, रा. ब. केशवराव जानराव देशमुख स्पेशल फ. क्ला. मॅजिस्ट्रेट, गोपाळ वासुदेव चिपळूणकर सबजज्य, डॉ. प्रभाकरपंत काळे, सीताराम राधाकिसन शेट, प्रत्येकी पाच

४ ० गोविंदराव महादेवकर सबजज्ज

३-० विनायक नारायण ठोसर, वकील

३-० गो. व. गोडबोले, अ. मा. हायस्कूल

१६-० रामनाथ रा. ओझरकर, सोमकांत रावजी भाटे, गो. वि. अणेकर, पं. न. खांडेकर, G. W. Bendre, मार्तंड वामन नेरीकर, डॉ. जनार्दन वामन बर्वे, चाबुकस्वार, प्रत्येकीं दोन

७-० पु. वि. गाडगीळ, का. रा. ब्रह्म, वा. वि. दातार, शा. मो. कोठारे, स. गो. लऊळ, सातोकर, बाबुराव शेंगरे, प्रत्येकीं एक

१०-४ संतसंमेलनप्रसंगीं

१८४ वासुदेवराव ढोले

८ क्षीरसागर, माळी, डॉ. गोविंदराव, नामदेव नाईक महाजन, लालसिंग, पिंपरीकर, गिरधारी शेट, बापुराव मुकुंदराव, प्रत्येकीं एक

१ किरकोळीनें

२-० पाचलेगावकर महाराजाचे समक्ष १-० क्ष

मलकापूर ( १०३-८ )

१५-० गोविंद विष्णु सावजी,

११-० दादासाहेब पिंपळीकर वकील,

१०-० गो. ज. बापट वकील,

४५-० बाळकृष्ण विश्वनाथ सोमण, पु. कृ. काळेले, धुं रं. शेंबेकर, बाळकृष्ण शामराव फरासखाने सबजज्य, बाबुराव रामजी पाटील वकील, राजा गोकुळदास जीवनदास जिनिंग फॅक्टरी, श्रीनिवास गोविंद मुधोळकर वकील, दामलेवधु, डॉ. ठोसरदेशपांडे, प्रत्येकीं पांच रुपये

९ त्रिं. ब. कुळकर्णी, गोविंदराव फडणीस, भिकु मारुती पाटील, प्रत्येकीं तीन

४ जी. एन्. नादेढकर, गणेश बाळकृष्ण चेपे, प्रत्येकीं दोन

९ व्ही. आर. आगरकर, डी. आर. सावजी, भगवानसिंग मोतीसिंग, साठे, सावदेकर, जोशी, शंकर शामाजी भोळे, वामन दि. करदीकर, डॉ. नाफडे, प्रत्येकीं एक

०-८ वामनराव लिमये

जळगांव-पूर्व खानदेश ( १३० )

११ रामचंद्र विनायक चौघुले, वकील ( ५० पैकीं )

२५ शांताराम महादेव सोनाळकर, वकील

४० बाळकृष्ण दासे, दामोदर गणेश भावे वकील, भास्कर र. पटवर्धन वकील, नारायण नरसिंह फडणीस, प्र. १०

३० वासुदेवराव जोशी वकील, माधवराव खांडेटे, नरहर वासुदेव भुसारी वकील, दत्तात्रय वामन जोशी वकील, हरि विष्णु कोल्हटकर वकील, गुरुराव शेषगीर चिकेरूर प्र. ५

७ डॉ. आर्. एस्. बाग २ व्ही. डी. पंडित

४ आर्. व्ही. धर्माधिकारी, तात्यासाहेब देवमानकर, बाबासाहेब चित्रे व दत्तात्रय सा. मुजुमदार प्रत्येकीं एक

९८८ सभेचे वेळीं—१ गजानन दामोदर जोशी २ बळवंत व्यंकटेश कुळकर्णी १ त्रिंबक यशवंत पोळ ५ नांदुर्डीकर कॉंट्रॅक्टर ८८ किरकोळ

१ व्ही. वाय्. दळवी ०-८ रानडे वैद्य

१७३२-१५-० एकूण नवीन जमा

६६००- ७-५ मागील शिल्लक

८३३३-६-५ एकूण जमा

२६६६-१-६ एकूण खर्च वजा

५६६७-४-११ एकूण शिल्लक, पैकीं

१३५-७ २ धुळ्याचे पोस्टल बँकेंत

५००-०- ० चाफळ सोसायटींत ठेव

४१३२-४- ० सत्कार्योत्तेजक सभेकडे ठेव

८९९-९- ९ चिटणीसाजवळ

५६६७-४-११

**आजपर्यंत एकंदर रोख जमा रुपये २१८२२-१०-५**

धुळें
१८५१ पौष शु. ३ } शंकर श्रीकृष्ण देव

## ( ११७ )

## दौऱ्याची हकीकत व उपकारांचें स्मरण

प्रत्यहीं मागणें भीक्षा । मिळाली न मिळे तरी ।
नित्य नूतन हिंडावें । धुंडावे भक्त प्रेमळ ॥

श्रीसमर्थकार्यासाठीं ता. १ ते ता. २३ डिसेंबर वऱ्हाड व नागपुर मार्गांतील कांहीं ठिकाणचा दौरा संपवून ता. २७ ( मार्गशीर्ष व. १२ ) रोजीं धुळ्यास राजवाडेसंशोधनमंदिराच्या कोनशिलास्थापनसमारंभाला हजर राहून काल श्री क्षेत्र जांब येथें आलों. श्रीसमर्थमंदिराच्या जोत्याचें काम पूर्ण झालेलें पाहून आनंद वाटला. मे महिन्यांत आलों होतों तेव्हां पायातळीं बसतां आलें व आज जोत्यावर बसतां येत आहे. काम सुबक झालें आहे. तें पाहून चित्ताला समाधान वाटतें आणि मनात विचार येतो कीं, सर्व मंदिराचें काम शिखरापर्यंत या च डौलाचें होईल ना ? जोत्यावरील भिंतीला आरंभ करतांना पहिला थर घंगाळी घाटाचा घ्यावा, कां साधा च घ्यावा, असा प्रश्न मला विचारण्यांत आला. नमुन्यासाठीं एका कोपऱ्यावरील तीन दगड त्या घाटाचे घडवून ठेवले होते. घंगाळी घाट घेतल्यास हजार पांचशें रुपये जास्त खर्च येईल, असें सांगण्यात आलें. निकाल देण्यास मला फार वेळ लागला नाहीं. महाराष्ट्राच्या ठिकाणीं किती निस्सीम श्रीसमर्थप्रेम वसत आहे, तें मी पहात आहे. त्या प्रेमावर विश्वसून घंगाळी घाट मी पसंत केला. आतां वरील कामास सुरवात होत आहे.

कामावर हल्लीं एक स्थापत्यविशारद (इंजिनिअर), एक मेस्त्री, एक कारकून, एक लोहार, दगड घडणारे व जोडणारे सोळा गवंडी व सात मजूर मिळून सत्तावीस माणसें आहेत. त्याशिवाय चुन्यावरील माणसें. पगाराचा व मजुरीचा खर्च सुमारें ९०० रुपये व चुना वगैरे सामानसुमानाचा खर्च सुमारें ४०० मिळून सुमारें १३०० रुपये दरमहाचा खर्च आहे. हा असा खर्च आणखी सात आठ महिने करतां आला तर पुढें खर्च कमी कमी होत जाऊन १८५३ च्या चैत्र शु. ९ स मूर्तिस्थापनेचा राष्ट्रीय समारंभ करतां येईल. एक तर, दरमहा इतकी रक्कम गोळा झाली पाहिजे किंवा जितकी रक्कम जमूं शकेल तितपत च दरमहाचा खर्च केला पाहिजे, पण तसें करण्यानें स्थापनेचा दिवस आणखी वर्षानें लांबणीवर पडण्याची भीति आहे. श्रीसमर्थांच्या मूर्तीची स्थापना व्हावयाची ती केव्हां हि चैत्र शु. ९ स च झाली पाहिजे. रामजन्म

( ११६ )

# श्रीसमर्थमंदिराप्रीत्यर्थ

## स्थापत्यविशारद वासुदेवराव गोगटे यांचे मार्फत

### गेल्या बारा महिन्यांत झालेला जमाखर्च

| | |
|---|---|
| ८०२० | चिटणीसाकडून वेळोवेळीं आलेली रकम |
| २० | ता. २८।१२।२८ |
| १०० | ता. ११।१।२९ |
| ४८० | ता. २६।१।२९ |
| ५०० | ता. १२।२।२९ |
| ५०० | ता. ४।३।२९ |
| ८०० | ता. १३।४।२९ |
| ५०० | ता. ८।५।२९ |
| ५०० | ता. १८।५।२९ |
| २०० | ता. ६।६।२९ |
| ३०० | ता. १८।६।२९ |
| ७०० | ता. ११।७।२९ |
| ३०० | ता. १२।८।२९ |
| ५०० | ता. १३।९।२९ |
| ५०० | ता. ८।१०।२९ |
| ३२० | ता. ६।११।२९ |
| ५०० | ता. ८।११।२९ |
| ३०० | ता. २७।११।२९ |
| ३५० | ता. १०।१२।२९ |
| २५० | ता. २१।१२।२९ |
| ४०० | ता. २९।१२।२९ |
| ८०२० | जमा |
| ८०२०-०-० | जमा |
| ७४९२-४-० | खर्च वजा |
| ५२७-१२-० | शिल्लक स्थापत्यविशारद याजजवळ |

| | |
|---|---|
| १५५८- ८-६ | पगार–इंजिनियर, कारकून व मजूर याचा |
| १९३८-१२-० | वडार खाणींतून दगड काढणें व वाहून आणणें |
| १७२६- ८-० | गवंडी याची मजुरी |
| ३२- ८-० | सुताराचा मजुरी |
| ४५१ ०-३ | सामानखरेदी-कुदळी, पावडी, पाट्या, पत्रे वगैरे |
| ७६०-१३-० | चुना |
| ४३४- ८ ६ | बैलजोडी, वैरण वगैरे |
| १३३- २ ० | गाडी-खरेदी व दुरुस्ती |
| ७६- ८ ० | दारु, बत्ती |
| ७२-१४-० | प्रवासखर्च |
| ८०- ०-० | जागाखरेदी |
| २६ १४ ० | करोडगिरी |
| ३ १५-० | वटावखातें |
| ९ ०-० | टपालखर्च |
| ४७- ४-९ | किरकोळ |
| १४०- ०-० | अनामतखातें |
| ७४९२-४-० | |

शंकर श्रीकृष्ण देव

## ( ११७ )

## दौऱ्याची हकीकत व उपकारांचे स्मरण

**प्रत्यहीं मागणें भीक्षा । मिळाली न मिळे तरी ।**
**नित्य नूतन हिंडावें । धुंडाचे भक्त प्रेमळ ॥**

श्रीसमर्थकार्यासाठीं ता. १ ते ता. २३ डिसेंबर वऱ्हाड व नागपुर भागांतील कांहीं ठिकाणचा दौरा संपवून ता. २७ ( मार्गशीर्ष व. १२ ) रोजीं धुळ्यास राजवाडेसंशोधनमंदिराच्या कोनशिलास्थापनसमारंभाला हजर राहून काल श्री क्षेत्र जांब येथें आलों. श्रीसमर्थमंदिराच्या जोत्याचें काम पूर्ण झालेलें पाहून आनंद वाटला. मे महिन्यांत आलों होतों तेव्हां पायातळीं बसतां आले व आज जोत्यावर बसतां येत आहे. काम सुबक झालें आहे. तें पाहून चित्ताला समाधान वाटतें आणि मनात विचार येतो कीं, सर्व मंदिराचें काम शिखरापर्यंत या च डौलाचें होईल ना ? जोत्यावरील भिंतीला आरंभ करतांना पहिला थर घंगाळी घाटाचा घ्यावा, कां साधा च घ्यावा, असा प्रश्न मला विचारण्यांत आला. नमुन्यासाठीं एका कोपऱ्यावरील तीन दगड त्या घाटाचे घडवून ठेवले होते. घंगाळी घाट घेतल्यास हजार पांचशें रुपये जास्त खर्च येईल, असें सांगण्यांत आलें. निकाल देण्यास मला फार वेळ लागला नाहीं. महाराष्ट्राच्या ठिकाणीं किती निस्सीम श्रीसमर्थप्रेम वसत आहे, तें मी पहात आहे. त्या प्रेमावर विश्वसून घंगाळी घाट मी पसंत केला. आतां वरील कामास सुरवात होत आहे.

कामावर हल्लीं एक स्थापत्यविशारद (इंजिनिअर), एक मेस्त्री, एक कारकून, एक लोहार, दगड घडणारे व जोडणारे सोळा गवंडी व सात मजूर मिळून सत्तावीस माणसें आहेत. त्याशिवाय चुन्यावरील माणसें. पगाराचा व मजुरीचा खर्च सुमारें ९०० रुपये व चुना वगैरे सामानसुमानाचा खर्च सुमारें ४०० मिळून सुमारें १३०० रुपये दरमहाचा खर्च आहे. हा असा खर्च आणखी सात आठ महिने करतां आला तर पुढें खर्च कमी कमी होत जाऊन १८५३ च्या चैत्र शु. ९ स मूर्तिस्थापनेचा राष्ट्रीय समारंभ करतां येईल. एक तर, दरमहा इतकी रकम गोळा झाली पाहिजे किंवा जितकी रकम जमूं शकेल तितपत च दरमहाचा खर्च केला पाहिजे, पण तसें करण्यानें स्थापनेचा दिवस आणखी वर्षानें लांबणीवर पडण्याची भीति आहे. श्रीसमर्थांच्या मूर्तीची स्थापना व्हावयाची ती केव्हा हि चैत्र शु. ९ स च झाली पाहिजे. रामजन्म

आणि रामदासजन्म एका च मिनीस, एका च घटकेस झाले! तिकडे श्रीराममंदिरांत रामजन्म झाला तों इकडे या च जागीं १५३० त श्रीरामदास जन्मास आले! प्रत्यक्ष जन्मस्थानीं श्रीसमर्थांची स्थापना रामनवमीस च होणें उचित होय.

हें सर्व महाराष्ट्राच्या हातीं आहे. परवाच्या दौऱ्यांत अनुभव बरा आला. जनतेंत श्रीसमर्थकार्याविषयीं सर्वत्र आस्था आढळली. प्रत्येक गांवीं निष्ठावंत कार्यकर्ते भेटले. या दौऱ्यांत वणी, पांढरकवडा, यवतमाळ, दारव्हा, पुसद, नागपुर, खामगांव, मलकापुर व आमच्या कण्वदेशांतील जळगांव, अशीं नऊ गांवें घेतलीं. नागपुरास चार दिवस, यवतमाळ येथें तीन दिवस व बाकी गांवीं दोन दोन दिवस मुक्काम केला. पांढरकवडा व दारव्हा येथें प्रवचनें होऊं शकलीं नाहींत. मुंबईसरकाराप्रमाणें मध्यप्रांतसरकारानें एक फॉरेस्ट कमेटी नेमली आहे. जंगलखात्यासंबंधानें लोकांच्या ज्या तक्रारी असतील त्या, त्या कमेटीस संघटित रीतीनें कळविण्यासाठीं श्री. बापुजी अणे यांच्या नेतृत्वाखालीं वऱ्हाडांत, विशेषतः यवतमाळ जिल्ह्यांत, गांवोगांवीं शेतकरी लोकांच्या सभा भरत आहेत. मी पांढरकवड्यास गेलों त्या च दिवशीं तेथें पांच पन्नास गांवच्या शेतकरी लोकांची सभा होती. सभेचें काम चार पांच तास चाललें होतें, त्यामुळें सर्वांना फार श्रम झाले होते. दारव्हा येथें जरी जाहीर प्रवचन होऊं शकलें नाहीं तरी निमंत्रित निवडक प्रमुख मंडळींशीं एकत्र संभाषण करण्याची संधी मिळाली होती. बाकीच्या ठिकाणीं एक एक दोन दोन प्रवचनें झालीं.

श्रीसमर्थांच्या अवतारकार्याविषयीं क्रमशः श्रीसमर्थचरित्राला अनुसरून पंधरा खंडात्मक जें एक वाक्य योजिलें आहे, त्यापैकीं बहुतेक भाग संक्षेपतः व दरएक प्रवचनांत कोणता तरी एकादा भाग विस्तारानें सांगण्याचा क्रम ठेवला होता. तें संबंध वाक्य असें:

> पूर्वजांच्या पुण्याईनें, आंगीं वैराग्य बाणून, विश्वाच्या कल्याणाची चिंता वाहून, **स्वतः सावध होऊन**, देह अत्यन्त कष्टवून, परमेश्वर आपलासा करून घेऊन, देशस्थिती अवलोकन करून, रामोपासना सुरू करून, ठिकठिकाणीं मठ स्थापून, अगणित शिष्यसमुदाय करून, त्यांत च श्रीशिवरायावर कृपा करून, जनास बहुविध उपदेश करून, **साऱ्या राष्ट्रास सावध केलें**, आणि आपल्या पश्चात् हि सर्व कालीं मार्गदर्शक होतील असे ग्रन्थ निर्माण करून ठेविले, **हें श्रीसमर्थांचें अवतारकार्य होय.**

असे हे पंधरा वाक्यखंड म्हणजे एकएका प्रवचनाचा विषय होऊं शकतील. त्यांना अनुलक्षून श्रीसमर्थांचें बाळपण, पुरश्चरण, तीर्थाटण, चोवीस वर्षानंतर पुनः मातुःश्रींची भेट, समुदाय, समुदायाची आवश्यकता, समुदाय कसा करावा, समुदायासाठीं आवश्यक गुण, संप्रदायाचीं लक्षणें, भक्तमंडळी, श्रीशिवरायाच्या भेटीचा काळ, श्रीशिवप्रेम, श्रीशिवरायाचें अवतारत्व, राजकारण, सुंदरमठादि मनोहर स्थळें, घळी, कवितासमुद्र, त्या समुद्रांतील कांहीं विशेष मौल्यवान् रत्नें, ती रत्नें हातीं लागण्याचीं चतुर्विध साधनें, श्रीसमर्थांचें हस्ताक्षर, इत्यादि श्रीसमर्थचरित्रांतील बहुविध प्रसंगांबद्दल व एकंदर श्रीरामदासी संशोधनाविषयीं यथामति यथावकाश बोलत असे. बोलतांना श्रोत्यांच्या पुढें मला सगळा जीव बाहेर काढून ठेवतां येत नसे, याचें वाईट वाटे. हे प्रसंग जितके मनोरम, तितकी च ते प्रतिपादन करण्याविषयीं माझी अपात्रता मला जाणवत असे. मधून मधून श्रीसमर्थांच्या त्या नितांत निंदकाचें हि मला आणि श्रोत्यांना स्मरण होत असे.

नऊ ठिकाणांपैकीं फक्त पुसद येथें दुसऱ्या दिवशीं 'खादी-स्वदेशी-बहिष्कार' या विषयावर बोललों व नागपुरास एक दिवस खादीवर बोलण्यास सांपडावें, अशी इच्छा केली. नागपुरास पहिल्या दिवशीं लोकमान्य टिळकविद्यालयांत 'अगणित शिष्यसमुदाया' पर्यंतचा पूर्वार्ध सांगितला, दुसऱ्या दिवशीं हिस्लॉप कॉलेजांत '*श्रीशिवसमर्थभेटीचा काळ*' सप्रमाण ठरविला व तिसऱ्या दिवशीं तिसरा प्रहरीं मॉरिस कॉलेजांत श्रीसमर्थांचें हस्ताक्षर याविषयीं प्रतिपादन करून तें दाखविलें आणि रात्रीं सीतावर्डीच्या जनसमूहापुढें राजारामलायब्ररींत बोलावयाचें तें खादीवर बोलावें, अशी इच्छा होती, व मी तसें चालकांना कळविलें होतें. पण वर्डीवरील लोकांना खादीपेक्षां श्रीसमर्थचरित्र च ऐकण्याची जास्त इच्छा असणार अशी चालकांनीं कल्पना करून, निदान विषयाचें नांव जाहीर करतांना नांवांत कोठें तरी 'श्रीसमर्थ' पाहिजेत, अशा विचारानें व मला विचारून विषयाचें नांव जाहीर करण्यास सवड न झाल्यामुळें त्यांनीं '*श्रीसमर्थ असते तर —*' असा विषय जाहीर केला होता. त्यांचा भावार्थ असा होता कीं, तसा विषय जाहीर होऊन हि, खादीवर बोलण्यास मला मार्ग मोकळा रहावा. मला मात्र पेंच पडला. श्रीसमर्थ असते तर—काय त्यांनीं केवळ चरखा चालविण्यास, खादीची पैदास करण्यास व खादी वापरण्यास सांगितलें असतें ? या प्रश्नाला माझें मन होकारार्थी उत्तर देईना व मला तसें श्रोतृवर्गापुढें स्वच्छ कबूल

करणें भाग झालें. खादी, स्वदेशी, बहिष्कार, हीं आम्हा दुर्बलांचीं, सर्व मार्ग खुटून हताश होऊन बसलेल्या आम्हां पगु लोकांचीं साधनें होत.

नाहीं तरी महा भागवत नर।
काय करितें ये काळीं ॥

असले हताश उद्गार इतरानीं काढले तरी,

घालून अकलेचा पवाड। व्हांवे ब्रह्मांडाहून जाड ॥
तेथें कैचें आणिलें द्वाड। करंटपण ॥

असला प्रबल आत्मविश्वास असणाऱ्या श्रीसमर्थांचीं समर्थ साधनें वेगळीं होत! श्रीसमर्थ आज असते तर त्यानीं काय केलें असतें हें कोणी सांगावें? श्रीसमर्थ असते तर त्यांच्या पाठोपाठ श्रीशिवरायाला जन्म घ्यावा लागला असता व ते दोघे असते तर त्यानीं तें केलें असतें, जें आज आपणास सांगता येत नाहीं! तेंव्हा, श्रीसमर्थ असते तर त्यानीं काय केलें असतें, त्याची कल्पना न करता, आज आपण आपल्या ऐपतीप्रमाणें राष्ट्रकार्यांत काय केलें पाहिजे, त्याचा च तेवढा विचार करणें योग्य होईल, अशी प्रस्तावना करून मी योजिलेल्या विषयाकडे वळलों. खादीविषयीं बोलताना मी एकांतिक आग्रह कधीं च धरीत नाहीं. स्वदेशी कापड वापरणें हें आपणा सर्वांचें राष्ट्रीय आणि धार्मिक कर्तव्य होय, खादी हें स्वदेशीचें च शुद्ध आणि परिणत स्वरूप आहे, तेंव्हा खादी वापरणें हा श्रेष्ठ मार्ग होय, पण प्राण गेला तरी कोणी परदेशी कपडा वापरू नये, हा सिद्धान्त सर्वांना पटतो असा माझा अनुभव आहे व तो च अनुभव नागपुरास हि आला.

नागपुरास मला माझ्या कार्यांत डॉ. लक्ष्मण वासुदेव परांजपे यांनीं सर्वतोपरि सहाय्य केलें. माझें कार्य तें त्यानीं आपलें च कार्य मानलें आणि तसें तें त्याचें आहे हि. रा. शरच्चंद्रराव रानडे व नरकेसरीचे संपादक रा. सहस्रबुद्धे वगैरे मंडळींनीं हि सहाय्य केलें. वर्धास श्री. नानासाहेब दामले व त्यांचे बंधु विश्वनाथपंत व रा. वेलडे व रा. देशपांडे वकील इत्यादिकांची मदत झाली. श्री. बापुजी अणे वर्धास आले च होते. पांढरकवड्यास रा. नीळकंठ सखाराम बर्वे, वकील, यांनीं दगदग सोसली. यवतमाळ हें खुद्द बापुजींच्या बहुविध चळवळींचें केंद्रस्थान होय. तेथें गजानन नरहर पंडित वकील व शंकर रामचंद्र गोडबोले वकील यांनीं सर्व भार आपणांवर घेतला. लोकमान्यांच्या वेळेपासून बापुजीविषयीं माझ्या मनात जो आदर वसत आहे,

तो त्यांच्या सहवासांत तीन दिवस राहून व अनेक विषयांवर मोकळेपणानें बोलून वृद्धिंगत झाला. सर्व जिल्ह्यांभर त्यांच्याविषयीं सर्वांना सारखा आदर व प्रेम वाटत असल्याचें माझ्या निदर्शनास आलें. लोकमान्यांच्या प्रमाणें च बापुजींचें घर म्हणजे दाद लावून घेण्यास खुला दरबार होय. सार्वजनिक कार्य आणि वकिलीचा धंदा यांच्यांत विरोध आल्यास सार्वजनिक कार्याचा इष्ट बापुजी प्रथम मानतात, ही त्यांच्या लोकप्रियतेची किल्ली असावी. बापुजींची District Association, यशवंतराव खुशाल देशपांडे यांचा शारदाश्रम व सौ. आनंदीबाई दामले आणि सौ. यशोदाबाई बापट यांचा महिलासमाज या तीन हि संस्था आपआपली कामगिरी उत्कृष्टपणें बजावीत असल्याचें आढळलें. दारव्हा येथें रा. दादासाहेब थत्ते, बापुजींचे बालमित्र रा. माधवराव दाऊ व मोठे आणि धाकटे जोगळेकर अशा चौघांनीं मनावर घेतलें आणि क्षणांत श्रीसमर्थकार्य झालें. पुसद येथें श्री. शंकर सखाराम सरनाईक म्हणजे सर्वस्व होत. शंकरराव म्हणजे सर्व गांव. पुसद येथें मला दोन चमत्कार पहावयास मिळाले. एक तो बारीक अक्षराची महाभारताची प्रत आणि दुसरा चमत्कार म्हणजे शंकररावांचा शब्द सबंध गांवाला–वकिलांना सुद्धां–प्रमाण वाटावा. एकादा वकील पुढारी असलेलीं गावें मी पुष्कळ पाहिलीं, पण शंकररावांसारख्या सामान्य व्यवसायांतील माणसाच्या अनुरोधानें वकील मंडळीसह सर्व जण वागतात, असें गांव फक्त पुसद च पाहिलें. याचें कारण शंकररावांचा निरलस, निष्कपट व निर्मल स्वभाव असावें. पुसद गांवीं प्रेमळ भक्त फार. श्रीसमर्थ सर्वांचें कल्याण करोत. खामगांवास रा. नारायण महादेव जोशी यांच्यावर माझा मित्रत्वाचा च हक्क, पण ते किंचित् आजारी होते. तेथील कार्याचें सारें श्रेय रा. सदाशिव विनायक भिडे व रा. रामचंद्र हरी देवधर यांस आहे. डॉ. पारसनीस खादीभक्त असल्यामुळें ते जबाबदारींतून सुटले नाहींत. या च सुमारास खामगांव येथें संतसंमेलन भरलें होतें. अनायासें संतांचीं दर्शनें घडलीं व श्रीसमर्थकार्यास त्यांचा आशीर्वाद मिळवितां आला. पाचलेगावकर महाराजांचें मला येथें प्रथम दर्शन झालें, हें मी माझें मोठें भाग्य समजतों. महाराजांचें अल्प वय आणि शिक्षण व महत् कार्य आणि भाषण, हीं पाहतां पूर्व संस्कार बरोबर घेऊन महाराज जन्मास आले आहेत, असा प्रत्यय येतो. महाराष्ट्राची पुण्याई थोर होय. मलकापुरचे पुढारी श्री. दादासाहेब पिंपळीकर व त्यांचे उभयता चिरंजीव आणि पुरुषोत्तमपंत चितळे

यांनीं मजसाठीं शिणावें हें योग्य च होय. तसा च त्यांचा आणि माझा संबंध आहे. शेवटीं आमच्या खानदेशांतील जळगांवीं आलों आणि घरीं आलों असें वाटलें. तेथील यशाचा वरा च मोठा वाटा एकटे श्री. आण्णासाहेब जोशी यांजकडे जातो. श्रीसमर्थकार्यावर त्याचें निस्सीम प्रेम आहे. सर्व च ठिकाणीं मला आणखी पुष्कळांची मदत झाली, पण जास्त पाल्हाळ केल्यास वाचक कदाचित् कंटाळून रागावतील, ह्मणून इतराच्या उपकारांचें स्मरण मनांतल्या मनांत करणें भाग आहे.

श्रीसमर्थकार्याला महाराष्ट्रांत पैशाची वाण कधीं च पडणार नाहीं. प्रश्न फक्त इतका च कीं, माझ्याच्यानें दरमहा इतकी दगदग कशी व्हावी ? तथापि जी दगदग करणें आवश्यक आहे, ती मला करावी च लागेल, पण या ठिकाणीं या मासिकाच्या ग्राहकांना आणि वाचकांना एक मार्ग नम्रपणें सुचवितों, कीं जेणें करून माझी वरी च दगदग वांचून श्रीसमर्थकार्याला सहज पुष्कळ मदत होणार आहे. रा. फाटक व त्यांचे समानसच्छील चार स्नेही वगळले, तरी या मासिकाचे ग्राहक आणि वाचक मिळून सात आठशें आहेत. प्रत्येकाचे आपआपल्या गांवीं, जिल्ह्यांत व इतरत्र कांहीं मित्र व अनुयायी असतात च. तेव्हां आपआपल्या मित्रमंडळींत व अनुयायांत प्रत्येकानें दहा, पांच, पन्नास रुपये श्रीसमर्थमंदिरासाठीं मिळविण्याचें ठरविल्यास सहज लीलेनें महिन्या दोन महिन्यात दहा पाच हजार रुपये गोळा होतील. ग्राहक आणि वाचक मनावर घेतील काय ? ही विनंति वाचून कांहीं जण तरी त्याप्रमाणें निश्चय करतील काय ? श्रीसमर्थकृपा काय करील तें खरें !

श्री क्षेत्र जाव—१८५१ पौष शु. १

[ ११८ ]

श्रीराम

## श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारकार्याचा
## जमाखर्च वगैरे

१८५१ पौष शु. ४ ( ता. ४।१।३० ) पासून तों
माघ शु. ७ ( ता. ६।२।३० ) पर्यंत

**जमा**

५–०–० श्री. राजाराम कृष्ण आंबर्डेकर, मुंबई
१०–०–० श्री. अनंत सखाराम वणीकर, अहमदाबाद
५–०–० श्रीसमर्थचरणरज, मुंबई
५–०–० श्रीरामदासचरणरज, मुंबई
४–५–६ रामचंद्र गोविंद काटे, वकील, सेलु, हल्ली पांच रुपयाचे झाले ते.
१–४–० कै. सौ. यशोदाबाई धोंडदेव गणेश नवरे, राजापूर, यांच्या स्मरणार्थ
५–०–० रघुनाथ गणेश तेलंग, धुळें हस्तें दत्तोपंत करमरकर
६–०–० नरसिंगदास रामदासी, बंगलूर, याचे मार्फत
५ स्वतःचे
१ बेंगलूरकर नंजुंडय्या
५१–०–० के. भि. दवळे, गिरगांव, मुंबई.

**खर्च**

१२२७–११–० स्थापत्यविशारद वासुदेवराव गोगटे यांजकडे
५११ ता. ४।१।३०
४००-० ता. १६।१।३०
१२-० ता. १९।१।३०
३१-० ता. २०।१।३०
५३१-१० ता. ३०।१।३०
२००-० ता. ४।२।३०
२५-८-० छापणावळ
३७-०-० प्रवासखर्च
३-३-० टपालखर्च
१-९-० तारा
०-५-० किरकोळ

१२९५-४-० एकूण खर्च

१९१-८-० वणी जि. यवतमाळ येथील वर्गणी

१०० सीताराम लक्ष्मण भेदी, हरि गोविंद दामले, पुरुषोत्तम सीताराम पाटील व नारायण बळवंत देशपांडे, प्रत्येकीं २५ रुपये.

२२ पेंद्रय्या गंगय्या अडते व त्रिंबक सदाशिव आठले, प्रत्येकीं ११

३० दामोदर नरहर एलकुंचवार, गंगाधर विठ्ठल देशपांडे व धुंडिराज गोविंद देशमुख, प्रत्येकीं १०

२५ नारायण नागोजी भोयर, शेट बालकदास, जमनादास नारायण कपनी, लक्ष्मण भार्गव, प्रयागदास नरसिंगदास, प्र. ५

४ एल. एच. बजाज

८ परशुराम राघव गोरकार, काशीनाथ गंगाधर, किलाचंद देवचंद व पन्नालाल हिरालाल, प्र. २

२ यादव पांडुरंग कुसरे व दत्तात्रय नारायण कुळकर्णी, प्रत्येकीं एक

०-८ किरकोळ

९८५-९-० हैदराबाद येथें झालेली मदत

२०० नामदार केशवराव

२०० राजा बनसीलाल मोतीलाल

१०० गोस्वामी लालगीरजी

१०१ राजा धीरमानगीरजी

१०० राणी लक्ष्मीबाईसाहेब चिंचोलीकर

५० श्री. नरसोपंत बोरामणीकर

५० श्री. दत्तोपंत विसोळकर

५० रायबहादुर बनसीलाल अबीरचंद

५० श्री. सदासुक जानकीदास

२५ श्री. अंबादासराव वकील

२५ श्री. काशीनाथ सीताराम वैद्य, वकील

२५ श्री. कृष्णाजी गोपाळ नाईक

२०-८ श्री. गणपतराव जहागीरदार, वकील
१० श्री. गजानन विष्णु कर्वे
१० डॉ. हरिभाऊ गोगटे
१०-६ ता. २५।१।३० रोजीं सभेंत गोळा झाले ते
१० नागोराव मार्डीकर
१० लक्ष्मणराव
१० वासुदेव वामन हार्डीकर
२५ गणपतराव तोरो, V. N. Purohit, डॉ. शंकर बळवंत गोगटे, M. K. Lele, दामोदरराव अरगडे प्र. ५
५ अनाथविद्यार्थीगृहांतील विद्यार्थी
२० श्रीधरपंत करवंदे, प्रो. न. कुलकर्णी, दिगंबरराव बिंदु, गो. या. केतकर, शंकर गो. जोशी, श्रीनिवासराव, सावरेकर वैद्य, नरहरराव तुळा-पूरकर, नरहरराव वकील, सीतारामपंत जोशी, प्रत्येकीं २
१०४ व्ही. व्ही. वझे
१०३ भिकाजी आप्पाजी पाटील
७ नरसिंगराव रूपनोर चंद्रवंशी, सखाराम जाधव देशमुखगेदार, राघवेंद्रराव रेड्डीमनी, देवीदास डुबे, रामकृष्ण सराफ, माधवराव मांढेकर, हदगांवकर, प्रत्येकीं एक
८१५ किरकोळ

एकूण ११०६-१४. यांत १७० रुपये सुरती व ९३६-१४ हाली होते. हाली ९३६-१४ चे चवदा रुपये चवदा आणे दरानें ८१५-९ सुरती आले. मिळून एकंदर ९८५-९ सुरती.

९१-९-९ परभणी येथें झालेली वर्गणी
१० श्री. यशवंत नरसिंग ऊर्फ पंडितराव चौधरी, खळीकर
८ श्री. दाजीसाहेब नानल वकील
५-८ संतुकराव नानासाहेब वकील

१० किसनराव उमरीकर वकील, पांडुरंगराव आण्णासाहेब धारासूरकर वकील, रामचंद्रराव पाचपोर वकील, कल्याणराय साहेब वकील, शंकरराव आप्पासाहेब भारसवाडकर चौधरी वकील, तात्यासाहेब गोगटे, प्र. पांच

६ सदाशिवराव आप्पासाहेब डागे, किसनराव नानासाहेब वालुरकर, भगवंतराव देसाई साहेब वकील, प्र. २

४३ ता. २८।१।१९३० रोजीं सभेंत गोळा झाले ते

४८८ हरिहरराव देशपांडे

४ बाबाराव सराफ

३ बालक गोविंद विष्णु जोशी

८ राजारामपंत मोरवंडकर, भगवानराव बोराळकर, रामचंद्र सरदेशपांडे, विष्णुपंत खळीकर, प्र. २

१८८ रंगनाथराव लाखकर

२१ गो. मा. महाजन, श्रीनिवासराव औंढेकर, किसनराव साहेब मातेकर, एकनाथरावसाहेब, डॉ. कुळकर्णी, बाबुसिंग लक्ष्मणसिंग, नारायणदास मिश्रीलाल, पांडुरंग राव साहेब महासब जेल, शंकर महाराज काहाळकर, गणपतराव वैजापूरकर, मनोहर राव साहेब खेडकर, वैजनाथ राव साहेब, विश्वनाथपंत राऊत, त्रिंबकराव सा पाटे, गणपतराव चिकसे, दातार मास्तर, दत्तात्रय रावसा खारकर, भाऊसाहेब, श्री. मु. पोकड, गोपाळराव काळे, यशवंतराव बल्लाळ मास्तर, प्र. १

१ किरकोळ

एकूण १०२-८. यांत १९ रुपये मुरती व बाकीचे ८३-८ हाली होते. हाली ८३-८ चे परमणीस पंधरा रुपये दरानें ७२-९-९ मुरती झाले. मिळून एकंदर ९१-९-९ मुरती.

१३६३-४-३ एकूण नवीन जमा
५६६७ ४-११ मागील शिल्लक
७०३०-१०-२ एकूण जमा
१२९५- ४-० एकूण खर्च वजा
५७३५-६-२ एकूण शिल्लक, पैकीं
७२०-७- २ धुळ्याचे पोस्टल बँकेंत
५०००-०- ० चाफळ सोसायटींत ठेव
३३५७ ४ ० सत्कार्योत्तेजक सभेकडे ठेव
११५७-११-० चिटणीसाजवळ घर
५७३-५६-२

**आजपर्यंत एकंदर रोख जमा रुपये २३१८५-१४-८**

धुळें
१८५१ माघ शु. ७ } शंकर श्रीकृष्ण देव



## ( ११९ )

# दुसऱ्या दौऱ्याची हकीकत

श्रीसमर्थमंदिरासाठीं हा दुसरा दौरा होय. त्यांत हैद्राबाद आणि परभणी या दोन च ठिकाणीं फक्त मी जाऊं शकलों. हे असले दौरे काढण्याचा मजवर पूर्वी कधीं प्रसंग आला नव्हता. जीर्णोद्धारार्थ अनायासें जेवढा पैसा गोळा होत असे, तेवढ्यातून जेवढें कार्य होणें शक्य असे तेवढें च होई. पण आतां श्री क्षेत्र जांब येथील मंदिराचें काम हि मोठें आहे, तें एकदा सुरू केल्यावर थांबवितां हि येत नाहीं, त्याप्रीत्यर्थ हल्लीं आतां दरमहा बाराशें पंधराशें खर्च होत आहेत, तेंव्हा पैशाचा पुरवठा करण्यासाठीं दरमहा मला कोठें ना कोठें तरी जावें लागत आहे. नुसतीं व्याख्यानें देणें किंवा प्रवचनें करणें बरें, परंतु द्रव्याची याचना करणें नको. तशी याचना करतांना माझ्या अनभ्यस्त मनाला कष्ट होतात व मी काय कारणानें ही जबाबदारी स्वतःवर घेतली कोण जाणे, अशा उद्विग्नतेचा विचार क्वचित् मनांत येऊन जातो. तरी मी प्रत्येक ठिकाणीं बजावीत असतों कीं, प्रत्यकानें स्वेच्छेला येईल तेवढी च

मदत करावी, कोणी कोणाला आग्रह करूं नये, देतांना आणि दिल्यावर मनाला वाईट वाटणार नाहीं, तेवढें च देणें द्या, कोणाच्या आग्रहानें पण स्वतःच्या मनाला कष्ट होऊन दिलेलें दान मला नको, उलट मला अशी भीति वाटते कीं, असे कष्ट वाटून कोणी दिलेल्या द्रव्यानें मंदिरास बसविलेला चिरा न जाणों, ढांसळून पडेल. मंदिरावर देखरेखीसाठीं असलेल्या स्थापत्य-विशारदांना घमेंड वाटत असेल कीं, मंदिराची मजबुती चुना आणि सिमेंट यांवर अवलंबून आहे व ते आपल्याकडून मजबूत काम करण्याची पराकाष्ठा करीत असतील, पण माझी समजूत अशी आहे कीं, महाराष्ट्रांतील लोकांच्या प्रेमाच्या आणि निष्ठेच्या सिमेंटानें त्या मंदिरास बळकटी येणार आहे व त्यावर श्रीसमर्थांचें भगवे निशाण यावचंद्रदिवाकरौ फडकत राहील !

याचना करीत पूर्वीं कधीं दौरे काढले नाहीत म्हणून हल्लीं संकट वाटतें, पण त्यांत हि समाधानाला एक जागा सांपडते. ठिकठिकाणीं निष्ठावंत माणसें भेटतात व त्यांची ती प्रेमळ निष्ठा पाहून मनाला आनंद होतो. सर्वत्र महाराष्ट्रांत श्रीसमर्थचरणीं किती निष्ठा आहे, याचा प्रत्यय येऊन भावी कालाविषयीं आशा वाटूं लागते. श्रीसमर्थांनीं रघुनाथभटांच्या मिषानें महाराष्ट्रास आशीर्वाद देऊन ठेवला आहे कीं "तुमचें मन मजवरी बहुत आहे तें तुमच्या आवडीच्या गुणें कल्याण होईल ऐसें नेमस्त चिन्ह दिसतें."

हैद्राबादेस तीन व परभणीस दोन प्रवचनें झालीं. हैद्राबादची सर्व महाराष्ट्रीय मंडळी प्रवचनांस येत, त्यामुळें बहुतेकांचा परिचय झाला. तिन्ही प्रवचनांना नामदार केशवराव, श्रीमंत वामनराव नाईक साहेब, श्री. दिगंबरदास, श्री. अंबादासराव, श्री. दत्तोपंत पिसोळकर वगैरे प्रमुख मंडळी हजर होती. लहान मोठे महाराष्ट्रीय सरकारी नोकर हि उपस्थित होत. दौऱ्यांत प्रवचनांचा क्रम योजिला असतो, तो असा-मोठ्या शहरीं तीन व लहान शहरीं दोन प्रवचनें होतात. पहिल्या दिवसाच्या प्रवचनाच्या शेवटीं मी क्षेत्र जांब येथील श्रीसमर्थमंदिराची हकिकत सांगतो. इतर मंदिरांप्रमाणें हें सामान्य मंदिर नव्हे, तर हें श्रीसमर्थांचें स्मारकमंदिर होय. तें अन्यत्र कोठें बांधलें जात नसून श्रीराणादेवींनें भूमातेच्या पदरांत ज्या ठिकाणीं श्रीसमर्थांना प्रथम दिलें, नेमकें त्या जागीं हें मंदिर बांधलें जात आहे. परन्तु पुढें मागें ती जागा हि को[illegible] सकले

नसते. निजाम सरकारच्या राज्यांतील प्रजाजनांचें हें मोठें भाग्य समजलें पाहिजे कीं, असलें तें पवित्र स्थान त्यांच्या राज्यांत आहे. त्या राज्यांतील सर्व महाराष्ट्रियांचीं मनें वेधून घेऊन तीं या मंदिराच्या ठिकाणीं केंद्रीभूत होऊं शकतील. मजसारख्या माणसाचें हें काम नसून या मंदिराचा अभिमान त्या प्रांतांतील च महाराष्ट्रियांना विशेष वाटला पाहिजे व तसा तो प्रादुर्भूत झाला आहे व वृद्धिंगत होत जाईल, अशी मला खात्री आहे.

हैद्राबादेस पहिलें प्रवचन झालें आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं प्रथम नामदार केशवराव यांस भेटावयास जाण्यास सज्ज होत होतों, तों नामदारांकडून पत्र घेऊन मनुष्य आला. पाकीट फोडून पाहतों तों आंत एक ४८८ रुपयांचा चेक होता व नामदारांनीं पत्रांत लिहिलें होतें कीं, "२५० रुपये सुरती इतिहासाचार्यस्मारक आणि २०० हल्ली समर्थांचें स्मारक, एकंदर हल्ली ४८८ चा चेक पाठवीत आहे. ह्या रकमेमुळें दोघांच्या ऋणांतून मुक्त झालों नाहीं. शक्य झाल्यास पुन्हां सेवा करीन." साश्चर्य आनंद वाटला व तो नामदारांना उलट पत्रानें कळविला.

श्रीसमर्थमंदिरांत जी समर्थांची मूर्ति स्थापावयाची त्या मूर्तीच्या सर्व खर्चाचा भार श्रीमंत वामनराव नाईक साहेब यांनीं आपणावर घेतला आहे. मूर्ति कशी असावी, कोणत्या धातूची असावी, पंचधातूची कां संगमरवरी असावी, किती उंचीची असावी, वगैरे प्रश्नांचा विचार श्रीसज्जनगडावर येत्या उत्सवांत अष्टमीच्या सभेंत व्हावा, असा हेतु आहे. या बाबतींत वाचकांना हि कांहीं कळविणें असल्यास त्यांनीं जरूर कळवावें.

हैद्राबादेस चार दिवसांच्या मुक्कामांत माझ्यामुळें नाईकसाहेबांना दुसरें कांहीं च काम करतां आलें नाहीं व त्यांनीं हि इतर सर्व कामें बाजूस सारलीं, हे मजवर उपकार झाले. परमणीस थोडें काम झालेलें दिसतें, पण तसें नव्हे. जें काम झालें तें लोकांनीं अत्यन्त प्रेमानें आणि आस्थेनें केलें म्हणून मला त्याची किंमत जास्त वाटते. परमणीस श्री. गोविंदराव ऊर्फ दाजीसाहेब नानल, वकील, यांचें व यांच्या शब्दानें इतरांचें सर्वतोपरि सहाय्य झालें. दोन्ही ठिकाणांहून आणखी मदत व्हावयाची आहे, ती यथाकाळ अवश्य होईल.

निजामसरकारच्या राज्यांतील नांदेड, इंदुरबोधन, हिंगोली, सेलु, परतूर, जालना, औरंगाबाद, अंबा जोगाई, बीड वगैरे गांवें घ्यावयाचीं

आहेत, ती सवडीनें घेण्यांत येतील. शिवाय कोल्हापुर, बडोदे, अहमदाबाद, श्री देवी अहल्याबाईचें इंदुर, श्री राणी लक्ष्मीबाईची झांशी, ग्वाल्हेर वगैरे शहरें यथावकाश घ्यावयाचीं आहेत. वऱ्हाड अजून बरा च राहिला आहे. मुख्य महाराष्ट्रांतील कांहीं प्रमुख शहरें तरी केव्हां तरी घेतलीं पाहिजेत. कोणी-कडून तरी महत्तर महाराष्ट्रांतील सर्व लहान मोठ्या शहरांचा शतभार श्रीसमर्थ-मंदिराला लागला पाहिजे.

चालू महिना श्रीसमर्थांच्या उत्सवाचा. त्या महिन्यांत मला दुसरीकडे कोठें जातां येत नाहीं. श्रीसज्जनगडावर माघ वद्य सप्तमी, अष्टमी व नवमी करून दशमी आणि एकादशी असे दोन दिवस खुद्द छत्रपतींच्या सातान्यास प्रवचनें व्हावीं व श्रीसमर्थमंदिरासाठीं सातान्याच्या नांवाला साजेशी भिक्षा व्हावी, अशी इच्छा आहे, ती श्रीसमर्थचरणीं विदित होवो.

धुळें—१८५१ माघ शु. ७



श्री

रामदास आणि रामदासी ग्रंथमाला

भाग सातवा

# श्रीदासविश्रामधाम

सुदिव्य दासविश्रामसदनीं । आत्मारामु नटतो अनुदिनीं ।
पाहा जा सद्‌दृष्टि भरूनि । दावा नेऊन पुढिलांसी ॥

आत्मारामहाराजकृत श्रीसमर्थांचें चरित्र. मूळचरित्रग्रंथाची ओवी-संख्या १६३०२ असून शिवाय आत्मकृत व इतर कविकृत पदें, अभंग, श्लोक वगैरे असंख्य आहेत. या ग्रंथाच्या सर्वव्यापी स्वरूपावरून प्रस्तावनेंत रामदासी संप्रदायाचा विश्वकोश असा गौरव करण्यांत आला आहे.

या ग्रंथाचे १२१ अध्याय म्हणजे इतकीं आख्यानें होत. त्यांची रचना च मुळीं कीर्तनाच्या पद्धतीला धरून आहे. कीर्तनकारांना या ग्रंथाचा फार उपयोग होईल. ग्रंथाची पृष्ठसंख्या सुपर रॉयल अष्टपत्री ९७४ शिवाय प्रस्तावना व शेवटीं सूची. सुमारें शंभर प्रती शिल्लक असतील नसतील. किंमत रु. ११, शिवाय टपाल खर्च रु. १-५-०

चिटणीस, सत्कार्योत्तेजक सभा, धुळें

[१२०]

श्रीराम

## श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारकार्याचा जमाखर्च वगैरे

१८५१ माघ शु. ७ (ता. ५।२।३०) पासून तों

फाल्गुन शु. ७ (ता. ७।३।३०) पर्यंत

२५-०-० श्री. पांडुरंग वासुदेव जोशी, वकील, हैद्राबाद

५-०-० श्रीसेवक भीमदास विश्वंभर रामदासी, किनी यांचे मार्फत

१ लक्ष्मणबुवा रामदासी

१ ताईबाई मघाळकर

१ वेणुताई नळदुर्गकर

२ चौघेजण, प्र. ८८

१०-०-० श्री. अनंत सखाराम वणीकर, अहमदाबाद

२०-०-० V. N. Kalyanpur Banglore प्रिय व सद्गुणी पुत्र रामदास याच्या स्मरणार्थ

१० ता. १७।२।३०

१० ता. ७।३।३०

८२७-१२-० स्थापत्यविशारद वासुदेवराव "" गोगटे यांच्या खातीं नावें

२-० ता. ५।२।३०

१३-० ता. ६।२।३०

८०-० ता. १४।२।३०

३०-० ता. १५।२।३०

२-१२ ता. १५।२।३०

३००-० ता. २१।२।३०

४००-० ता. ७।३।३०

२७-३-३ प्रवासखर्च

३-१३-० टपालखर्च

३३-६-० सामानखरेदी

---

८९२-२-३ एकूण खर्च

५-०-० सौ. मातुःश्री सुगुणाबाई ढवळे यांच्या आज्ञेवरून श्रीदासनवमी-प्रीत्यर्थ हस्तें के. सी. ढवळे, मुंबई

१-१२-० वासुदेवराव हरि ऊर्फ बापुसाहेब ठाकूर, दादर

१-४-० रामचंद्र नथुराम उर्फ बाबूराव समेळ, मुंबई, (पितृस्मरणार्थ) हस्तें ना. पां. नवरे मुंबई

३७-१२-० श्रीसमर्थसेवक स. वि. भिडे, वकील, खामगाव मार्फत

६८४ खामगांव हायस्कूल शिक्षकतर्फे रा. मारे मास्तर

५ दुनियासिंह उमरावसिंह ठाकूर ४ लक्ष्मण हरी जोशी, वकील
३ तात्यासाहेब चितळे ३ बाजीराव नामदेव बोबडे, वकील
१४ श्री. त्रिं. टिपरे वकील, म. स. तायडे वकील, शं. ह. चौबे वकील, वि. गो. बोरकर वकील, ग. भा. लिखिते, डॉ. माधव गोपाळ सावजी, रघमल गंगाविशन आगरवाले, प्र. २
३ ना. भा. चितळे वकील, रा. शे. देशपांडे वकील व रा. वा. ब्रह्म, प्र. १
यांतून ८८ म. ऑ. क. वजा जातां
१४-४-० श्रीस्वयंसेवक दादा गोखले, कल्याण, यांचे मार्फत
५ रामचंद्र नारायण केळकर
९ अ. रा. लेले, स. म. दिवेकर, के. गो. जोशी, S. V. Kulkarni, वा. के. प्रधान, ज. गो. भागवत, A. B. Sane, A. J. Sahasrabudhe, माईसाहेब गुप्ते, प्र. १
८४ किरकोळ
५-०-० श्री. गणेश गोविंद पाध्ये, पुणें
१-०-० श्रीसमर्थकृपा
८८-०-० यवतमाळ येथील मदतीचा पहिला हप्ता
मार्फत श्रीसमर्थसेवक गजानन नरहर पंडित, वकील
२५ भीमराव हणमंत जतकर, वकील
२५ नानासाहेब अभ्यंकर, वकील १० डॉ. भास्कर महादेव टेंबे
५ रा. काणे ५ रा. दामले, वकील ५ रा. जोगळेकर, वकील
३ रा. बापट, वकील २ श्री. श्री. पांडे वकील २ ब. ज. लाटे
६ धर्माधिकारी वामन राव, केळकर मास्तर, रामभाऊ जोशी, धर्माधिकारी स. ज., गो. वि. बागलकोटे व रा. वि. धवाव, प्रत्येकीं एक
९१-९-३ सज्जनगडीं उत्सवांत झालेली मदत
१०-१२ केशव गोपाळ कुळकर्णी १० गणेश गोविंद वैद्य, नाशिक
५ रामभाऊ देशपांडे, कोल्हापुर ५ श्री. जानकीबाई गोखले
५ श्री. लक्ष्मीबाई दुबे ५ श्री. कृष्णाबाई मीठसागर, पुणें

५ रघुनाथ हणमंत कोटणीस, वकील, सांगली
१ कै. सौ. इंदिराबाई गडहिंग्लजकर, याचे स्मरणार्थ
२ रामचंद्र विष्णु कुळकर्णी २ श्री. काशीबाई आपटे
२ बाळकृष्ण वामन खाडिलकर, पेंठ
२ कृष्णाजी बळवंत महाबळ, नाशिक
१७ यशवंतराव वैद्य पुणें, दत्तात्रय विष्णु देशमुख, श्रीरामकृपा, हरि, श्रीरामकृपा, इंदिराबाई गोखले, भागीरथीबाई सोमण, धोंडुबाई कुळकर्णी, यमुनाबाई जोशी, कृष्णाजी गणेश सोहोनी, रघुनाथ हरि बुधकर, भीमराव गोपाळ शहापुरकर, गंगाधर अमृत देव वाघोली, कोंडदेव सखाराम जाधव अटके ता. कऱ्हाड, बाबुराव कुळकर्णी, विश्वनाथ काशीनाथ अभ्यंकर पुणें, सीताराम आत्माराम वीरकर कल्याण, प्रत्येकीं १ रुपया प्रमाणें
१८८ मुरलीधर शंकर देशपांडे, फलटण, स्वयंसे. राम मारुती यादव मार्फत १८४ श्रीराममूर्ति
७ स्वयंसेवक दिनकर केशव कानेटकर, दौंड, याचे मार्फत
५ दादासाहेब फडके १ जगन्नाथ अमृत खेर
१ A. C. Kulkarni
४८१४८३ स्वयंसेवक बहिरु मलाप्पा महमाणे, याचे मार्फत, किरकोळीनें
८४ किरकोळ, मार्फत राजाराम रामदासी
१८११ स्व. से. राम मारुती यादव याचे मार्फत किरकोळीनें
१८४ किरकोळ

७२४-५ पुणें येथील मदतीचा पहिला हप्ता
२५१ लक्ष्मण बळवंत ऊर्फ आण्णासाहेब भोपटकर
५१ Damodar Keshao Bhave, M. A., B. Sc (Edin) & c
२५ सदाशिव विनायक बापट, लोकमान्यांच्या आठवणींचे कर्ते
२५ सेवासदन पुणें २५ श्री. जगन्नाथ महाराज पंडित
२५ श्री. सरदार खंडेराव रामराव ऊर्फ बापुसाहेब विंचुरकर
२२ L. R. Gokhale, Pleader

२१ कै. श्री. अन्नपूर्णाबाई देशपांडे यांचे स्मरणार्थ श्री. बाबा साहेब देशपांडे यांचे कडून

६६ N. G. Gadgil, नारायण धोंडो परांजपे, दत्तात्रय विश्वनाथ ताम्हणकर, रंगनाथ विष्णु रवडे, काशीनाथ मल्हार बेलसरे, वामनराव तळवलकर, प्रत्येकीं ११

२० Dr. V. B. Gokhale, विश्वनाथ सदाशिव बापट, प्रत्येकीं १०

७८२ रामचंद्र धोंडो दास्ताने, विद्यार्थी, टेक्निकल स्कूल, मार्फत १ R. T. Sathe १ Athavale १ K. D. Kulkarni ४८२ किरकोळीनें, Students and Staff

७ कृष्णाजी नारायण भिडे, रिटायर्ड फ. क्ला. सब जज्य

५८४ दत्तात्रय कृष्ण क्षीरसागर

६५ अच्युत चिंतामण भट, नारायण विष्णु गोडबोले, कृष्णाजी केशव काळे, विठ्ठल श्रीधर लिमये, वासुदेव केशव सामक, सीताराम गोविंद केळकर, श्रीपाद गोविंद पेंडसे, श्री. कृष्णाबाई खरे बी. ए., वैद्य पुरुषोत्तम गणेश नानल, दत्ताजीराव शिवराम जामदार, नरहर बळवंत पटवर्धन, श्री. गंगुबाई जोग, श्री. लक्ष्मीबाई भागवत, प्रत्येकीं ५

३ विष्णु बळवंत देशपांडे ३ भगिनी २८८ वैकुंठराय

१८ दादा साठे, गणेश विष्णु जोशी, एक श्रीसमर्थदास, अन्नपूर्णाबाई गणपुले, रामचंद्र जनार्दन गोखले, विष्णु आण्णा नाटेकर, मुरलीधर मो. कुलकर्णी, रामकृष्ण ना. बापट विटे, S. S. Deodhar, प्रत्येकीं २

१८५ यशवंत एकनाथ नादेडकर १८४ एक श्रीसमर्थदास

६४ गोपाळ धों. ताम्हनकर, नरहर रा. जोशी, नारायण वि. आठवले, भालचंद्र ग. लेले, शंकर सी. हिरलेकर, परशुराम सी. सबनीस, गंगाधर ब. लेले, सदाशिव वा. परांजपे, गोपाळ द. बापट, श्रा. भी. बलकुदे, वि. प. गोडबोले, V. K. Tilak, लक्ष्मण वि. जोशी, विनायक कृ. गाडगीळ, नरहर र. नरवणे, विनायक या. साठे, स. वि. पिंपुटकर, केळकरबंधु, श्रीसमर्थकृपा, नारायण कृ. टिळक, J. Y. Deshpande, आक्कासाहेब दिवेकर, सीताबाई खाडिलकर, कृष्णाबाई धर्माधिकारी, वामन ल. मोघेकर, श्रीसमर्थकृपा, श्री. धों. साठे, तीन मित्र, गो. दा. दातार, ना. वि. दातार, भी. स. ढवळे, के. रा. करं-

दीकर, श्रीकृपा, नारायण वि. वैशंपायन, आ. या. लिमये, गजानन ना. टिळक, वासुदेव वि. करदीकर, गो. कृ. मुडले, ज. ना. साठे, प. दा. जोग, सदाशिव सी. बरवे, विष्णु म. देवधर, प्र. गो. सोहनी, रामभक्त, बळवंतराव गांधी, यशवंत नदे, यशेश्वर वि. तळेकर, श्री. भागीरथीबाई देशपांडे, सौ. इंदिराबाई रानडे, समर्थभक्त, समर्थभक्त, समर्थकृपा, श्री. गिरिजाबाई जाभेकर, V. G. Nerlekar, कृ. गो. बापट, म. ग. गुर्जर, रा. वि. भिडे, पुरुषोत्तम दा. खाडिलकर, श्री. पार्वतीबाई मोपटकर, के. ना. देशमुख, र. मा. फडके, स. दा. कुळकर्णी, विष्णु कृ. वैजापुरकर, श्री. यमुनाबाई करंदीकर, प्रत्येकी १

१५८१४ किरकोळीनें, सेहेचाळीस जणाकडून

१०२९-१४-२ एकूण नवीन जमा

५७३५- ६-२ मागील शिल्लक

६७६५- ४-५ एकूण जमा

८९२- २-३ एकूण खर्च वजा

५८७३- २-२ एकूण शिल्लक, पैकीं

| | |
|---|---|
| १२९०-७-२ | धुळ्याचे पोस्टल बँकेंत |
| ५००-०-० | चाफळ सोसायटींत ठेव |
| ३३५७ ४-० | सत्कार्योत्तेजक सभेकडे ठेव |
| ७२५-७-० | चिटणीसाजवळ परती |
| ५८७३-२-२ | |

आजपर्यंत एकंदर रोख जमा रुपये २४२१५-१२-११

धुळें
१८५१ फाल्गुन शु ७ } शंकर श्रीकृष्ण देव



## ( १२१ )

# तिसऱ्या दौऱ्याची हकिकत

## गड आणि पुणें

श्रीसज्जनगडावरील उत्सव दरसालप्रमाणें यथासांग उत्साहानें साजरा झाला. सर्व कार्यें पूर्वपद्धतीप्रमाणें करण्यांत आलीं. श्री. चौंडेमहाराजांच्या प्रयत्नानें अलिकडे पालख्याचा जो सोहळा होऊं लागला आहे, त्यायोगें

पालख्या येण्याच्या मार्गांतील लहान मोठ्या गांवीं तर उत्साह दुणावतो च, पण खुद्द गडावरील उत्सवाच्या वैभवांत हि भर पडत आहे. यंदा स्वतः चौंडेमहाराज गडावर येऊं शकले नव्हते, तरी त्यांच्या निष्ठावंत शिष्यांनीं त्यांची गैरहजरी भासूं दिली नाहीं, हें त्यांना भूषणावह होय. अष्टमीची सभा, ही एक दरसालची कायमची बाब होऊन बसली आहे. गादीवरील पुरुषाच्या अध्यक्षतेखालीं जीर्णोद्धारादिकार्यांचा विचार करण्यासाठीं अष्टमीचे दिवशीं तिसरा प्रहरीं सभा भरत असते, त्याप्रमाणें ती यंदा हि थी. आबासाहेब महाराज यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती. श्री क्षेत्र जांब येथें जें श्रीसमर्थमंदिर बांधण्यांत येत आहे, त्याची हकिकत सभेंत सांगण्यांत आली. मंदिर त्वरित उभारलें जाऊन १८५१ च्या चैत्र शु. ९ स मंदिरांत श्रीसमर्थांची स्थापना होईल, असा बृहन्महाराष्ट्रानें मनोभावें प्रयत्न करावा, अशी सर्वांना विनंती करण्यांत आली. धेनुदास शंकरराव डोळे, राष्ट्रप्रचारक आप्पासाहेब आळतेकर व संतभक्त फोटणीस यांनीं प्रेमळ भाषणें करून त्या विनंतीचें परोपरीनें समर्थन केलें. सर्व भक्तजनांनीं नेत्रांबुसहित प्रेमानें त्या विनंतीस आपली मान्यता दर्शविली. सर्वजनप्रिय श्री. बळवंतराव कासेगांवकर वैद्य यांनीं तत्काळ जाहीर केलें कीं, आपण पुढील उत्सवाचे आंत एक हजारापर्यंत रक्कम गोळा करण्याचा प्रयत्न करूं. आप्पासाहेब आळतेकर म्हणाले, आपण पांचशें पर्यंत तरी मिळवूं च. जमलेल्या मंडळींनीं लागली च भीक्षा देण्यास सुरवात केली. कोणी एकानें मनगटावरील पल्याळ व दिलें. त्याचा तात्काळ लिलांव होऊन तें दुसऱ्या कोणी वीस रुपयांस घेतलें. रुपये यावयाचे आहेत. अष्टमीच्या च सभेंत प्रसंगानुरोधानें संप्रदायाच्या लक्षणांचा, गोरक्षणकार्यांचा, पालख्यांच्या सोहळ्याचा ऊहापोह करण्यांत आला.

*यंदाच्या उत्सवाला महत्त्व येण्याला नवमीचे दिवशीं आणखी एक* गोष्ट घडली. कैक पिढ्या परधर्मांत गेलेल्या तीन स्त्रिया व एक मुलगा यांना श्री. विनायक महाराजांच्या विद्यमानें हजारों लोकांच्या समक्ष शुद्ध करून स्वधर्मांत परत घेण्यांत आलें. आपल्या पूर्वजांस जुलमानें बाटविण्यांत आले होते, याची जाणीव जागृत होऊन, स्वधर्मांत येण्याचा मार्ग खुला झाला असतां आम्ही त्या अन्यायाचें परिमार्जन केल्यावांचून कसें राहूं, अशा सात्त्विक संतापानें स्वधर्मांत येण्याचा त्या स्त्रियांचा निश्चय झालेला दिसत होता. होमादि सर्व विधी सर्व जन कौतुकानें अवलोकन करीत होते. शुद्ध झाल्यावर त्या स्त्रियांनीं गाईची पूजा केली, ती पाहून सर्वांना आनंद झाला व शुद्धिकार्याचें महत्त्व आपोआप पटलं. आजपर्यंत कोणी हि परधर्मांत गेला म्हणजे त्यास परत स्वधर्मांत येण्यास मार्ग मोकळा नसे,

घरांतून बाहेर पडावयाचें असल्यास दरवाजा खुला करून देण्यांत येई, पण बाहेर गेलेल्यास परत आंत यावयाचें झाल्यास दरवाजा बंद असे. असा क्रम कैक शतकें चालला. त्यामुळें घरांतली संख्या घटत चालली. हा प्रकार खानेसुमारीच्या आंकड्यांनीं सिद्ध झाल्यामुळें लोकांचे डोळे उघडले व बाहेर गेलेल्यास आत येण्याला दरवाजा उघडण्यांत आला. बाहेर पडलेल्यास परत जातां येते, असें परधर्मीयांच्या हि प्रत्ययास आल्यावर, कोणास हि बाहेर काढण्याचे प्रयत्न आपोआप शिथिल पडतील व 'स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः' हा सिद्धान्त सर्व धर्मांना मान्य होऊन 'बाटणें' ही क्रिया बंद पडेल.

गडावर येणाऱ्या प्रमुख रामदासी मंडळीकडे पाहिलें, म्हणजे त्यांच्यांत हि अधिकारपरत्वें किंवा स्वभावभेदानें कर्म, उपासना आणि ज्ञान या बाबतींत कामाची वाटणी झालेली दिसते. श्री. केशवबुवा ऊर्फ श्रीसमर्थदास, श्री. नारायणबुवा, श्री. बालाजीबुवा, वगैरे मंडळी सारखी जनसेवेंत गर्क दिसे. लोकांना श्रीसमर्थांचें दर्शन सुखानें होत आहे किंवा नाहीं, प्रसाद सर्वांना मिळतो किंवा नाहीं, वगैरे गोष्टींकडे त्यांचें विशेष लक्ष असे. पंगतींत वाढण्यापासून तों खरकटीं काढण्यापर्यंत पडेल तें काम आनंदानें करण्याच्या त्यांच्या वृत्तीचें सर्वांना कौतुक वाटे. चौंडेमहाराजांची शिष्यमंडळी भजन, कीर्तन, प्रवचन यांत गुंग असे. कोणी, कोठें, केव्हां, कीर्तनास उभे रहावें, या योजनेंत ते असत. संप्रदायाचें वैभव विशेष खुलून कशानें दिसेल व जनतेच्या मनांत भरेल या विचारांत विनायकमहाराज व त्यांची मंडळी निमग्न दिसत. श्रीसमर्थचरणांकडे मात्र सर्वांचें सारखें लक्ष असे.

गडाविषयीं व गडावरील उत्सवाविषयीं पुष्कळ विचार मनांत येतात, पण आज जागा च कोठें आहे ? पुढें पाहूं.

**पुणें** येथें वद्य १०, ११, १२, १३ असे चार दिवस श्रीशिवाजी मंदिरांत प्रवचनें झालीं: पैकीं तीन श्रीसमर्थचरित्रावर व शेवटचें श्रीसमर्थवचनाधारें खादी—स्वदेशी—बहिष्कार या विषयावर. कोणत्या हि कार्याला महाराष्ट्र अनुकूल झाला, म्हणजे सारा देश अनुकूल झाला, हें जसें खरें, तसें कोणत्या हि कार्याला पुण्यानें आणि त्यांतल्या त्यांत लोकमान्यांच्या केसरीनें उचलून धरलें, म्हणजे तें कार्य अखिल महाराष्ट्राचें झालें, असें समजावें. पुण्यास येऊन श्रीसमर्थचरित्रावर प्रवचनें करण्याविषयीं भारतराष्ट्रसंवर्धक मंडळानें आम्हांस आमंत्रण दिलें, केसरीनें त्यास पुष्टि देऊन श्रीसमर्थमंदिराच्या कार्याला आपला आशीर्वाद दिला आणि साऱ्या पुणें शहरानें त्या कार्याचा अंगिकार केला. पहिल्या च प्रवचनाचे वेळीं श्री.

आण्णासाहेब भोपटकर यांनीं श्रीसमर्थ मंदिराला आपली २५१ रुपयांची मदत जाहीर केली व दुसरे दिवशीं त्या रकमेचा चेक हि पाठविला. आण्णासाहेबांचे वडील बंधु भालाकार श्री. भाउसाहेब भोपटकर यांनीं आह्मांस कळविलें कीं, काय किरकोळ मदत मिळवावयाची असेल ती तुह्मी खुशाल मिळवा, दिल्लीहून तात्यासाहेब केळकर परत येता च, आण्णासाहेबांचे २५१ धरून एक हजाराची भरती आपण करवून देऊं, त्याची काळजी तुह्मांस नको. या उभयता बंधूंची श्रीसमर्थचरणीं अप्रतिम निष्ठा असल्याचें आह्मांस ठाऊक होतें. श्रीसमर्थांचे निस्सीम भक्त पुण्यास फार आहेत. त्या सर्वांनीं आम्हास सहाय्य केलें. आम्ही पुण्यास असतांना श्री. वामनराव तळवलकर आम्हास कोणा कोणाकडे घेऊन गेले च पण नंतर हि श्रीसमर्थकार्याविषयीं सतत आठवण ठेवण्याचें त्यांनीं आश्वासन दिलें. भारतस्नेहसंवर्धक मंडळाचे उभयता चिटणीस रा. दत्तोपंत फडके वकील व रा. लक्ष्मणराव फडणीस यांनीं मुळीं या सर्व कार्यांचा च भार घेतला होता. तिसऱ्या प्रवचनाचे वेळीं श्री. चिंतामणराव ऊर्फ नानासाहेब वैद्य यांची अध्यक्षस्थानीं योजना झाली होती व त्यांनीं अध्यक्षस्थान स्विकारता च पहिली गोष्ट केली ती स्वहस्तें पंचवीस रुपयांची मदत कागदावर लिहिली व मग आम्हास प्रवचनास सुरवात करण्याची आज्ञा केली. केसरीकचेरींत दुसऱ्या दिवशीं त्यांनीं ते पंचवीस रुपये जमा हि केले. केसरी, भाला किंवा रा. तळवलकर वकील यांच्या कडे किंवा इतर स्वयंसेवकाकडे सर्वांनीं मदतीची रक्कम भरावी. प्रवचनांत सर्व च विषय येत व त्यात मधून मधून रा. फाटकांचें हि तोंडीलावणें असे. रा. फाटकांचा रंग पालटत चालला आहे, असें कोणी म्हटलें, त्यावर ते लवकर च पूर्वरंगावर येतील, असें अध्यक्ष श्री. नानासाहेब वैद्य ह्मणाले ! पुण्याच्या सर्व लोकांचे च आह्मी ऋणी झालों आहोंत. सर्वांनीं च सारखें सहाय्य केलें. सेवासदनानें आमंत्रण देऊन बोलावयास लाविलें आणि मदत केली. सदनांतील भगिनींची मदत ह्मणजे आम्ही आमच्या कार्यास आशीर्वाद समजतो. मंदिर पुरें होऊन स्थापनेचा जो अपूर्व राष्ट्रीय समारंभ होईल त्यास येण्याविषयीं आम्ही सर्व बंधुभगिनींना आमंत्रण देऊन ठेविलें आहे.

पहिला हप्ता म्हणून ७२५ रुपये पुण्यानें आमच्या हवालीं केले. आणखी सरासरी एवढाले च एक दोन हप्ते होतील, असा आमचा अदमास आहे. पुण्याचें पाठबळ म्हणजे बृहन्महाराष्ट्रांत निर्भय संचार करण्याचा कायमचा परवाना होय ! तो परवाना आम्हास मिळाला, हे पुण्याचे आम्हावर उपकार होत.

धुळें—१८५१ फाल्गुन शु. ९

[ १२२ ]

श्रीराम

# श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारादिकार्याचा

## जमाखर्च वगैरे

१८५१ फाल्गुन शु. ८ ( ता. ८।३।३० ) पासून
चैत्र शु. ३ ( ता. २।४।३० ) पर्यंत

| जमा | खर्च |
|---|---|
| १६-०-० श्रीसेवक विष्णु गणेश | १०३५-०-० स्थापत्यविशारद |
| गाडगीळ, मुंबई, मार्फत | वासुदेवराव गोगटे |
| ११ परशराम वामन मराठे | यांच्या खातीं नांवें |
| ३ विष्णु गणेश गाडगीळ | ६०२ ता. ११।३ते२१।३ |
| १ जयराम विष्णु काळे | ६५ ता. २४।३।३० |
| १ रामकृष्ण दिनकर नेने | १८ ता. २८।३।३० |
| १०-०-० श्री. अनंत सखाराम | ३५० ता. २५।३।३० |
| वणीकर, अहमदाबाद | १६-६-० प्रवासखर्च |
| ५-०-० श्री. राजाराम कृ. | ३-१-० टपालखर्च |
| आबडेकर, मुंबई | १०५४-७-० एकूण खर्च |

५-४-० कै. सौ. मातुश्री मैनाताई ऊर्फ लक्ष्मीबाई यांच्या सांवत्सरिक श्राद्धदिवशीं काढलेले, हस्तें बाबुराव व आण्णा नवरे, मुंबई

२०-०-० श्रीसज्जनगडावर अष्टमीचे सभेंत मिळालेल्या घड्याळाचा लिलाव होऊन आलेले, हस्तें श्री. चेनुदास डोळे

५०-०-० श्रीसेवक विनायक अनंत बाघ ठाणे, यांचे मार्फत

४ हरि लक्ष्मण घाणेकर, भोजन दक्षिणा श्रीदासनवमी शके १८४७ ठाणें २६ २-२७

४ सदर, शक १८४८ ता. २६ २-२७

३ व्यवस्थापक श्रीकल्याण महाराजांचा उत्सव, मो. द. ठाणें ता. २८-७-२७

५ हरि लक्ष्मण घाणेकर, श्री. दा. न. मो. द.
शके १८४९ ता. १५।२।२८

२ बळवंत विठ्ठल पाटसकर, मुंबई, बंधु जनार्दन वि.
पाटसकर याचे लग्नाप्रीत्यर्थ ता. १५।३।२८

२- २-९ व्यवस्थापक श्रीकल्याण महाराजाचा उत्सव,
मो. द. ठाणें, ता. ५-७-२८

२- ९ लक्ष्मण र. पुरोहित, श्रीअनंतपंचमी, मो. द. ता. ८।७।२८

५- ४ हरि लक्ष्मण घाणेकर
श्रीदा. न. मो. द. १८५० ता. ३-२-२९

६- ८ व्यवस्थापक श्रीकल्याण म. ठाणे मो. द. ता. १९।७।२९

०- ६-३ ऐक्यबंध, लोकमान्य भोजनमंडळ, मो. द. ता. २१।७।२९

२- ७ नारायण गणेश पिंपळखरे, गुरुपौ. मो. द. ता. २१।७।२९

३-१५ नारायण गणेश पिंपळखरे, अनंतपंचमी, मो. द. २६।७।२९

६ हरि लक्ष्मण घाणेकर, व्य. श्रीदास न. म. ठाणें १८५१
भोजन दक्षिणा ता. २१।२।३०

२-१२ विलंबप्रायश्चित्तार्थ किरकोळ जमा ता. १२।३।३०

८-८-० श्री. चिंतामण दत्तात्रय पराजपे, यांनीं परशुराम भाऊ कॉलेजांत
जमविलेली रक्कम

८ प्रो. गोडबोले, प्रो. हर्डीकर, डॉ. भागवत, प्रो. करमरकर, प्रो.
भावे, शं. द. गोखले, डी. जी. कुळकर्णी व एस्. के. कुळकर्णी,
प्रत्येकीं १

८८ किरकोळ

६८-०-० श्रीसमर्थसेवक पांडुरंग रामचंद्र कुळकर्णी ऊर्फ बळवंतराव कासे-
गांवकर, याचे मार्फत

४० सीताराम हणमंत कुळकर्णी रेंजर, भिकुभाई लालचंद गुजर,
मगनचंद उत्तमचंद गुजर, माधवराव बाळासाहेब पाटील, कुमारी
मनोरमा माधवराव पाहळकर महिसोर, वासुदेव हणमंत कुळकर्णी,
धोंडी नाना दगडे, जोती रामजी पाटील, प्रत्येकीं ५

४ रामचंद्र तात्या कुळकर्णी व नागेश नाथाजी पाटील प्र. २

१८४ चेंडु तात्या सोनार

१९ गणेश बाळकृष्ण पंडित, दादा त्रिंबक सोदाणकर, कृष्णाजी पां. कुळकर्णी, विष्णु गो. कुळकर्णी, सौ. सरस्वतीबाई भ. गणेश नारायण कुळकर्णी, रामचंद्र रावजी कुळकर्णी, विष्णु घों. कुळकर्णी, गंगाराम नेमचंद गुजर, बापुराव घों. रेमणे, घोंडदेव कृ. कुळकर्णी, जोती आप्पाजी पाटील, मारुती विठोबा कोपार्डे, कृष्णा जोती गवळी, दामोदर कृ. कुळकर्णी, विष्णु हणमंत पाटील, गोपाळ बा. कुळकर्णी, राजाराम रावजी, बाळाप्पा माळी, संतु माना रेळेकर, प्र. १

४ किरकोळीनें

यांत ८४ खर्च वजा जातां

१ गजानन नरहर पंडित, यवतमाळ

१ श्रीसमर्थकृपा

## ३११-१०-३ अकोला येथील मदतीचा पहिला हप्ता

५१ पुरुषोत्तम बळवंत गोळे, वकील

२५ रा. ब. रामचंद्र विष्णु महाजनि

२५ अनंत सखाराम आठल्ये

१५ K. B. Palsule

१५ दत्तोपंत भागवत

११ गोविंद गंगाधर काटे, श्रीरामदास स्टोअर्स

४० शिवराम पांडुरंग अभ्यंकर, G. R. Pendharkar, यशवंत रामचंद्र ओक, वासुदेवराव चिपळूणकर, प्रत्येकीं १०

६५ गोविंद विनायक कर्णिक, श्रीधर अनंत भागवत, Murlidhar, V. K. Deshpande, यशवंत रामचंद्र डोंगरे, गोपाळ काशीनाथ जोशी, D. V. Paranjpe, भाऊराव अमृतराव काळे, दासमंडळ हस्तें गद्रे, सौ. दुर्गाबाई केळकर, नानाभाई इच्छाराम, श्री. सीताआक्का जोशी, सौ. काशीआक्का जोशी, प्रत्येकीं ५

४ नारायण शंकर घोडसे

१२ हणमंत विष्णु मेहेरे, सौ. मनोरमाबाई समेळ, लक्ष्मण केशव चितळे, गोपीनाथ दामोदर कोतवाल, प्रत्येकीं ३

६ गणपतराव दाडेकर, नागोराव सखाराम माने, कृष्णाजी गणेश घैसास, प्रत्येकीं २

१८४ G. R. Damle

२८ काशीनाथपंत सहस्रबुद्धे, बाळासा भारोटे, भगवान जानराव जाधव, पांडुरंग नारायण आळमेलकर, ग. घों. कुळकर्णी, श्रीकृष्ण माधव चौधरी, केशव कृ. भोंडे, दामोदर रा. चांदेरकर, जबलपूरचे विश्वनाथ गणेश साने, नारायणसिंग तानसिंग रजपूत, रघुनाथ गणेश पंडित, सौ. सुशीलाताई पराण्डे, फडके, फडक्यांचे मित्र, नारायण वि. तरटे, रामचंद्र कृ. केळकर, सौ. सुभद्राबाई जोशी, शंकर गो. धोंडसे, रा. ह. चांदसरकर, पांढरकर मास्तर, श्रीसमर्थसेवक, यशवंतराव अगरकर, सौ. जानकीबाई महाजनि, महादेव ब. भावे, रामचंद्र या. नातु, दिगंबर मल्हार सदावर्ते, जनार्दन म. शनवारे, S. P, Gote, प्रत्येकीं १

३०६०३ किरकोळीनें

## १२०-१५-६ वाशीम येथें झालेली मदत

५१ नीळकंठ कृष्ण खेर्डेकर, वकील

११ विनायक कृष्ण गोखले, वकील

१० त्र्यंकटेश गोविंद गोखले, वकील

१० जनार्दन भालचंद्र साने, वकील

५ नारायण कृष्ण परांजपे, वकील

५ डॉ. विश्वंभर प्रभाकर लिमये

१० कृष्णाजी हणमंत अतकर, शंकर गो. दबीर, राजे गोपाळराव काशीराव, वासुदेवराव देशपांडे, लक्ष्मण देवीदास अनसिंगकर, प्रत्येकीं २

१६ गो. भ. गंधे, डॉ. श्री. ल. काशीकर, महादेव ग. दातार, दत्तात्रय वि. राजदेरकर, मोहनीराज या. खोपकर, काशीराव ल. भ्रगी, द. वा. विशद, द. गो. जोशी, आचा कहोळकर, केशव ना. आळमेलकर, त्रिंबक बा.

पांडे, बळिराम सी. कंठे, हिंगोलीचे वासुदेव धुंडिराज बखोले, शंकर ग. बुलाख, आबाजी ब. भिडे, भिकाजी दामोदर दाते मु. कोर्ले प्रत्येकीं १

२८१५८६ किरकोळीनें

६१७-५-९ एकूण नवीन जमा

५८७३-२-२ मागील शिल्लक

६४९०-७-११ एकूण जमा

१०५४- ७- ० एकूण खर्च वजा

५४३६- ०-११ एकूण शिल्लक, पैकीं

१३६५-७-२ धुळ्याचे पोस्टल बँकेंत

५००-०-० चाफळ सोसायटींत ठेव

३३५७-४-० सत्कार्योत्तेजक सभेकडे ठेव

२१३-५-९ चिटणीसाजवळ परती

५४३६-०-११

## आजपर्यंत एकंदर रोख जमा रुपये २४८३३-२-८

टीपः—ता. १३-३-३० रोजीं चाफळ-उंब्रज पोस्टांतून १०५ रुपये इन्शुअरनें आले, ते स्वीकारतांना कोणाकडून आले तें नमूद करण्यास कारकून विसरले, पाकीटांत पत्र नव्हतें व पाकीटावर असलेल्या पाठविणाराचें नांवावरच उंब्रजपोस्टानें नंबराची चिठ्ठी डकविल्यामुळें इन्शुअर कोणाकडून आलें तें नक्की झालें नाहीं. पत्रें पाठवीत आहे. तोंवर रक्कम अनामत ठेवली आहे.

विनंति–हें मासिक म्हणजे च श्रीसमर्थस्मारकमंदिराचा पक्का जमाखर्च होय. तो दरमहाचे दरमहा महाराष्ट्रास सादर होत आहे. त्यावरून हल्लीं मंदिराप्रीत्यर्थ दरमहा हजार बाराशें खर्च होत आहेत, हें सर्वांच्या लक्ष्यांत येईल. पुढील दोन अडीच महिने आम्ही निराळें कार्य योजिलें आहे, त्यामुळें त्या अवधींत मंदिरासाठीं मदत मिळविण्यास आम्हांस बहुधा कोठें जातां येणार नाहीं, अशी भीति वाटते. तरी पुढील अडीच महिने ठिकठिकाणचे स्वयंसेवक व श्रीसमर्थभक्त थोडी जास्त मेहनत घेण्याची कृपा करतील काय ?

धुळें
१८५२ चैत्र शु. ३ शंकर श्रीकृष्ण देव

(१२३)

# चवथ्या दौऱ्याची हकिकत

## अकोला व वाशीम

श्रीशिवछत्रपतींच्या त्रिशतसांवत्सरिक महोत्सवाचे तीन दिवस ता. १५ १६, १७ मार्च १९३० (फाल्गुन व. १, २, ३) अकोल्यास व नतरचे दोन दिवस ता. १८ व १९ वाशीम येथें श्रीसमर्थमंदिरासाठीं गेलों होतों. अकोल्याचा कार्यक्रम तेथील श्रीसमर्थसेवामंडळाच्या विद्यमानें झाला. महात्मा गांधींचे व्याही श्री. नानाभाई इच्छाराम हे एक फार थोर गृहस्थ अकोल्यास राहतात. सर्व सार्वजनिक कामें आपलीं च समजून, पण तसा यत्किंचित् हि आविर्भाव न दाखवितां, तीं करीत राहणें हें त्यांच्या घराण्याचें ब्रीद दिसतें. त्यांचें घर, घरांतील सर्व सामान, गडीमाणसें या सर्वांचा सार्वजनिक कामांत घरच्या सारखा उपयोग करण्याचा हक्क अकोल्याच्या प्रत्येक माणसास आहे कीं काय, न कळे. नानाभाईंच्या घराच्या आवारांत पहिल्या दिवशीं, घराला लागून असलेल्या त्यांच्या च धर्मभुवनांत दुसऱ्या दिवशीं व त्यांच्या घरासमोरील टिळकचौकांत तिसऱ्या दिवशीं त्यांच्या सहाय्यानें प्रवचनांचा वगैरे संपूर्ण कार्यक्रम झाला. मंडळाचे मंत्री श्री. रा. रा. गद्रे यांच्या दक्षतेमुळें तिन्ही दिवसाचे कार्यक्रम वेळेवर करण्यात आले. तिन्ही दिवस गांवांतील सर्व प्रमुख मंडळी हजर होती. याशिवाय दुसऱ्या दिवशीं वीर वामनराव यांच्या अध्यक्षतेखालीं, राष्ट्रापुढें चालू घटकेला जो राष्ट्रीय कार्यक्रम आहे, त्याचा विचार करण्यासाठीं निराळी सभा भरली होती. त्या हि सभेंत अध्यक्षांच्या आज्ञेवरून बोलावें लागलें. चालू राष्ट्रीय लढ्याचें स्वरूप काय आहे तें सांगून त्यात प्रत्येकाला कसा भाग घेतां येईल, त्यांत प्रत्येकाचें च कसें काम आहे, माझा काय उपयोग म्हणून कोणी च हताश होण्याचें कसें कारण नाहीं, कोणी च निरुपयोगी कसा नाहीं, प्रत्येकानें आपआपला भार कसा उचलावा व असें केल्यानें या लढ्यात अखेरीस यश आल्यावांचून कसें गत्यन्तर नाहीं, याचें विवेचन करण्यांत आलें.

अकोल्यास झालेली मदत पुष्कळ झाली असें मला वाटलें, पण ती थोडी आहे, असें रा. ब. दादासाहेब महाजनि यांचें मत पडलें, त्यावरून मिळालेली रकम हा मदतीचा पहिला हप्ता समजावा, असें सर्व प्रमुख मंडळींनीं आश्वासन दिलें.

अकोल्यास योडेंसें संशोधनकार्य हि अनपेक्षित रीतीनें घडलें. महाड तालुक्यांतील नातें गांवचे कांहीं कागद अकोल्यास श्री. दादासाहेब गुर्ते यांचेपाशीं होते, ते अनायासें पहावयास व नकला करून घेण्यास मिळाले. त्यांचा प्रपंच आपण अन्य प्रसंगीं करूं.

अकोल्यास गेल्यावर वाशीमच्या प्रमुख मंडळीवर असलेल्या सार्वजनिक संकटाची वार्ता कळली, त्यामुळें वाशीमचा कार्यक्रम तहकूब ठेवावा, असा विचार मनांत येऊन तसें त्यांना कळविलें. पण त्यांचे कडून उत्तर आलें कीं, सुमारें अडीच वर्षे संकटाची तलवार मस्तकावर लटकत असल्यामुळें "त्याबद्दल *मनाला लागणारी रुखरुख अगदीं नाहींशी झाली आहे*....परमेश्वरावर भार टाकून स्वस्थ बसलों आहोंत. एवढ्या कालावधींत आम्ही काय बंद ठेवलें आहे? सर्व जणांचे पोटाचे उद्योग सुरूच आहेत....लग्नें आहेत, कार्यें आहेत. कोणची हि गोष्ट अडून राहिलेली नाहीं....सार्वजनिक कार्य देखील या संकटामुळें अडकून राहिलेलें नाहीं. उत्सव होतात, व्याख्यानें होतात. प्रत्येक गोष्ट कमीजास्त प्रमाणानें चालू आहे च. मग आपल्या च प्रवचनाचा कार्यक्रम कां थांबावा ! ... " थोराचे विचार थोर च असणार. वाशिमास गेलों. साने, परांजपे, खेडेकर, गोखले, यांपैकीं कोणाचा हि पूर्व परिचय नसतां, जणूं काय, कैक वर्षांची मैत्री आहे, असें त्या सर्वांनीं मजला वागविलें व मी हि घरच्या सारखा वागलों.

गांवांत लग्नांचा धुमधडाका चालू होता, तो प्रवचनांच्या कार्यक्रमाला किंचित नडला असावा. प्रत्येक घरीं च लग्न होतें कीं काय, कोण जाणे ! सारडाकायद्यानें पुढें काय समाजाचें हित अहित *व्हावयाचें असेल तें एका परमेश्वरास ठाऊक, पण आज मितीस मात्र जन्माला* आलेलें कोणतें हि मूल लग्नावांचून क्वचित् च राहिलें असेल कीं काय, न कळे. फार काय, पण कांहीं ठिकाणीं आईच्या पोटांत असलेल्या हि मुलांचीं लग्नें होत आहेत, असें म्हणतात ! बारा दिवसांची मुलगी चोवीस दिवसांचा मुलगा, बावीस दिवसांची मुलगी आणि छत्तीस दिवसाचा -मुलगा, अशाचीं लग्नें होत आहेत ! लोकांच्या अज्ञानाला हंसावें, कां पुढाऱ्यांवर रागवावें, कां कायद्याला दूषण द्यावें, कांहीं कळत नाहीं. कायदा नव्हता तेव्हां असलीं हास्यास्पद मूर्खासारखीं लग्नें किंवा लग्नांची ही चेष्टा होत नव्हती. हा कायदा झाला म्हणून हीं लग्नें झालीं. जी स्थिति वाशिमची ती

च गांवोगांवची. पहिल्या एप्रिलच्या आंत जेवढे जन्माला येतील तेवढ्या सर्वांचीं लग्नें झालेलीं असणार. ज्या जातींत पुनर्विवाह होत नाहीं अशा हि काहीं जातींत असलीं लग्नें होत आहेत व उद्वेगजनक प्रसंग येत आहेत. वाशिमास च, ऐकतात, अशा जातींतील एका दीड वर्षाच्या मुलीचें चार वर्षांच्या मुलाशीं लग्न झालें, थोडे च दिवसात तो मुलगा देवी येऊन मेला व आईच्या अंगावर पिणारी ती दीड वर्षाची मुलगी विधवा झाली ! अशीं लक्षावधी उदाहरणें सारडासाहेबाना नजर केलीं पाहिजेत. पुढच्या च वर्षी खानेसुमारी आहे, तिचें काम वाढणार आहे. पूर्वी झालेल्या खानेसुमारींत कोणी विचारलें नसेल पण येत्या खानेसुमारींत प्रत्येक मुलीचें लग्न झालें आहे का नाहीं हें विचारावें लागेल व विधवा या सदरात वर्षा दिड वर्षांच्या मुलींचीं नावें नोंदावीं लागतील ! पंडित मदन मोहन मालवीय यांची बारा वर्षांची सूचना ऐकण्याची बुद्धि विजयाच्या भरांत सारडासाहेबाना झाली असती तर बरें झालें असतें. चवदा वर्षांच्या मर्यादेनें लोक जास्त भयभीत झाले. त्यापेक्षा बारा वर्षांची मर्यादा सर्वांनीं विचार करून मान्य केली असती तर लोक इतके भेदरून जाऊन अविचाराला प्रवृत्त न होते, असें आम्हास वाटतें. वाशिमला कानावर आलेल्या गोष्टी ऐकून हे विचार मनात आले.

वाशीम येथें हि थोडेसें संशोधन झालें. मेहेकर येथें जसें बालाजीचें एक प्रचंड मंदिर आहे तसें तें येथें हि एक आहे. दोन्ही ठिकाणच्या मूर्ति अत्यन्त मनोहर आहेत. मेहेकरची मूर्ति जास्त मोठी आहे. दोन्ही मूर्ति पाहून चाफळच्या श्रीरामाची आठवण होते. वाशीम येथें मंदिराचें बाहेरचे बाजूस एक शिळा उभी आहे. तीवर अक्षरें कोरलेलीं आहेत, तीं हवापाणी लागून अस्पष्ट झालीं आहेत, तरी त्यातील पुढील महत्त्वाचीं अक्षरें वाचता येतातः–"....छ ११ रजब सके १७०० श्रावन शुध १३ त्रयोदसि नारायन मुऱ्हार राजनकर महाजन पेठ मजकूर...."

गावच्या हिंदुपुढाऱ्यांवर आलेल्या संकटाचें श्रीसमर्थांच्या कृपेनें निवारण होवो, अशी प्रार्थना आहे.



( १२४ )

# फाटकांचे स्नेही ब्राह्मणपत्रिकाकार

कोणाला सांगितलें तर ऐकून हंसू येईल, असें निमित्त होऊन, तीन वर्षें झालीं, इस्लामपूरच्या ब्राह्मणपत्रिकेचा श्रीरामदासी मासिकावर रोष झाला. त्या पत्रिकेंत चालू श्रीसमर्थविषयक वादासंबंधानें संपादकांनीं लेख लिहिला आहे, असें एका मित्रानें सांगतां च आम्हांस शंका आली. पत्रिकेचे संपादक अतिमानुष नव्हत, तेव्हां सामान्य माणसाच्या स्वभावाप्रमाणें च त्यांचे हातून वर्तन घडलें असावें, असें मनांत आलें. लेख वाचावयास मिळाला आणि आम्हांस वाटलेली भीति खरी ठरली. आधीं च पत्रिकाकारांची रामदासी मासिकावर गैरमर्जी झालेली, तद्यांत 'ताज्या रक्ताचे' व 'अगदीं तरुण व रामदासी वाङ्मयसमुद्रांत अट्टाहासानें पोहणारे नवशिके पण मोठे धाडसी गडी' रा. नरहर रघुनाथ फाटक बी. ए. यांच्या विषयीं पत्रिकाकारांच्या ठिकाणीं वसत असलेला स्नेहभाव, या दुहेरी कारणामुळें पत्रिकाकारांच्या हातून निराळा न्याय होणें शक्य झालें नाहीं.

पत्रिकाकारांनीं हा एवढा मोठा सोळा रकान्यांचा लेख कां लिहिला, हें समजणें जरा कठीण च आहे. 'रामदासासंबंधींचा वाद' हा त्यांच्या लेखाचा मथळा आहे, पण वादाच्या प्रत्यक्ष गुणदोषांविषयीं (Merits) त्यांत, चकार शब्द हि नाहीं. त्यांना 'देवांची बाजू पुष्कळ अंशीं बरोबर वाटते,' रामदासांचा तत्कालीन राजकारणाशीं संबंध नव्हता, किंवा ते केवळ भक्तिमार्गी होते, हें फाटकांचें मत त्यांना मान्य नाहीं, पण देवावर रोष आणि स्नेहभावामुळें रा. फाटकांकडे ओढा असल्यामुळें, काय करावें, असा पत्रिकाकारांना पेंच पडला. त्यांतून सुटण्याला त्यांनीं एक मोठी नामी युक्ति योजिली. वादविषयक मुद्यासंबंधानें रा. फाटकांचें तोंड बंद झालें आहे व पत्रिकाकारांचें अजून उघडावयाचें आहे, परंतु तूर्त उभयतांना फक्त देवांची पूजा करावयाची आहे. पत्रिकाकारांजवळ पुरेशी पूजासामुग्री दिसत नाहीं. तेव्हां फाटकांनीं, वाटतें, त्यांना एक पत्र पाठविलें होतें, तें च देऊन फाटकांच्या हातानें पत्रिकाकारांनीं आमची संभावना केली आहे, ती अशी :

"हा वाद आपल्या माझ्यामध्यें नाहीं. हा वाद अट्टल धिवराळ देवांशीं गुंपला आहे आणि त्यांनीं वादाच्या सभ्य मर्यादा सोडल्या आहेत,

असें आपणांस नाहीं कां वाटत ? रामदासांच्या शब्दांनीं प्रतिपक्षाचे आईबाप उद्धारावयाचे, लुच्च्या, लफंगा, अप्रामाणिक, उथळ, असल्या शब्दांनीं संभावना करावयाची, एखाद्या काल्पनिक ब्राह्मणेतराच्या तोंडचा म्हणून प्रतिपक्षांवर तो अस्सल ब्राह्मण नसावा, असें स्पष्ट सुचविण्यापर्यंत रामदासभक्तीच्या जळफळाटाची आग पाखडावी, असा अनुभव आल्यास ' इंद्रायस्वाहा तक्षकायस्वाहा ' या न्यायानें ज्याच्याबद्दल हा वाद त्या पुरुषाच्या चारित्र्याला कमीपणा आणणारी त्याच्या अस्सल संप्रदायपरंपरेतल्या लेखकांनीं लिहिलेल्या व आतांच्या पदवीधर वकील प्रोफ वयाच्या कसलेल्या संशोधकानीं चालाणलेल्या चरित्रातील माहिती दिल्यास कोणास राग येण्याचें खरोखर कारण नाहीं. "

रा. फाटक हे पत्रिकाकारांचे स्नेही आणि आह्मी त्यांच्या स्नेहाला अंतरलेले, तेव्हां फाटकांचें वरील ह्मणणें शब्दशः खरें मानून पत्रिकाकार आह्मास दोष देतात कीं, " दुर्दैवानें देवाकडून प्रथम आगळिक घडतां च अनेकांनीं या संधीचा फायदा घेऊन वादाची मूळ भूमिका झाकून टाकण्याइतके अनेक अनुषंगिक मुद्दे उपस्थित करून त्यास अतिशय घाणेरडें स्वरूप आणलें व निस्पृहपणें बोलावयाचें झाल्यास याबद्दलची जबाबदारी रा. देव याजवर च येते असें ह्मणणें भाग आहे. "

वर दिलेल्या रा. फाटकांच्या पत्रांतील उताऱ्यांत त्यानीं आह्मावर केलेले इतर सर्व आरोप आह्मांस कबूल नाहींत. फक्त, राजकारण ह्मणजे चातुर्य असा अर्थ करतांना नडणारीं ठिकाणें मुद्दाम अप्रामाणिकपणें टाळून रा. फाटकानीं कसें पाप केलें, तें आम्ही प्रमाणानिशीं दाखविलें असता व त्याला फाटकां-जवळ उत्तर नसता, ती मात्र आमची आगळिक कशी होते व त्यामुळें चिडून जाऊन श्रीसमर्थांवर च उलटण्याचा रा. फाटकाना कसा अधिकार प्राप्त होतो, हें रा. फाटक किंवा त्याचा कैवार घेऊन पुढें आलेले त्याचे स्नेही पत्रिकाकार हे च जाणोत ! हा वाद चालू असता पत्रिकाकारानीं तिकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं, निदान श्री रामदासी मासिकांतले लेख त्यानीं वाचले असावेत, असें दिसत नाहीं. तसें त्यानीं केलें असतें तर फाटकाचें वरील पत्र येता च त्यांनीं आपल्या अधिकारात आपल्या तरुण आणि धाडसी पण अप्रामाणिक आणि अविचारी स्नेह्याचे दोन्ही कान उपटून त्याच्या हातांत दिले असते व एक कान उपटताना त्यास म्हटलें असतें कीं, ( १ ) लवाद, प्रथम जुलै १९२९ च्या

विविधज्ञानविस्तारांत तूं श्रीसमर्थांच्या चारित्र्यावर हल्ला चढविलास म्हणून नंतर आगष्ट १९२९ च्या रामदासी मासिकांत तूं मानतोस त्याप्रमाणें, वस्तुतः तसें खरें नाहीं, एकाद्या काल्पनिक ब्राह्मणेतराच्या तोंडचा ,म्हणून प्रतिपक्षांवर तो अस्सल ब्राह्मण नव्हता, असें सुचविण्यापर्यंत देवांनीं रामदासभक्तीच्या जळफळाटाची आग पाखडली, असा खरा कार्यकारण संबंध असतां, देवांनीं तशी आग पाखडली म्हणून आपण ' इंद्राय स्वाहा तक्षकाय स्वाहा ' या न्यायानें समर्थांवर हि तुटून पडलों, असा कार्यकारणाचा व कालक्रमाचा विपर्यास करून मजशीं प्रतारणा करतोस ! आणि दुसरा कान उपटतांना म्हटलें असतें कीं, ( २ ) मूर्खा, देवांचे अपराध कांहीं हि असले तरी त्यांनीं अपराध केले, सभ्यता गुंडाळून ठेवली, तुला शिव्या दिल्या, म्हणून तूं त्यांच्या अपराधांबद्दल ' इंद्राय स्वाहा तक्षकाय स्वाहा ' या न्यायानें श्रीसमर्थांवर हि दुगाण्या झाडण्यास तयार झालास या तुझ्या शहाणपणाला काय म्हणावे ?

पण, पत्रिकाकारांचें मित्रप्रेम दांडगें म्हणा, किंवा आमच्या विषयीं आदी विशेष बळकट म्हणा, त्यांनीं फाटकांना दोष न देतां, निस्पृहपणाचा आव आणून फाटकांच्या घाणेरड्या लेखांची हि जबाबदारी आम्हां-वर च टाकली !

स्वतः फाटक च कबूल करतात कीं, देवांच्या वर्तनामुळें इंद्राय स्वाहा तक्षकाय स्वाहा या न्यायाला अनुसरून देवांच्या बरोबर श्रीसमर्थांवर हि आपण हत्यार धरलें, तरी पण पत्रिकाकार ठांसून ग्वाही देतात च कीं, फाटकांचा तो ( घाणेरडा ) लेख काळजीपूर्वक वाचून पाहिला तर रामदासांची किंमत ठरविण्याचा किंवा स्वतःचें मत रामदासाविषयीं कलुषित करून घेऊन तें व्यक्त करण्याचा रा. फाटकांचा हेतु आहे, असें बिलकूल दिसणार नाहीं ! याचें नांव सन्मित्रलक्षण !

रा. फाटकांनीं उपस्थित केलेल्या या वादाकडे आम्ही अजिबात दुर्लक्ष करावयास पाहिजे होतें, असा पत्रिकाकारांनीं अभिप्राय व्यक्त केला आहे. त्यांचें ह्मणणें " अशा बाबतींत प्रतिपक्षाकडे दुर्लक्ष करून आपलें विधायक कार्य चालू ठेवण्यानें च रा. देवांचे हेतु अधिक सफळ होऊं शकले असते व फाटकांनीं उपस्थित केलेली वादाची वावटळ कालाच्या ओघांत आपोआप निमाली असती किंवा तज्ज्ञांनीं तिचा यथोचित मार्गानें उपशम केला असता,

परंतु देवांच्या प्रस्तुतच्या अना (?) वधानतेमुळें ' ए गुड केस स्पॉइल्ड बाय बॅड ॲडव्होकसी ' ह्या इंग्रजी म्हणीनुसार प्रस्तुत वादाची स्थिति झाली आहे. " अरेरे, केवढी आमच्या हातून चुकी झाली ! काय करावें *A good case has been spoiled by our bad advocacy* ! आतां पत्रिकाकारांसारख्या तज्ज्ञांना आमचा बिघडलेला सत्पक्ष सावरण्याला कोण श्रम पडणार आहेत ! आह्मांस काय ठाऊक पत्रिकाकार हे फाटकांना उत्तर देण्याला अगदीं टपून बसले होते ! पत्रिकाकार म्हणतात " रा. फाटकांनीं जेव्हां आपली लेखमाला सुरू केली तेव्हांच त्यास आम्ही कळविलें कीं, तुम्ही आपला पूर्वपक्ष संपूर्ण रीतीनें स्वतंत्र पुस्तकरूपानें छापून काढा म्हणजे उत्तरपक्ष करण्यास आमचे मित्र व आम्ही तयार आहों. त्यांनीं तसें कबूल हि केलें पण दरम्यान रा. देवांनीं चिडून रामदासी मासिकांतून अप्रस्तुत व अशिष्ट अशी वैयक्तिक टीका केल्यामुळें त्यांचें हि ( म्हणजे फाटकांचें हि ) ताजें रक्त उसळलें " आणि सर्व घाण झाली ! आतां काय करावें ! आमच्या हातून चुकी होऊन गेली ! आम्हांस आणि आमच्या प्रमाणें जगास हि काय ठाऊक कीं, रा. फाटक आणि रा. पत्रिकाकार या दोघां स्नेह्यांमध्यें करारमदार झाला होता कीं, प्रथम फाटकांनीं आपला संपूर्ण पूर्वपक्ष विविधज्ञानविस्तारांत करावा, नंतर तो स्वतंत्र पुस्तकरूपानें छापून काढावा, तोंवर फाटकांच्या निंदाप्रचुर लेखणीला खुशाल नाचूं द्यावें आणि मग सावकाश पत्रिकाकार आणि त्यांचे मित्र उत्तर-पक्ष करण्यास पुढें सरसावून फाटकांच्या पूर्वपक्षाच्या चिंधड्या उडवणार होते ! या दोघां स्नेह्यांमध्यें झालेल्या सहरहु कराराची किंचित् जरी कुणकुण आम्हांस लागती, तरी आम्ही फाटकांचें पुस्तक बाहेर पडेपर्यंत च काय, जगाच्या अंतापर्यंत हि थांबलों असतों ! पण आम्हांस कांहीं च वार्ता नव्हती कीं, ब्राह्मणपत्रिकाकार व त्यांचे कोणी मित्र फाटकांचे नुसते लेख नाहींत तर त्या लेखांचें स्वतंत्र पुस्तक बाहेर पडण्याची अगदीं चातकाप्रमाणें वाट पहात होते ! आम्हांस वाटलें कीं, इतकी वाट पाहण्याचें कांहीं कारण नाहीं, फाटकांच्या पूर्वपक्षाची आधारभूत कल्पना च इतकी आचरट आहे कीं, तिचा पोलपणा आमच्या सारखा एकादा अतज्ज्ञ माणुस हि सहज दाखवूं शकेल ! आणि या भरंवशावर, श्रीसमर्थांनीं आपल्या वाङ्मयांत वापरलेल्या राजकारण शब्दाचा अर्थ राजकारण नव्हे तर चातुर्य होय, हा फाटकांचा सिद्धान्त कसा भ्रामक आणि असत्य आहे आणि त्याचें प्रतिपादन करतांना हि फाटकांनीं कसे

उपेडाव केले आहेत, हें आम्ही सप्रमाण आणि सविस्तर वाचकांच्या नजरेस आणले आणि फाटकांचा अप्रामाणिकपणा त्यांच्या पदरांत बांधला ! पत्रिका-कारांचा बेत आम्हांस ठाऊक हि नव्हता आणि आमच्या मनांत हि आलें नाहीं कीं, असल्या लहानशा कामासाठीं पत्रिकाकार व त्यांचे मित्र यांना तसदी घ्यावी लागेल. **" ब्राह्मण समाजाला लागलेली स्वार्थत्यागाची व परोपकाराची कीड "** असले महत्वाचे प्रश्न सोडविण्यांत पत्रिकाकार गुंतले असतांना, फाटकांच्या वरील क्षुद्र कल्पनेचें निरसन करण्यासाठीं ब्राह्मणपत्रिकाकार आणि त्यांचे मित्र अशा तज्ञ अधिकारी माणसांना शिणविणें योग्य हि झालें नसतें. आम्हांस वाटलें,

नख न लगे ज्या कार्या त्याला व्हावा कशास करवाल ।

फाटकांची पत्राज ती किती आणि त्यांचा समाचार घेण्याला ब्राह्मणपत्रिकाकारां-पर्यंत कशास जावयास पाहिजे ! असो.

आमच्या टीकेंत अप्रस्तुत व अशिष्ट भाग आला आहे असें आपण ह्मणता तो कोणता हें पत्रिकाकारांना या ठिकाणीं विचारावें,असें आमच्या मनांत आलें होतें, पण त्यांना विचारून कांहीं उपयोग नाहीं, कारण त्यांनीं मुळीं रामदासी मासिकांतले टीकात्मक लेख वाचले च नाहींत, त्यांची सारी भिस्त त्यांचे स्नेही रा. फाटक यांजवर! फाटकांच्या घाणेरड्या लेखांना स्वतंत्र पुस्तकाचा मान मिळाल्यानंतर त्यांना पत्रिकाकार व त्यांचे मित्र उत्तर देणार होते, असें पत्रिकाकार ह्मणतात, ते मित्र कोण ? ते मित्र दुसरे तिसरे कोणी नसून त्यांचे तसे आमचे हि मित्र प्रो. दत्तोपंत पोतदार होत ! काय ह्मणावें प्रो. पोतदारांना ! कां त्यांच्या जीवावर पत्रिकाकार तिकडे उड्या मारीत होते व फाटकांशीं करार करीत होते याची त्यांना हि वार्ता नव्हती ! रा. फाटक यांनीं हा वाद सुरू केल्यानंतर प्रो. पोतदारांची व आमची तीनदां गांठ पडली होती. श्री रामदासी मासिकांत उत्तराला सुरवात होण्यापूर्वी फाटकांच्या पहिल्या लेखाला उत्तर ह्मणून खुद्द प्रो. पोतदार यांच्या च अध्यक्षतेखालीं गेल्या मे महिन्यांत पुणें येथें वसंतव्याख्यानमालेंत फाटकांच्या पूर्वपक्षाची आह्मी हजेरी घेतली, तरी प्रो. पोतदार यांनीं पत्रिकाकार व रा. फाटक यांच्यांत झालेल्या कराराचा आह्मांस सुगावा लागूं दिला नाहीं. दुसऱ्यांदा गेल्या डिसेंबरांत राजवाडेस्मारकमंदिराच्या कोनशिलास्थापनसमारंभाला प्रो. पोतदार खुद्द धुळ्यास आले होते व दोन दिवस सारखे त्यांच्या संगतींत आम्ही होतो, तरी त्यांनीं

कोठें आम्हांस त्या कराराची माहिती लागूं दिली नाहीं. तिसऱ्यांदा पुन्हां पुण्यास नुकतीच त्यांची गांठ पडली होती इतकेंच नव्हे, तर श्रीसमर्थविषयक आमच्या एका व्याख्यानाचे प्रसंगीं ते अध्यक्ष हि होते, तेव्हां हि कांहीं त्या करारविषयीं ते आम्हांपाशीं बोलले नाहींत! आणि आतां पत्रिकाकार शृणुत रे रामदासभक्ताः म्हणून दवंडी पिटवित आहेत कीं, " नितांत बुद्धिवादाच्या भूमिकेवर आरूढ होऊन रामदासांचें वैशिष्ट्य सिद्ध करतां येण्याजोगें आहे व रा. फाटकांचा पूर्वपक्ष संपूर्ण स्वरूपांत पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाल्यानंतर आमचे मित्र प्रो. पोतदार तें कार्य करणार आहेत, सवडीनुसार आम्ही त्यास हातभार लावूं तोंपर्यंत रामदासभक्तांनीं दम धरावा, नाहीं तर नीट अभ्यास करून फाटकांच्या पूर्वपक्षाचें खण्डण करावें. " लोकांना दम धरण्यास सांगणारी पत्रिकाकाराची ही दवंडी फार उशिरा पिटली जात आहे. पत्रिकाकारांच्या इतका दम लोकांना निघेना, त्यांनीं केव्हां च फाटकांच्या पूर्वपक्षाची वासलात लावून टाकली. आम्हांस हें प्रथम कांहीं च समजेना कीं, पत्रिकाकार फाटकांना इतकी सवड कां देत आहेत व पुस्तक छापून काढा, पुस्तक छापून काढा, असा तीनतीनदां पोरकट आग्रह कां करीत आहेत. त्यांतलें इंगित इतकें च दिसतें, कीं दुसऱ्यास नीट अभ्यास करण्यास सांगणारे पत्रिकाकार यांना च अजून अभ्यास करावयाचा आहे! तेव्हां आतां आम्हांस पत्रिकाकारांना एवढें च नम्रपणें कळवावयाचें शिल्लक राहिलें आहे कीं, आपण सवड काढण्याचें किंवा फाटकांच्या पुस्तकाची वाट पाहण्याचें किंवा आतां इतक्या उशीरा अभ्यासास लागण्याचें कांहीं कारण उरलें नाहीं, कारण रा. फाटकांचा पूर्वपक्ष च आतां ठिकाणावर राहिलेला नाहीं.

फाटकांना वाटेल तसा नंगा नाच घालूं देण्याला, श्रीसमर्थांची अनन्वित निंदा करूं देण्याला आणि ती स्वत. निर्विकारपणें ऐकण्याला व लोकांना दम धरण्यास सांगण्याला पत्रिकाकारांच्या ठिकाणीं इतकी शांती कोठून आली, याचें आम्हांस एरव्हीं मोठें कोडें पडलें असतें, पण त्याचा उलगडा पत्रिकाकारांच्या कांहीं विक्षिप्त मतावरून चांगला होत आहे. ब्राह्मणपत्रिकेच्या संपादकाचीं मतें ऐका : ते म्हणतात " आम्हास असें वाटतें कीं इतःपर राष्ट्रीय उन्नतीच्या दृष्टीनें या वादाला फारसें महत्त्व देण्याचें कारण उरलें नाहीं. भक्तिमार्ग किंवा धर्मभावना आणि राष्ट्रीयत्वाची भावना यांचें हिंदु अथवा महाराष्ट्रीय संस्कृतीच्या प्रगतीच्या दृष्टीनें व्हावयाचें तें कार्य होऊन गेलेलें

आहे. भौतिकशास्त्रांच्या प्रगतीमुळें सध्या सस्कृत गणलेल्या जगांतल्या मानवी सस्कृतीस एक निराळें च वळण लागून राहिलें आहे व त्याचे सस्कार हिंदुसस्कृतीवर हि एकसारखे होत आहेत. ह्या सस्कारामुळें राष्ट्रोन्नतीस उपकारक किंवा सहाय्यभूत होणान्या नव्या कल्पना व तज्जन्य नवीन शक्ति निर्माण होत आहेत व भावी विल्याच्या हालचाली त्याच्या च प्रेरणेनें घडून यावयाच्या आहेत. अशा स्थितींत उपरोक्त गलितसामर्थ्य झालेल्या ( Spent up force ) कल्पना व भावना आणि त्याचे प्रणेते यास ऐतिहासिक किंवा आदरणीय वस्तु इतकें च महत्व उरल्यानें त्यासबधीं विशेष काथ्याकूट करीत बसण्यात काहीं च हशील नाहीं ..... रामदासी काय किंवा वारकरी काय, दोन्ही सांप्रदायाचें पुष्कळ दिवसा-पासून अध.पतन झालेलें आहे......हे सांप्रदाय उन्नतावस्थेत येण्याची आशा करण्यांत अर्थ नाहीं, तेव्हा ते अजिबात मोडून टाकणें च मानवी उन्नतीच्या दृष्टीनें अधिक श्रेयस्कर आहे, असें आह्मास वाटतें.'' ब्राह्मणपत्रिका आमच्या वाचण्यात येत नसते, ह्मणून विचारतों, पत्रिकेचे सपादकमहाशय ब्राह्मणपत्रिका भौतिक शास्त्राच्या प्रसारासाठीं चालवीत असतात कीं काय !

पत्रिकाकारानीं आणखी दोन मोठीं विचित्र विधानें केलीं आहेत, त्यातलें एक गमतीदार आहे व दुसरें भयकर आहे. पत्रिकाकार लिहितात "देवानीं वैय-क्तिक टीका केल्यामुळें फाटकाचें हि ताजें रक्त उसळलें व प्रारभीं रा. देवाविषयीं, त्यानीं रामदासी सशोधनाचें कार्य केल्यामुळें, त्याच्या मनात जो आदर होता व जो त्यानीं आमचेजवळ व्यक्त हि केला होता, तो नष्ट होऊन त्यानीं त्याच्या सशोधनकार्यांतील गबाळपणा बाहेर काढण्यासाठीं त्यानीं प्रसिद्ध केलेल्या ग्रन्थातून रामदासाच्या चारि यावर चितोडे उडविणारे उतारे छापून टाकले !" पत्रिकाकाराना इग्रजी म्हणी आवडतात असें दिसतें, तेव्हा हें पत्रिकाकाराचें विचित्र विधान पाहून त्याचे स्नेही रा. फाटक यानीं खुशाल म्हणावें कीं, Save me from my friends ! फाटकाना देवाविषयीं एकदा असलेल्या खऱ्या किंवा खोट्या आदराला आणि आता वाटत असलेल्या अनादराला देव काडीची हि किंमत देत नाहींत हें वेगळें, पण सशोधनकार्य तें च, त्या च कार्यामुळें त्याना एकवार आदर वाटला,पण स्वत.वर च टीका झाली म्हणून तें च कार्य त्याना गबाळ वाटू लागलें, यात पत्रिकाकार फाटकाची स्तुति करीत आहेत का फाटकाचें वैगुण्य दाखवीत आहेत, हें पत्रिकाकार आणि फाटक यानीं आपसात ठरवावें.

फाटकांसारख्यांच्या लिखाणांचा आधार घेऊन कांहीं ब्राह्मणेतर लेखक रामदासांची निंदा करतात, हें पाहून पत्रिकाकारांना ब्राह्मणेतर लेखकांचा राग आलेला दिसतो. त्या रागाचा थोडासा भाग फाटकांच्या च वांट्याला त्यांनीं दिला असता तर बरें होतें. जेथें फाटकांसारखे ब्राह्मण च निंदा करण्यास प्रवृत्त होतात, तेथें इतरांना फावावें, यांत काय आश्चर्य आहे ? या रागाच्या भरांत पत्रिकाकारांनीं जें पुढें एक विधान केलें आहे, तें मात्र भयंकर आहे. ते म्हणतात, " रामदासाचे बाबतींत राजवाड्यांचीं मतें खोडून काढण्याचा जसा प्रयत्न केला जातो तसा शिवाजींचे बाबतींत हि करतां येण्याजोगा आहे, नाहीं असें नाहीं. परन्तु तसें अद्याप कोणा हि ब्राह्मणानें केलेलें नाहीं. " पत्रिकाकारांची श्रीशिवाजीमहाराजांविषयीं खरोखर च कां अशी भावना आहे ? तशी ती असल्यास ती भयंकर आहे ! तिची आम्हांस कल्पना हि करवत नाहीं ! अयोध्याधीश रामचंद्राची जी योग्यता ती च छत्रपति श्रीशिवरायाची होय, असें आम्ही समजतों. श्रीसमर्थांची निंदा करण्याचें कोणी पाप केलें म्हणून श्रीशिछत्रपति ...संपलें आमचें लिहिणें, जास्त लिहवत हि नाहीं.

पत्रिकाकारांनीं अशा आणखी हि पुष्कळ गमती केल्या आहेत, पण जागा संपली म्हणून पत्रिकाकारांना सोडून देतों. पत्रिकाकारांची मतें आहेत आमच्यासारखीं, पण फाटक स्नेही पडले म्हणून त्यांचा कैवार घेऊन त्यांनीं आमच्यावर च उलट टीकास्त्र उगारलें, ही काय थोडी गमत आहे.

१८५२ चैत्र शु. ५

---

## श्रीसमर्थांचें राजकारण

[ १२५ ]

श्रीराम

# श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारादिकार्यांचा जमाखर्च वगैरे

## १८५२ चैत्र शु. ३ ( ता. २।४।३० ) पासून वैशाख शु. ३ ( ता. १५।५।३० ) पर्यंत

| जमा | खर्च |
|---|---|
| ११-०-० प्रो. विश्वनाथ बळवंत नाईक, पुणें | ५२६-१०-३ स्थापत्यविशारद श्री. वासुदेवराव गोगटे यांच्या खातीं नावें. |
| ३-०-० श्री. रंगोपंत जोशी, पुणें | १ ता. ३।४।३० |
| १०-०-० V. N. Kalyanpur, Banglore, यांचेकडून प्रिय व सद्गुणी पुत्र रामदास यांच्या स्मरणार्थ तिसरा हप्ता ता. ८।४।३० | २ ता. १२।४।३० |
| | ५१८१ ता. १७।४।३० |
| | २८८८३ ता. २१।४।३० |
| | ४०० ता. २५।४।३० |
| २-८-० श्री. ना. पा. नवरे, मुंबई यांचे मार्फत | ७०८१ ता. २५।४।३० |
| १८४ दत्तात्रय विनायक उर्फ दादासाहेब खेर, मुंबई | ८२-११-६ सामानखरेदी |
| १८४ ' भाऊ बीज ' | १७-१२-० छापणावळ |
| | ०-१०-० मुद्रणाची पत्रीः |
| | ०-१० ० सदर पाठविण्यास खर्च |
| १०-०-० श्री. विठ्ठल रघुनाथ भागवत, आनंदकार्यालय, पुणें, मार्फत | २- ०-० सात चेक वटविण्यासाठीं बँकेचें कमिशन |
| ५ श्री. गोपाळ बळवंत जोशी | ३- १-६ टपालखर्च |
| २ श्रीसमर्थकृपा | |
| ३ आनंद छापखाना कामगार मंडळी | ६३३- ७ ३ एकूण खर्च |

८-४-० श्री. रामचंद्र धोंडो दास्ताने, पुणें, यांचे मार्फत,

७ बाळकृष्ण भिकाजी गोंगले, यशवंत बळवंत खेडकर, भा. वि. धारपुरे, सदाशिव धोंडो दास्ताने, डी. सी. पांडे, भगवान सावळाराम गोडाड व कृष्णाजी रामचंद्र नगरकर, प्रत्येकीं १ रु.

१८६ किरकोळ, पैकीं ८२ म आ. खर्च वजा जाता

५६-९-० श्री. वासुदेव वामन खाडीलकर, पुणें यांचे मार्फत

१५ नगरकर ( जोशी ), श्रीमती दुर्गाबाई मिधये, अनंतराव मोघे, प्र. ५

८ कृ. गो. पुंडलीक, ज. गो. पुंडलीक, गोपाळराव माटे, शंकर गोविंद गोखले, प्र. २

१०४ गो. द. जोशी

२४ लक्ष्मण शिवराम कुलकर्णी, शंकरराव नेने, तांबे गायन मास्तर, जी. एन् दीक्षित, S. S. Kulkarni, बाबुराव गद्रे, B. M. Nerlekar, L. R. Godbole, C. L. Dandekar, M. Walimbe, S. D. Bhatavadeker, V. G. Lele, J. E. Kshirsagar, B. V. Shandilya, T. N. Deshpande, D. V. Damle, D. K. Godbole, R. K. Deshpande, V. V. Khadilkar, S. A. Kale, K. B. Gokhale, Mamasaheb Chhatre, Appasaheb Walimbe, Mrs. Sahasrabudhe, प्रत्येकी एक

८०५ तिरकोळ

१ -०- ० विष्णु विनायक परांजपे शास्त्री

१ -०- ० श्रीसमर्थकृपा

१०३- ५- ० एकूण नवीन जमा

५४३६- ०-११ मागील शिल्लक

५५३९- ५-११ एकूण जमा

६३३- ७- ३ एकूण खर्च वजा

४९०५-१४- ८ एकूण शिल्लक, पैकीं

१०५०- ७-२ धुळ्याचे पोस्टल बँकेंत

५००- ०-० चाफळ सोसायटींत ठेव

३१७२- ४-० सत्कार्योत्तेजक सभेकडे ठेव

१८३- ३-६ चिटणीसाजवळ वरती

४९०५-१४-८

## आजपर्यंत एकंदर रोख जमा रुपये २४९३६-७-८

टीपः—ता. १३-३-३० रोजी चाफळ-टॅंजन पोटांतून १०५ रुपये इन्शुअरनें आले, त्यांचा अजून उलगडा झाला नाहीं. ती रक्कम अनामत आहे.

धुळें
१८५२ वैशाख शु. ३

शंकर श्रीकृष्ण देव

( १२६ )

# भरतखंडाच्या धार्मिक संप्रदायांत श्रीसमर्थसंप्रदायाचें स्थान

( लेखकः–मा. मा. भट )

सातव्या शतकाच्या सुमारास आद्य शंकराचार्यांनी बौद्धधर्माचा पाडाव करून श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माची व वेदान्ततत्त्वज्ञानाची सर्व भरतखंडभर पुन्हां स्थापना केली त्या नंतर अडीचशें, तीनशें वर्षांपावेतों श्रुतिस्मृतिप्रणीत धर्मास अनुसरून भरतखंडातील निरनिराळ्या वर्णांचे लोक आचरण करूं लागले. हें धार्मिक स्थित्यंतर ज्या भारतीय जनतेंत घडून आलें, त्यांपैकीं ब्राह्मणादि त्रैवर्णिकांखेरीज इतर बहुसंख्य लोकांस तें मानवणें दुर्घट झालें. यामुळें अकराव्या शतकापासून सर्व भरतखंडभर एक नूतन धार्मिक स्थित्यंतर उदयास येऊं लागून सोळाव्या शतकाच्या अखेरपावेतों तें पूर्णत्वास पावलें.

आद्य शंकराचार्यांनीं श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माची पुन स्थापना करून भरतखंडांत जें धार्मिक स्थित्यंतर घडवून आणिलें, तें बहुसंख्य लोकांस मानवणें कोणत्या कारणानें दुर्घट झालें, याचें दिग्दर्शन प्रथम करणें जरूर आहे. ज्या श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माची आद्य शंकराचार्यांनीं भरतखंडात पुन स्थापना केली, त्या धर्माचें आचारधर्मविषयक त्या च प्रमाणें तत्त्वज्ञानविषयक वाङ्मय संस्कृत भाषेंत आहे. अकराव्या शतकाच्या पूर्वीपासून च या भाषेचा संकोच होऊं लागून भरतखंडातील बहुसंख्य जनतेस ती अवगत होईनाशी झाली होती. संस्कृत भाषा ही भरतखंडात प्रवेश करणाऱ्या आर्य लोकांची भाषा होय. आर्यांचा भरतखंडात प्रवेश झाल्यानंतर त्यांचा प्रसार भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रदेशांत क्रमाक्रमानें होत गेला. त्यांचा प्रवेश भरतखंडात झाला तेव्हां भरतभूच्या निरनिराळ्या प्रदेशात निरनिराळ्या वंशाचे मानवी समाज अस्तित्वात होते.

आर्यांनीं भरतखंडात प्रवेश करून ते तेथें वसाहत करूं लागल्यावर त्यांनीं, तांबड्या इंडियनांचा अमेरिकेंत वसाहत करणाऱ्या इंग्रजांनीं ज्याप्रमाणें संहार केला, तसा भरतखंडातील एतद्देशीय लोकांचा संहार केला नाहीं. आर्य लोक या मानवी समाजाच्या सन्निध वसाहत करून नांदूं लागले. आर्यांपेक्षा

एतद्देशीय लोकांच्या संख्येचें प्रमाण फार अधिक होतें. आर्यांची भाषा व संस्कृति आत्मसात् करण्याची ऐपत एतद्देशीय लोकांच्या ठिकाणीं नव्हती. तथापि आर्यांच्या निकट सहवासांत राहिल्यानें आर्यसंस्कृतीविषयीं त्यांच्या मनांत प्रेम उत्पन्न होऊन ती संस्कृति संपादन करणें हें त्यांचें ध्येय बनलें गेलें.

प्रस्तुत काळीं भरतखंडांत जो मानवी समाज वास्तव्य करीत आहे, त्यापैकीं ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या आर्यवंशीय त्रैवर्णिकांची लोकसंख्या एकंदर लोकसंख्येच्या एक तृतीयांश असून बाकी दोन तृतीयांश लोकसंख्या इतर वंशांच्या लोकांची आहे. प्रस्तुत काळच्या ब्राह्मणादि त्रैवर्णिकांचें इतर लोकांच्या संख्येशीं जें प्रमाण आहे, तें च प्रमाण भरतखंडांत आर्यांनीं जेव्हां प्रवेश केला त्या सुमारास असलें पाहिजे असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. एतद्देशीय लोकांचें संख्याबल इतकें मोठें असल्याकारणानें व आर्यांची संस्कृत भाषा आत्मसात् करणें एतद्देशीय लोकांना दुर्घट जाऊं लागल्या कारणानें संस्कृत भाषेचा संकोच क्रमाक्रमानें होत जाऊन एतद्देशीयांच्या नित्य व्यवहारांत वापरल्या जाणाऱ्या प्राकृत भाषा वृद्धि पावूं लागल्या. खुद्द आर्य लोकांत हि नित्य व्यवहारांत एतद्देशीयांशीं दळणवळण चालू ठेवण्याकरितां प्राकृत भाषा वापरावी लागल्यामुळें संस्कृत भाषेचा संकोच होऊं लागून त्यांच्यापैकीं कित्येकांना ती भाषा अवगत होईनाशी झाली.

भरतखंडांत वर दर्शविल्याप्रमाणें भाषेच्या बाबतींत स्थित्यंतर घडत जाऊन संस्कृत भाषेचा संकोच व प्राकृत भाषांची वृद्धि होऊं लागली. तथापि श्रुतिस्मृतिधर्माचें रूप प्रकट करण्याकरितां फक्त संस्कृत भाषा च वापरावयाची, प्राकृत भाषेचा अवलंब करणें निंद्य मानावयाचें ही धार्मिक वाङ्मयाच्या बाबतींत अस्तित्वांत असलेली पूर्वपरंपरा कोणता हि फेरफार न होतां अकराव्या शतकापावेतों कायम राहिली. यामुळें भरतखंडांतील बहुसंख्याक लोकांच्या धार्मिक आकांक्षा संतुष्ट राहणें दुर्घट झालें. "इतिहासाची पुनरावृत्ति होते" या वाक्प्रचारांत जगाच्या इतिहासाचें निरीक्षण करणारांनीं जो सिद्धान्त ग्रथित केला आहे, त्या सिद्धान्तास अनुसरून गौतमबुद्ध व महावीर यांच्या काळीं भरतखंडांत जो प्रकार घडला, तो च फिरून घडून येण्यास सुरवात झाली. गौतमबुद्ध व महावीर यांनीं भरतखंडांत बौद्ध व जैन संप्रदायांची स्थापना करून त्या संप्रदायांचा सर्व भरतखंडभर जो प्रसार केला तो त्या संप्रदायांचीं तत्वें, संस्कृत भाषेंत ग्रथित न करितां बहुसंख्याक जनतेस अवगत असलेल्या

पाली व अर्धमागधी भाषेत करून केला, ही गोष्ट सर्वश्रुत आहे. अकराव्या शतकाच्या सुमारास वर दर्शविल्या प्रकारची परिस्थिति निर्माण झाल्यामुळे संस्कृत भाषेऐवजीं सर्व जनतेस अवगत होईल अशा प्राकृत भाषांतून श्रुतिस्मृतिप्रणीत धर्मांतील तत्त्वज्ञानविषयक ज्ञान ग्रथित करण्याचा नूतन प्रघात भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रदेशांतून त्या काळच्या धर्मकारणी पुढाऱ्यांनीं सुरूं केला. भरतखंडांत उदयास आलेल्या नूतन धार्मिक स्थित्यंतराच्या बाह्य स्वरूपाच्या दृष्टीनें ज्ञात होणारी ही एक बाब आम्ही नमूद केली आहे. नूतन धार्मिक स्थित्यंतराच्या बाह्य स्वरूपा इतकें च, किंबहुना या हि पेक्षां, त्याच्या अन्तःस्वरूपाचें दिग्दर्शन करणें अधिक महत्त्वाचें आहे. बौद्धधर्माच्या भरभराटीच्या कालांत श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माच्या आचारविषयक भागाचा कडकपणा पूर्णपणें शिथिल झाला होता. या शिवाय सामान्य जनतेस श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माचा आचारविषयक भाग, त्याच्या कडकपणामुळें प्रिय वाटणारा नव्हता. यामुळें श्रुतिस्मृतिप्रणीत धर्मांतील हा आचारविषयक भाग आचरणांत आणण्यासंबंधीं त्या काळच्या धर्मकारणी पुढाऱ्यांनीं फारसा कटाक्ष धरला नाहीं. श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माचें रूप एकाद्या बहुविध पैलू असलेल्या हिऱ्याप्रमाणें आहे. पाहाणाराची जशी रुचि असेल त्या प्रमाणें हिऱ्याचा पैलू पाहाणारास दाखवून हिरा पाहाणाराचें समाधान करतां येतें; त्या च प्रमाणें त्या काळची धार्मिक परिस्थिति लक्षांत घेऊन तत्कालीन जनतेस मानवेल अशा प्रकारें श्रुतिस्मृतिधर्माचें स्वरूप भारतीय जनतेपुढें मांडण्याचा प्रारंभ भारतीय धर्मकारणी पुढाऱ्यांनीं केला. या धर्माच्या स्वरूपाची वाचकांस एकदम कल्पना व्हावी म्हणून त्याचें नांव ' भागवतधर्म ' होय, असें आम्ही चट्कन् सांगून टाकतों.

भागवत धर्माचें थोडक्यांत लक्षण खालील श्लोकांत सांगितलें आहेः—

शौचं तपस्तितिक्षां च मौनं स्वाध्यायमार्जवम् ।
ब्रह्मचर्यमहिंसां च समत्वं द्वंद्वसंज्ञयोः ॥ २४ ॥
सर्वत्रात्मेश्वरान्वीक्षां कैवल्यमनिकेतताम् ।
विविक्तचीरवसनं संतोषं येनकेनचित् ॥ २५ ॥
श्रद्धां भागवते शास्त्रे निन्दामन्यत्र चापि हि ।
मनोवाक्कर्मदण्डं च सत्यं शमदमावपि ॥ २६ ॥
श्रवणं कीर्तनं ध्यानं हरेरद्भुतकर्मणः ।
जन्मकर्मगुणानां च तदर्थेऽखिलचेष्टितम् ॥ २७ ॥

(३) दक्षिण हिंदुस्तानांतील तामीळ प्रांत (४) कर्नाटक, हे होत. कालदृष्ट्या विचार केला असतां या धार्मिक स्थित्यंतरास प्रारंभ प्रथम दक्षिण हिंदुस्थानांतील तामीळ प्रांतांत झाला. अळवार या नांवानें प्रसिद्ध असलेले तामीळ संतकवि व त्याच्या पश्चात् झालेले आचार्य यांनी भागवतधर्माच्या तत्त्वांचा प्रसार तामीळ भाषेंतून तामीळ जनतेंत करण्यास सुरवात केली. या अळवार संतकवींविषयीं महाराष्ट्रीय ज्ञानकोशामध्यें (भाग ८ पान "आ" २८८) खालील प्रमाणें थोडक्यांत माहिती दिलेली आहे:—

आळवार.—वैष्णव संत कवी. दक्षिण हिंदुस्थानांतील वैष्णवसंप्रदायाचे दोन कालविभाग पडतात; एक आळवारांचा व दुसरा आचार्यांचा. 'दैवी प्रेमसागरांत बुडून गेलेले' हे आळवार योगी बारा असून ते निरनिराळ्या जन्मलेले व निरनिराळ्या ठिकाणीं रहाणारे असे होते. वैष्णव ज्याला महत्त्व आलें आहे त्या 'प्रबंधम्' नांवाच्या ग्रंथांत गोविलीं आहेत. परंपरेनें चालत आलेल्या माहितीवरून

इष्टं दत्तं तपो जप्तं वृत्तं यच्चात्मनः प्रियम् ।
दारान्सुतान् गृहान्प्राणान्यत्परस्मै निवेदनम् ॥ २८ ॥
एवं कृष्णात्मनाथेषु मनुष्येषु च सौहृदम् ।
परिचर्यां चोभयत्र महत्सु नृषु साधुषु ॥ २९ ॥
परस्परानुकथनं पावनं भगवद्यशः ।
मिथो रतिर्मिथस्तुष्टिर्निवृत्तिर्मिथ आत्मन ॥ ३० ॥
स्मरन्तः स्मारयन्तश्च मिथोऽघौघहरं हरिम् ।
भक्त्या सञ्जातया भक्त्या बिभ्रत्युत्पुलकां तनुम् ॥ ३१ ॥
क्वचिद्रुदन्त्यच्युतचिन्तया क्वचिद्धसन्ति नन्दन्ति वदन्त्यलौकिकाः ।
नृत्यन्ति गायन्त्यनुशीलयन्त्यजं भवन्ति तूष्णीं परमेत्य निर्वृताः ॥ ३२ ॥
इति भागवतान् धर्मान् शिक्षन् भक्त्या तदुत्थया ।
नारायणपरो मायामञ्जस्तरति दुस्तराम् ॥ ३३ ॥

वरील श्लोकात ग्रथित केलेल्या भागवतधर्मांच्या स्वरूपाचें विवेचन संस्कृत भाषेंतील अनेक ग्रंथांतून भारतीय धर्मकारणी पुढाऱ्यांनीं केलेलें आहे. भागवतधर्मांचीं तत्त्वें व स्वरूप ज्यात प्रतिपादिलीं आहेत, असा ' भागवत ' नांवाचा स्वतंत्र ग्रंथ अकराव्या शतकांतील धार्मिक स्थित्यंतरास सुरवात होण्या-पूर्वीं च रचला गेला होता. परंतु संस्कृत भाषा ही भरतखंडातील बहुसंख्य लोकांस अवगत नसल्यामुळें या धर्मांच्या तत्त्वाचा प्रसार सामान्य लोकांत झाला नव्हता. भारतीय जनतेपैकीं बहुसंख्य लोकांच्या धार्मिक आकांक्षा दीर्घ काळपावेतों अतृप्त राहणें दुरापास्त होतें. यामुळें भागवतधर्मांचीं तत्त्वें प्राकृत भाषेंतून बहुसंख्य जनतेस परिचित करून देणारा धर्मकारणी पुरुषांचा एक नूतन वर्ग भरतखंडात अकराव्या शतकाचे सुमारास निर्माण झाला व या वर्गानें भरतखंडांत एक नूतन धार्मिक स्थित्यंतर घडवून आणण्यास सुरवात केली.

हें स्थित्यंतर भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रांतात शेंदीडशें वर्षांच्या फरकानें निरनिराळ्या काळीं घडून येण्यास सुरवात झाली. कोणकोणत्या प्रांतांत कोणकोणत्या काळीं कोणकोणत्या धर्मकारणी पुढाऱ्यांनीं हें धार्मिक स्थित्यंतर घडवून आणण्यास सुरवात केली, याचें आम्ही आता थोडक्यांत दिग्दर्शन करितों.

भरतखंडाच्या चार प्रदेशांत हें धार्मिक स्थित्यंतर मुख्यत्वेंकरून घडून आलें. ते प्रदेश म्हटले म्हणजे ( १ ) उत्तर हिंदुस्तान ( २ ) महाराष्ट्र

( ३ ) दक्षिण हिंदुस्तानांतील तामीळ प्रांत ( ४ ) कर्नाटक, हे होत. काल-दृष्ट्या विचार केला असतां या धार्मिक स्थित्यंतरास प्रारंभ प्रथम दक्षिण हिंदुस्थानांतील तामीळ प्रांतांत झाला. अळवार या नांवानें प्रसिद्ध असलेले तामीळ संतकवि व त्याच्या पश्चात् झालेले आचार्य यानीं भागवतधर्माच्या तत्त्वांचा प्रचार तामीळ भाषेंतून तामीळ जनतेंत करण्यास सुरवात केली. या अळवार संतकवींविषयीं महाराष्ट्रीय ज्ञानकोशामध्यें ( भाग ८ पान " आ " ३८८ ) खालील प्रमाणें थोडक्यांत माहिती दिलेली आहे:—

आळवार.—वैष्णव संत कवी. दक्षिण हिंदुस्थानांतील वैष्णवसंप्रदायाचे दोन कालविभाग पडतात; एक आळवाराचा व दुसरा आचार्यांचा. ' दैवी प्रेमसागरांत बुडून गेलेले ' हे आळवार *योगी* बारा असून ते निरनिराळ्या काळीं जन्मलेले व निरनिराळ्या ठिकाणीं रहाणारे असे होते. वैष्णव ग्रंथांत गीतेप्रमाणें ज्याला महत्त्व आलें आहे त्या ' प्रबंधम् ' नावाच्या ग्रंथांत *आळवारांची गीतें गोविलीं आहेत.* परंपरेनें चालत आलेल्या *माहितीवरून* आळवाराचे तीन गट पडतात.

पू र्व का ली न.—( खि. पू. ४२०३ ) पोयगयी आळवार, भूतत्तार पेय आळवार, तिरुमालि शायी आळवार.

म ध्य का ली न.—( खि. पू. ३१०२ ) नम्माळवार, मधुरकवि ( ३०७५ ) कुलशेखर, पेरिय ( ३०५६ ) ( आळवार, आंदाळ, ३००५,

अं ति म का ली न.–( खि. पू. २८१४ ) तोंडरडिप्पोडी, (२७६०) तिरुप्पाण ( २७०६ ) तिरुमंगयी आळवार.

प्रत्येक आळवाराचे वर दिलेले नक्की जन्मकाळ धार्मिक तामिळ ग्रंथांतून घेतलेले आहेत. ते विश्वसनीय नसणार हें ठरलेलेंच पण आळवारांचा अनुक्रम कांहीं अशक्य दिसत नाहीं. पहिल्या गटातील आळवारांची कोणाला़च फारशी माहिती नाहीं. दुसऱ्यातील कांहींची सापडते व तिसऱ्यातील तर त्याला ऐतिहासिक ठाणता येईल अशीहि थोडी फार माहिती उपलब्ध आहे. महत्त्वाच्या दृष्टीनें या सर्व आळवारात नम्माळवार पहिला येईल ( ' नम्माळवार ' पहा ).

" इ० सनाच्या चवथ्या किंवा पांचव्या शतकापासून आठव्या शतकापर्यंत हे सर्व अळवार होऊन गेले असावेत. नतर दोन शतकांनीं नाथमुनीपासून आचार्यांचा काळ सुरु झाला. अळवार हे खरेखुरे प्रपत्ति

असून गूढ अंतर्दर्शनांत निमग्न होऊन शांततेनें काळ कंठीत असत, असें त्यांचें वर्णन आहे. त्यांच्यानंतर झालेले आचार्य हे स्वभावतः च अध्यापक व आचार्य असल्यानें त्यांनीं वैष्णव संप्रदायाचें रहस्य विद्वानांना हि पटेल अशा तन्हेनें प्रतिपादन केलें. शिवाय ते स्वतः मोठे पंडित व तत्त्ववेत्ते होते. रामानुजाचार्य नामक आचार्यांनीं हि अळवारांना हि गुरुस्थानीं मानून त्यांचें कार्य नवीन जोमानें पुढें चालविलें. श्रीरंगम् व इतर प्रमुख ठिकाणच्या देवळांतून आळवारांच्या मूर्ती दिसतात. त्या रामानुजाच्या सांगण्यावरूनच बसविलेल्या आहेत, असा समज आहे. या आळवारांत स्त्रीशूद्रहि होते. या द्वादश आळवारांपैकीं आंदाळ ही पेरिय आळवाराला लहानपणीं सांपडलेली स्त्री, तिरुप्पाण पंचमजातीचा, तिरुमंगयी शूद्र, नम्माळवार वेळ्ळाळ व बाकीचे ब्राह्मण होते. या कवींचीं गीतें म्हणजे निर्मळ हिंदुवातावरणांतील एका प्रांताच्या लोकांचे पहिले अमोल्य बोल म्हणतां येईल. तोंडरडिपोड्डीच्या शोकपूर्ण गीतांपासून ते नम्माळवाराच्या विचारपरिप्लुत स्तोत्रापर्यंत, तसेंच कुलशेखराच्या सुसंस्कृत पद्यांपासून ते आंदाळच्या गूढ प्रेम–गीतांपर्यंत या आळवारकाव्याची मोठी व्याप्ति आहे. हे वैष्णवगायक व यांच्याच काळचे आणि यांच्यांच तोडीचे ६३ शैव गायक 'अडियार' घेतल्यास इतक्या प्राचीनकाळीं कोणत्याहि हिंदुस्थानीय देशी भाषेत सांपडणार नाहींत अशीं परमधार्मिक गीतें आपणांस अभ्यासण्यास मिळतील."

उत्तर हिंदुस्तानांत वर उल्लेखिल्या प्रकारचें धार्मिक स्थित्यंतर घडवून आणणारे पांच धर्मकारणी पुरुष होऊन गेले. (१) रामानुज, शके १०४९ (२) विष्णुस्वामी, १००० (३) मध्वाचार्य ११६५ (४) निंबादित्य, ११५० व (५) रामानंद, १२९१ हे ते पुरुष होत. भागवतधर्मांच्या तत्त्वांचा या धर्मकारणी पुरुषांनीं उत्तर हिंदुस्तानांतील भारतीयांत प्रसार केला. रामानुज हा तामीळ प्रांतांतील भक्तिमार्गाचे प्रवर्तक यामुनी मुनी यांचा शिष्य होता, यावरून उत्तर हिंदुस्तानांत झालेला भागवतधर्माच्या तत्त्वांचा प्रसार दक्षिण हिंदुस्तानांतील भागवतधर्माचे प्रवक्ते जे अळवार, संतकवि व आचार्य यांच्या योगानें च झाला, असें म्हणणें प्राप्त आहे.

आतां महाराष्ट्रांतील या स्थित्यंतराच्या दिग्दर्शनाकडे आम्ही वळतों. महाराष्ट्रांत हें स्थित्यंतर घडवून आणणारे आद्य धर्मकारणी पुरुष म्हटले म्हणजे श्रीज्ञानेश्वर हे होत. उत्तर हिंदुस्तानांत घडून आलेल्या स्थित्यंतराचा

प्रवेश महाराष्ट्रात झाला असें मत राजवाड्यांनीं " नाभाजीनें व महिपतीनें वर्णिलेले हिंदुस्तानातील व महाराष्ट्रातील संत " या निबंधात प्रदर्शित केलें आहे. महाराष्ट्रातील व उत्तर हिंदुस्तानातील लोकांचें दळणवळण सतत सुरू च असे. हें लक्षांत घेता राजवाड्यांची उपपत्ति ग्राह्य धरण्यास हरकत नाहीं. तथापि, अलीकडे महाराष्ट्रात जें वाङ्मयात्मक संशोधन झालें आहे, तें लक्षात घेता हें स्थित्यंतर घडण्यास तात्कालिक कारण म्हणजे मानभाव पंथाचा महाराष्ट्रात झालेला उदय व प्रसार हें होय. मानभाव पंथ हा बौद्ध धर्माचा नवा अवतार होता. महाराष्ट्रातील सर्व लोकात या पंथाचा जारीनें प्रसार होण्यास सुरवात झाली. यामुळें श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माभिमानी महाराष्ट्रीय पुरुषास या नूतन पंथाच्या प्रसारास आळा घालून श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माच्या तत्त्वाचा प्राकृत मराठी भाषेंत प्रसार करण्याची आवश्यकता भासू लागली. मानभाव पंथाचे धर्मग्रंथ मराठी भाषेंत आहेत, ही गोष्ट सर्वश्रुत च आहे. या कारणामुळें या पंथाचीं तत्त्वें महाराष्ट्रातील सामान्य जनतेस अवगत करून घेणें सुलभ जाऊन या पंथाच्या तत्त्वाचा प्रसार अल्प काळात सर्व महाराष्ट्रभर झाला. श्रुतिस्मृतिप्रणीत धर्मावर आलेल्या या नूतन संकटाचा प्रतिकार करण्यास्तव ज्ञानेश्वरानीं ज्ञानेश्वरी ऊर्फ भावार्थदीपिका हा ग्रंथ मराठींत रचला व भागवतधर्माच्या तत्त्वांचा प्रसार सर्व महाराष्ट्रात या ग्रंथाच्या द्वारें करण्यास सुरवात केली. ज्ञानेश्वराचे समकालीन दुसरे महाराष्ट्रीय धर्मकारणी पुरुष विठ्ठलभक्तशिरोमणि नामदेव हे होत. नामदेवानीं अभंगात्मक वाङ्मयाची रचना करून भागवतधर्माच्या तत्वाचा प्रसार फार मोठ्या प्रमाणात ज्ञानेश्वराच्या हयातीनंतर ५०।७५ वर्षांच्या काळात केला. नामदेवानंतर एकनाथ, तुकाराम या सुप्रसिद्ध संतकवींनीं मोठें विस्तृत वाङ्मय मराठी भाषेंत तयार करून भागवतधर्माचीं तत्त्वें अखिल महाराष्ट्रीयास परिचित करून दिलीं.

कर्नाटक प्रांतात हें धार्मिक स्थित्यंतर, जवळ जवळ महाराष्ट्रात ज्या काळीं घडून आलें, त्या काळीं घडून येण्यास सुरवात झाली. कर्नाटकातील या धार्मिक स्थित्यंतराचा निकट संबंध महाराष्ट्रांत घडून आलेल्या स्थित्यंतराशीं असल्याचें आम्ही जें यापुढें विवेचन करणार आहों, त्यावरून दिसून येणार आहे. दासकूट या नावानें प्रसिद्ध असलेले संत कर्नाटकांतील धार्मिक स्थित्यंतराचे प्रवर्तक झाले. दासकूटातील

सर्व संतांनीं भक्तिमार्गाचा, कानडी मार्फत काव्यरचना करून, उपदेश केला आहे. यांचें दैवत पंढरपूर येथील श्रीविठ्ठल हें आहे. नरहरीतीर्थ ऊर्फ रघुकुलतिलक, अल्कानद, श्रीपदराय ऊर्फ रगविठ्ठल, व्यासराय ऊर्फ उडुपीकृष्ण, पुरंदर विठ्ठल, कनक, वादीराज, विजयदास, भगन्नाथदास, जगन्नाथदास इत्यादि दासकूटांतील संतांनीं कानडी भार्पत काव्यरचना करून भागवतधर्माच्या तत्त्वांचा प्रसार सर्व कर्नाटक प्रांतात केला. महाराष्ट्रांतील ज्ञानेश्वरादि संतांनीं जें धार्मिक स्थित्यंतर महाराष्ट्रात घडवून आणण्यास प्रारंभ केला, त्याचा परिणाम कर्नाटकातील धर्मकारणी पुरुषावर होऊन दासकूट व त्यांचीं तत्त्वें उदयास आलीं असावीं असा संभव आहे.

एथपावेतों केलेल्या विवेचनावरून अकराव्या शतकाच्या सुमारास उदयास आलेलें धार्मिक स्थित्यंतर भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रांतात कोणकोणत्या काळीं व कोणकोणत्या पुरुषांनीं घडवून आणण्यास सुरवात केली याची स्थूल कल्पना वाचकास झाली आहे. या धार्मिक स्थित्यंतरासंबंधीं दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या ठळक बाबी खालील प्रमाणें आहेत.

( १ ) उपास्य दैवत श्रीकृष्ण अथवा श्रीविठ्ठल अगर श्रीराम.

( २ ) परमेश्वरप्राप्तीचा मार्ग भक्ति.

( ३ ) हें धार्मिक स्थित्यंतर घडवून आणण्याचें साधन प्राकृत मार्फत रचिलेलें भक्तिप्रधान वाङ्मय.

आता या धार्मिक स्थित्यंतरांच्या योगानें भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रदेशांत उदयास आलेल्या धार्मिक संप्रदायात समर्थसंप्रदायाचें स्थान कसा प्रकारचें आहे, याचें आम्ही दिग्दर्शन करितों. वारकरी संप्रदायाची ज्ञानेश्वरांनीं महाराष्ट्रात स्थापना करून ज्या नूतन धार्मिक स्थित्यंतरास प्रारंभ केला तें सोळाव्या शतकांत पूर्णत्वास पावलें. तुकाराम बोवा हे या स्थित्यंतर काळांतील शेवटचे धर्मकारणी पुरुष होत. तुकाराम महाराजांच्या हयातींत च समर्थसंप्रदायाचे आद्य प्रवर्तक श्री रामदास हे उदयास आले.

अशा स्थितींत वारकरी संप्रदायाच्या धर्मकारणी पुढाऱ्यांनीं महाराष्ट्रांत जें धार्मिक स्थित्यंतर घडवून आणिलें, त्याच्या अंतर्गत असलेल्या मार्गीकडे दुर्लक्ष करून नूतन धार्मिक संप्रदायाची स्थापना करणें दुरापास्त होतें. 'वारकरी व समर्थसंप्रदायाच्या अवलोकनावरून निदर्शनास येणाऱ्या ज्या मुख्य बाबी आम्ही पुढें नमूद करणार आहों, त्यांवरून आम्ही केलेल्या या विधानाची

अन्यथा वाचकांस पटल्याखेरीज राहणार नाहीं.

महाराष्ट्रांत धार्मिक स्थित्यंतर घडवून आणणारे ज्ञानेश्वरादि वारकरी संप्रदायाचे धर्मकारणी पुढाऱ्यांनीं प्रचलित केलेल्या भागवतधर्म ऊर्फ वारकरी संप्रदायासंबंधीं स्थूल दृष्ट्या आपणास खालील बाबी आढळून येतात.

१ या संप्रदायाचें उपास्य दैवत पंढरपूर येथील श्री विठ्ठल हें होय.

२ परमेश्वरप्राप्तीचा मार्ग श्रीविठ्ठलभक्ति.

३ विठ्ठलभक्तीचा प्रचार मराठी मार्फत काव्यरचना करून वारकरी संप्रदायाच्या धर्मकारणी पुढाऱ्यांनीं केला.

आतां समर्थसंप्रदायाच्या अवलोकनावरून प्रत्ययास येणाऱ्या स्थूल बाबी आम्ही नमूद करितों.

१ समर्थसंप्रदायाचें उपास्य दैवत श्रीरामचंद्र हें होय.

२ परमेश्वरप्राप्तीचा मार्ग रामभक्ति हा होय.

३ श्रीरामभक्तीचा प्रचार समर्थांनीं व त्यांच्या पश्चात् त्यांच्या शिष्यांनीं मराठी मार्फत काव्यरचना करून केला.

वारकरीसंप्रदायाच्या व समर्थसंप्रदायाच्या निरीक्षणावरून प्रत्ययास येणाऱ्या वरील स्थूल बाबींची तुलना केली असतां एका उपास्य दैवताखेरीज बाकीच्या कोणत्या हि बाबतींत वारकरी व समर्थसंप्रदायांत फरक असल्याचें दिसून येत नाहीं. श्रीविठ्ठलदैवताऐवजीं समर्थांनीं श्रीरामचंद्राची उपासना सांगितली आहे, एवढें च. बाकी परमेश्वरप्राप्तीचा मार्ग भक्ति व संप्रदायाच्या प्रचाराचें साधन प्राकृत मराठी भाषा या दोन्ही बाबी उभय संप्रदायात साधारण आढळणाऱ्या आहेत.

आता वरील विवेचनाचा थोडक्यांत निष्कर्ष पुढें दर्शविल्याप्रमाणें निघतो. अकराव्या शतकाच्या सुमारास भरतखंडांत एक नूतन धार्मिक स्थित्यंतर घडण्यास सुरवात झाली. या स्थित्यंतराच्या काळात भरतखंडातील धर्मकारणी पुढाऱ्यांनीं श्रुतिस्मृतिप्रणीत धर्मांतर्गत नानाविध रूपांपैकीं भागवतधर्म या नावानें प्रसिद्ध असलेल्या संप्रदायाचा प्रसार भरतखंडाच्या निरनिराळ्या भागांत करण्यास सुरवात केली. महाराष्ट्रांत भागवत धर्म उर्फ वारकरी संप्रदायाचा प्रचार ज्ञानेश्वरांनीं व त्यांच्या पश्चात् झालेल्या नामदेव, एकनाथ, तुकाराम इत्यादिकांनीं सुरू ठेविला. वारकरी संप्रदायाच्या प्रसारार्थ प्राकृत मराठी भाषेचा अवलंब वारकरी संप्रदायाच्या धर्मकारणी पुढाऱ्यांनीं केला. पंढरपूर येथाल

सर्व संतांनीं भक्तिमार्गाचा, कानडी मार्फत काव्यरचना करून, उपदेश केला आहे. यांचें दैवत पंढरपूर येथील श्रीविठ्ठल हें आहे. नरहरीतीर्थ ऊर्फ रघुकुलतिलक, अल्कानद, श्रीपदराय ऊर्फ रंगविठ्ठल, व्यासराय ऊर्फ उडुपीकृष्ण, पुरंदर विठ्ठल, कनक, वादीराज, विजयदास, मगन्नाथदास, जगन्नाथदास इत्यादि दासकूटातील संतांनीं कानडी मार्फत काव्यरचना करून भागवतधर्माच्या तत्त्वाचा प्रसार सर्व कर्नाटक प्रांतात केला. महाराष्ट्रांतील ज्ञानेश्वरादि संतांनीं जें धार्मिक स्थित्यंतर महाराष्ट्रात घडवून आणण्यास प्रारंभ केला, त्याचा परिणाम कर्नाटकातील धर्मकारणी पुरुषावर होऊन दासकूट व त्याचीं तत्त्वें उदयास आलीं असावीं असा संभव आहे.

एथपावेतों केलेल्या विवेचनावरून अकराव्या शतकाच्या सुमारास उदयास आलेलें धार्मिक स्थित्यंतर भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रांतात कोणकोणत्या काळीं व कोणकोणत्या पुरुषांनीं घडवून आणण्यास सुरवात केली याची स्थूल कल्पना वाचकास झाली आहे. या धार्मिक स्थित्यंतरासंबंधीं दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या ठळक बाबी खालील प्रमाणें आहेत.

( १ ) उपास्य दैवत श्रीकृष्ण अथवा श्रीविठ्ठल अगर श्रीराम.

( २ ) परमेश्वरप्राप्तीचा मार्ग भक्ति.

( ३ ) हें धार्मिक स्थित्यंतर घडवून आणण्याचें साधन प्राकृत मार्फत रचिलेलें भक्तिप्रधान वाङ्मय.

आता या धार्मिक स्थित्यंतराच्या योगानें भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रदेशात उदयास आलेल्या धार्मिक संप्रदायात समर्थसंप्रदायाचें स्थान कशा प्रकारचें आहे, याचें आम्ही दिग्दर्शन करितों. वारकरी सांप्रदायाची ज्ञानेश्वरानीं महाराष्ट्रात स्थापना करून ज्या नूतन धार्मिक स्थित्यंतरास प्रारंभ केला तें सोळाव्या शतकात पूर्णत्वास पावलें. तुकाराम बोवा हे या स्थित्यंतर काळातील शेवटचे धर्मकारणी पुरुष होत. तुकाराम महाराजांच्या हयातींत च समर्थसंप्रदायाचे आद्य प्रवर्तक श्री रामदास हे उदयास आले.

अशा स्थितींत वारकरी सांप्रदायाच्या धर्मकारणी पुढाऱ्यांनीं महारा- जें धार्मिक स्थित्यंतर घडवून आणिलें, त्याच्या अंतर्गत असलेल्या दुर्लक्ष करून नूतन धार्मिक सांप्रदायाची स्थापना करणें दुरापा[illegible] करी व समर्थसंप्रदायाच्या अवलोकनावरून निदर्शनास [illegible] ज्या चाची आम्ही पुढें नमूद करणार आहों, त्यांवरून आम्ही केलेल्या या विधाना